# जीवन-प्रकाश

लेखक

श्रीपाद दामोदर सातवळेकर



उषा प्रकाशन

औन्ध ( सातारा )

कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतँ समाः।
एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे॥

( वा० यजुर्वेद, अ० ४०।२ )

"या जगामध्ये सत्कर्मे करीतच, मनुष्याने शंभर वर्षे जगण्याची इच्छा धरावी. ( हे मनुष्या! ) हीच बुद्धि तुझ्यामध्ये वसो, याहून उन्नतीचा दुसरा मार्गच नाही. सत्कर्मांचा लेप मनुष्याला लागत नाही."

# प्रकाशाकडे—

## परिचय

पंडित श्रीपाद दामोदर सातवळेकर यांचा विविधलेखसंग्रह छापून काढण्याची योजना चि० रा० वसंत श्रीपाद सातवळेकर हे करीत आहेत, हें फार स्तुत्य आहे. पं० सातवळेकर हे ज्याप्रमाणे वेदवेदांगें यांचे अभ्यासक आहेत, त्याचप्रमाणे ते चित्रकलेचेहि उपासक अगदी लहानपणापासून आहेत. तसेंच भरतखंडाच्या हिताच्या दृष्टीने आधुनिक काळाला अनुसरून ज्या निरनिराळया बाजूंनी आपल्या मायभूमीची प्रगति व्हावयास पाहिजे, त्या अनेक बाजूंचा अभ्यास आणि विचार त्यांनी परिश्रमपूर्वक केला आहे. केवळ सनातनी अगर केवळ सुधारक असें त्यांचें विशिष्ट मत नाही व आचरणही नाही. आचरणांत साधेपणा, पूर्ण अभ्यासू वृत्ति, मनमोकळेपणा आणि समाजकार्य व राष्ट्रकार्य यांत समरस होऊन, शक्य तों, राष्ट्रकार्याच्या उत्क्रांतीला पूर्ण मदत करणें, हें त्यांचें नेहमीचें ब्रीद आहे.

असल्या महापुरुषाचा प्रथम परिचय आम्हाला मुंबईमध्ये १८९५ सालीं झाला. रा० रा० लक्ष्मणराव किर्लोस्कर मुंबईमध्ये रा० रा० जांभेकर यांजकडे रहात असत. कै० रा० रा० वाजीराव गुत्तीकर डेक्कन् कॉलेजमध्ये १८८९ सालापासून आमचे सहाध्यायी होते, त्यांचा व आमचा अकृत्रिम स्नेह त्या काळापासून होता. वाजीराव बेळगावचे, लक्ष्मणराव बेळगावचे, सातवळेकरहि तेथेच रहात असत, यामुळे या सर्वांचाच स्नेहसंबंध होता. आम्हाला लहानपणापासून चित्रकलेचा नाद. आम्ही आणि वाजीराव एकदमच १८९४ सालीं बी. ए. झाल्यानंतर आम्ही दोघेही मुंबईस कायद्याच्या टर्म्स भरण्यासाठी राहिलों. त्यांनी एक वेळ पं० सातवळेकर यांना स्कूल ऑफ आर्टस्च्या सर्व

परीक्षा उत्तम पास झालेले, अनेक प्रदर्शनांत बक्षिसें व चांदी-सोन्याचीं पदकें मिळविलेले होतकरू चित्रकार म्हणून आमच्याकडे आणलें. आमचाही चित्रकलेचा अभ्यास थोडाबहुत चाललाच होता. बराच वेळ स्कूल ऑफ आर्ट्‌सच्या अभ्यासक्रमाविषयी सातवळेकरांचा व आमचा विचारविनिमय झाला. वरचेवर ते आमच्याकडे येऊं लागले. एकदा त्यांनी आमचें पेन्सिलीचें लाइफ् स्केचहि केलें होतें.

हा परिचय वाढत गेला. पुढे चित्रकलेच्या कामासाठी चार दोन वेळा औंधास महिना महिना मुक्काम सातवळेकरांना करावा लागला. या कारणानें त्यांचा आमचा स्नेह दिवसेंदिवस वाढत गेला.

## पंजाबमध्ये वास्तव्य

या समयीं रा० श्रीपादरावांचा वेदांचा अभ्यास प्रकट झाला नव्हता. आम्ही त्यांना 'सोनबा' या नांवानेच त्या वेळीं हाक मारीत असूं. त्या वेळीं आम्ही काढलेला त्यांचा एक बस्ट पोर्ट्रेट अजून आमचेपाशी आहे. अशा रीतीने आमचा स्नेह वाढत असतांना पंडितजी मद्रास, दक्षिण हैद्राबाद, कोल्हापूर-वगैरे कडेची तुरुंगाची हवा खाऊन शेवटीं बरींच वर्षें पंजाबांत लाहोरास चित्र-कार व फोटोग्राफर म्हणून राहिले. मधून मधून आमचा त्यांचा कधी कधी पत्रव्यवहार होत असे. आम्ही १९०५ सालीं सातारा येथे शनिवार पेठेंत परांजपे यांचे वाड्यांत रहात असतांना एकदा रा० श्रीपादराव आम्हाला येऊन भेटले होते. पंजाबांत असतांना रा० श्रीपादरावांनी हिमालयांतील कांही यात्रा केल्या. त्या प्रसंगाचे घेतलेल्या फोटोग्राफ्सचे कांही आल्बम् त्यांनी आम्हांला दिले. त्याचप्रमाणे तेथे केलेल्या कांही रफ् स्कैचेस्वरून काढलेलीं कांही तैलरंगाचीं चित्रेंही आम्हांला विकत दिलीं. याप्रमाणे १८९५ सालीं झालेला हा प्रेमाचा परिचय १९१० सालापर्यंत कायम राहिला.

## औंधास आगमन

पुढे श्रीप्रेरणेने रा० श्रीपादरावांना लाहोर सोडून औंधासच यावेंसें वाटलें. याचें मुख्य कारण म्हणजे वेदवेदांगांचा अभ्यास करून जुनी आर्य-

संस्कृति आपल्या भरतखंडांत प्रचलित करावी, ही त्यांची जबरदस्त तळमळ व फोटोग्राफीवर आणि लोकांचे पोर्ट्रेट्स् काढून मिळणाऱ्या पैशावर त्यांच्या अन्तःकरणाचें समाधान होऊं शकेना, हें होय.

अन्तःकरणाचें खरें समाधान होण्यासाठी नुसता पैसा मिळणें अगर संसारसुख भोगणें एवढ्याच गोष्टी विचार करणाऱ्या माणसाला पुऱ्या पडत नाहीत. आपल्या समाजासाठी, आपल्या राष्ट्रांतील जनतेच्या ऐहिक व पारमार्थिक उत्क्रान्तीसाठी किंवा आपल्या राष्ट्रांतील उच्च संस्कृति योग्य रीतीने जगापुढे मांडण्यासाठी कांही परिश्रम केले म्हणजेच विचार करणाऱ्या माणसाला समाधान होतें.

आम्ही औंधच्या गादीवर आल्यावर, पंडितजींचा व आमचा आज वीस बावीस वर्षांचा स्नेह असल्यामुळे औंधचें शुद्ध वातावरण, येथील उत्कृष्ट हवापाणी इत्यादिकांचा पंडितजींच्या मनावर परिणाम झाला आणि त्यांनी औंधास येऊन, येथे घर बांधून, वेदवेदांगांवर पुस्तकें छापून, प्रसिद्ध करण्यासाठी 'स्वाध्याय–मण्डळ' स्थापन करून व भारतमुद्रणालय काढून, त्यांनी आपल्या कार्यास प्रारंभ केला व श्रीकृपेने आजपर्यन्त त्यांचें कार्य उत्तम चाललें आहे.

आम्हालाही आमच्या राज्यकारभारामध्ये त्यांचा फार उपयोग होतो. "अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता" या नात्याने त्यांची किंमत आम्हाला फार वाटते.

अशा आमच्या अकृत्रिम स्नेह्याच्या लेख–संग्रहाचें पुस्तक खुद्द त्यांच्या बी. ए. झालेल्या चिरंजिवांनीच प्रकाशित करावें, हा फार स्तुत्य उपक्रम आहे म्हणून त्याला लहानशी प्रस्तावना लिहिण्याचें आम्ही रा० वसंतरावांना कबूल केलें. चांगलेंच आहे, त्याला चांगलें म्हणावयाचें काय कारण आहे? पण पंडितजींबद्दल आम्हाला काय वाटतें, हें लिहिण्याची संधि या लेखसंग्रह–प्रकाशनाच्या योगाने आम्हाला वसंतरावांनी आणून दिली, याबद्दल आम्हांलाच त्यांचे आभार मानावेसे वाटतात. आमच्या राज्यांत पंडित सातवळेकर हें एक रत्न आहे. आम्हाला त्यांच्यामुळे मान मिळाला आहे. त्यांचें औंध–संस्थानांतील वास्तव्य औंध–संस्थानला एक मोठें भूषणच आहे.

## कार्याचा व्याप

पंजाबांत असतांना वेदवेदांतादिविषयांसंबंधी पं० सातवळेकर यांनीं कांही दहा पांच पुस्तकें छापून प्रसिद्ध केलीं असतील; पण औंध संस्थानांत आल्यापासून गेल्या एकवीस वर्षांत त्यांनी वेदवेदांगांवर निदान दीडशे तरी लहान मोठे ग्रन्थ छापून प्रसिद्ध केले आहेत. 'पुरुषार्थ'(मराठी) 'वैदिक धर्म' ( हिंदी ) अशीं मासिकें त्यांनी चालवलीं असून हिंदी भाषांतरासह सम्पूर्ण महाभारत मुळासुद्धा त्यांनी छापून प्रसिद्ध केलें आहे· तसेंच श्रीमद्भगवद्गीतेवर अत्यंत मार्मिक अशी पुरुषार्थबोधिनी टीका लिहून ती प्रसिद्ध केली आहे.

असल्या मोठ्या व्यवसायामुळे– विशेषतः चित्रकलेचा त्यांचा अभ्यास मूळपासूनचा असतांही-आता या वेदमुद्रणाच्या उपक्रमामुळे त्यांना चित्रकलेचा व्यासंग अगदी नाइलाजाने सोडावा लागला आहे; तथापि अजूनही त्यांचें कलम सच्चें आणि उत्तम आहे, हें आम्हाला प्रत्यक्ष माहीत आहे. औंधास आल्यावरही त्यांनी काढलेलीं कांही चित्रें आमच्या भवानी म्यूझियम्‌मध्ये आहेत. पं० सातवळेकर आता कोणत्याही कलाविषयक विषयासंबंधी कशीं उत्तम भाषणें करूं शकतात व लेखहि लिहूं शकतात, हें आज त्यांच्या लेखसंग्रहाचें पुस्तक त्यांच्या चिरंजिवांनी छापून प्रसिद्ध करण्याचा उपक्रम केला आहे, त्यांतील लेखांवरून दिसून येईल.

या संग्रहांत अनेक विषयांवरील पंडितजींचे विचार आपणास वाचतां येतील. यावरून त्यांची बुद्धिमत्ता किती चौरस आहे आणि राष्ट्रोन्नतिपोषक अशा अनेक विविध विषयांचा विचार त्यांनी किती सर्वांगीण रीतीने केला आहे, हें वाचकांना कळून येईल.

## चित्रकला

पं० सातवळेकर यांनी चित्रकलेचा अभ्यास १८९४ सालापूर्वीच सर्व पूर्ण केला. निदान त्या वेळच्या मुंबई स्कूल ऑफ् आर्ट्‌समध्ये जेवढे विषय शिकवीत असत, तेवढे त्यांनी संपूर्ण अभ्यासिले. त्या वेळेला अनुसरून त्यांनी अनेक चित्रकृति मुंबई, मद्रास, सिमला, कलकत्ता वगैरे प्रदर्शनांत पाठविल्या.

त्या वेळीं त्यांच्या कित्येक चित्रांना बक्षिसेंही मिळालीं; सुवर्ण-रौप्य पदकें व प्रशस्तिपत्रेंहि मिळालीं; म्हणून पंडितजींना चित्रकलेवर लिहिण्याचा व बोलण्याचा अधिकार आहे, याबद्दल कांही शंका नाही. तथापि त्या वेळीं म्हणजे मुंबईच्या स्कूल ऑफ् आर्ट्समध्ये ते शिकत असतांना भारतीय प्राचीन चित्र-कलेविषयी अजंठा, वेरुळ, बाघ, शितानवसाळ इत्यादि ठिकाणीं आज अवशेष असलेल्या प्राचीन चित्रकलेविषयी कांही ज्ञान त्यांच्या शाळेंतील अध्यापकांनी करून घेऊन त्यांना दिलें असेल असें वाटत नाही. आमची भारतीय चित्रकला हिणकस, त्यांत वास्तव सृष्टिसौन्दर्य कांही नाही. एखाद्या देखाव्याचें हुबेहुब चित्र काढण्याचा त्या चित्रकलेमध्ये मागमूसही नाही, अशाच प्रकारच्या कल्पना त्या वेळच्या भरतखंडांतील कोणत्याही स्कूल ऑफ् आर्टमधून उत्तीर्ण होऊन बाहेर पडणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याच्या होत्या. जेत्या राज्यकर्त्यांच्या गुणावगुणांची पकड जित राष्ट्रांतील एकंदर जनतेवर व त्यांच्या विद्या-कला इत्यादींवर नेहमी इतकी घट्ट बसलेली अथवा बसविलेली असते की, त्या पकडींतून सुदैवाने सुटावयालासुद्धा कांही काल जावा लागतो. आपला हा गौणपणा परवापर्यंत– कै० विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी १८८१–१८८७ पर्यन्त निबंधमालेंतील खरमरीत लेखांत महाराष्ट्र-जनतेच्या डोळ्यांत अंजन घालून तिचे डोळे उघडीपर्यंत –आम्हां महाराष्ट्रीयांच्या मनांत कायम होता.

कै० बिझांटबाईने श्रीमद् भगवद्गीतेला जगांतील अत्यंत श्रेष्ठ ग्रन्थ म्हणेपर्यंत आपल्याला त्या थोर ग्रन्थाची किंमत समजली नव्हती. इतके परप्रत्ययी आम्ही निदान एकोणिसाव्या शतकांत तरी होतों.

खुद्द आम्हाला लहानपणासून चित्रकलेची अत्यंत आवड होती. वेडींवाकडीं कां होईना, पण कै० बंडोबा, औंध दरबारचे चित्रकार यांनी काढलेलीं भिंतीवरील चित्रें, आम्ही लहानपणीं नकलीत असूं. त्या वेळीं तीं चांगलीं वाटत व तसा हात वळवावा, अशी महत्त्वाकांक्षा होती. पण १८८१ सालापासून सातारा हायस्कुलांत गेल्यानंतर कित्येक युरोपीय क्लासिकल चित्रांचे नमुने

लिथोग्राफिक पद्धतीनें छापलेले पहावयास मिळाले. स्टील इचिंग पद्धतीनें छापलेलीं अनेक काळ्या रंगांतील फोटोग्राफांसारखीं चित्रें पहावयास मिळालीं आणि हीच चित्रकला खरी, आपली ओल्ड; आपल्या चित्रकलेंत कांही अर्थ नाही, इत्यादि विचार साहजिकच मनांत आले.

कै० रविवर्माही केवळ युरोपीय क्लासिकल पद्धतीचें अनुकरण करीत. त्यांनी मद्रासच्या स्कूल ऑफ् आर्ट्सच्या सर्व परीक्षा उत्तीर्ण होऊन अनेक बक्षिसें मिळविलीं होतीं; तरी त्यांना व त्यांच्या चित्रांना १८९५–९७ पर्यन्त नांवें ठेवण्याचा सांप्रदाय मुंबई स्कूल ऑफ् आर्ट्सच्या विद्यार्थ्यांचा होता. मग आम्ही तर काय, कोणत्याहि आर्ट स्कूलमध्ये कांहीएक शिकलों नव्हतों.

पण आमचा हा भ्रम कलकत्त्याच्या स्कूल ऑफ् आर्ट्सचे प्रिन्सिपाल मि० हॅवेल व कुमारस्वामी यांचीं पुस्तकें वाचल्यानंतर बराच दूर झाला. १९२६ सालीं अजंठा व वेरुळ पाहिल्यावर तर डोळे साफ उघडले !

पंडितजी सातवळेकरांनी आपलीं चित्रकलाविषयक मतेंदेखील अलीकडे बदललीं आहेत. खरोखरी त्यांचें मत वास्तववाद व ध्येयवाद ह्या दोन्हीहि पद्धतींत गुण आहेत, असें म्हणण्याकडेच झुकतें आणि तें खरेंही आहे. ध्येयवादी चित्र कित्येक वेळा आम्हाला तर शाईचा डाग पडल्यासारखें वाटतें. त्यांतून पाहिजे ती कल्पना वाटल्यास करावी. कलेने सर्वसाधारण माणसाला आनंद झाला पाहिजे. नाहीतर त्याला कला म्हणतां येत नाही. संसारांत अनेक वेळा माणसाला अन्नवस्त्रापासून, निवाऱ्याच्या घरापासून, आपलें जीवित व आपली मालमत्ता सुरक्षित आहे, एवढ्या जाणिवेनेच पूर्ण समाधान अनेक वेळा मिळत नाही. संसारांत आणि व्यवहारांत अनेक अडचणी आणि दुःखें यापासून थोडाबहुत उद्वेग प्राप्त झाला असतां, क्षणमात्र का होईना, पण विरंगुळा होऊन मनाचें समाधान आणि समता पुन्हा येण्यासाठी चित्र, नृत्य, गायन, हें सर्वसाधारण रीतीने उच्चनीच माणसाला समाधान देऊं शकेल, असेंच पाहिजे. यांत माणसांच्या योग्यतेप्रमाणे उच्चनीचपणा कमीज्यास्त प्रमाणांतहि असूं शकेल;पण नितांत सुंदर दृश्य पाहिलें किंवा नितांत मधुर स्वर कानावर आले,तर कोणत्याहि

माणसाला सुख झालें पाहिजे. आम्ही तरी चित्रकलेचें हेंच वैशिष्टय मानतों.

सृष्टीबरहुकूम सौंदर्य भिंतीवर, कागदावर, कॅन्व्हसवर उठवितां आलें, एखाद्या माणसाचा चेहरामोहरा, त्याच्या मनांतील भावनासुद्धा एखाद्या चित्रांत अगर पुतळ्यांत दृष्टीस पडला, तर कोणत्याहि माणसास आनंद झालाच पाहिजे.

तात्पर्य काय की, अन्तःकरणाचें समाधान हें कलाकृतीचें खरें कार्य आहे. तें अमक्याला झालें, आणि इतराला होत नाही, तर त्या कलेमध्ये कांहीतरी दोष आहे, असेंच आम्हांला वाटतें.

अजंठा पाहिल्यापासून आमची चित्रकला अत्युत्तम आहे आणि जपानी, चिनी चित्रकार आपली चित्र-पद्धत कधीहि सोडीत नाही, त्याप्रमाणे आम्हीही आपली पूर्वपरंपरागत पद्धति सोडतां उपयोगी नाही, असें आम्हाला स्पष्ट वाटतें.

## मननीय विचार

पंडितजींच्या प्रत्येक लेखावर आम्ही या प्रस्तावनेमध्ये मत प्रदर्शित करूं लागलों, तर मूळ ग्रन्थाहूनही कांही पानें जास्त लिहावीं लागतील. पंडितजींच्या निरनिराळ्या लेखासंबंधाने कित्येक ठिकाणीं आमच्या मतांच्या तपशिलांत कांही फरक असला, तरी त्यांनी उद्धृत केलेले विचार अत्यंत मननीय आहेत, यांत शंका नाही.

ध्येयवादी चित्रकलेवरील पंडितजींचा निबन्ध फार विचारपूर्वक लिहिला आहे, असें आम्हाला वाटतें. तथापि असेंही वाटतें की, कोणतेंहि चित्र वास्तववादी आणि ध्येयवादी असे दोन्ही असलें पाहिजे. एखाद्याचा पोर्ट्रेट काढला तर तो त्याच्या डोळे-नाक-कानाप्रमाणे हुबेहूब असलाच पाहिजे, पण त्या माणसाचें अंतरंग या चित्रांत निघालें पाहिजे तरच तो त्या माणसाचा खरा पोर्ट्रेट होईल. एखादा देखावा काढला व सृष्टिबरहुकूम जरी तो असला आणि त्यांत जर अंतरंग नसलें, ध्येय नसलें तर नुसते रंग फासून फलक सारविल्याप्रमाणे तें व्यर्थ, असें आम्हाला वाटतें.

ओलेतीवरील त्यांचे विचार "ओलेती"वर टीका करणाऱ्यांनी वाचले आहेत किंवा नाहीत, हें समजत नाही. पण असल्या साध्या चित्रांत

त्यांना असभ्यपणा वाटतो, तो बरोबर नाही, हें पंडितजींनी त्या चित्राचें मार्मिक वर्णन करून उत्तम दाखविलें आहे.

अलीकडे स्वतंत्र विचाराच्या म्हणवून घेण्यांत मोठेपणा मानणाऱ्या लोकांना बंधनाच्या पलीकडे असावें, असें वाटावयाला लागलें आहे. त्याप्रमाणे ते बोलतात व लिहितातहि; पण कोणत्याहि प्रकारच्या पूर्वपरंपरागत संस्कृतीचें बंधन अगर नियम अथवा कायदे नसतील आणि त्याप्रमाणे सर्व स्त्रीपुरुषांनी वागलेंच पाहिजे अशी समाजांत किंवा राष्ट्रांत व्यवस्था नसेल, तर तो समाज आणि राष्ट्र विस्कळित झाल्यावाचून राहणार नाही. प्रत्येक माणूस स्वतंत्र आहे. पण तो कांही मर्यादेपर्यन्त स्वतंत्र आहे, हें विसरून चालावयाचें नाही. हल्ली माणसांना स्वैराचार करणें हें स्वातंत्र्याचें लक्षण आहे, असें वाटावयाला लागलें आहे. उत्तम पथावर असलेलीं राष्ट्रें कशीं एकोप्याने वागतात, हें लक्ष्य देऊन पाहण्यासारखें आहे. सामाजिक, राष्ट्रीय चालीरीतींच्या बंधनाला कःपदार्थ मानणाऱ्या राजालाहि सिंहासनाला मुकून राष्ट्र सोडावें लागतें यांतच संस्कृतीचें महत्त्वाचें बन्धन आहे. हें ज्या समाजांत आणि राष्ट्रांत ओळखलें जातें, तेंथेच ऐक्य नांदतें आणि राष्ट्र ऐहिक, पारमार्थिक उत्क्रान्तिपथावर असतें, हें ज्या वेळीं आपल्यांतील लिहिणाऱ्या-बोलणाऱ्यांच्या लक्ष्यांत येईल, त्याच वेळीं आम्ही प्रगतिपथावर आरूढ होऊं. सर्व संस्कार या ध्येयासाठीं, सर्व आचार असले शुभ विचार लहानपणापासून माणसाच्या मनांत खेळावे, यासाठी आहेत, हें विसरूं नये. याच दृष्टीने पंडितजींनी 'संस्कारांचें महत्त्व व त्यांची आवश्यकता' याचें अत्यंत मार्मिक व विस्तृत वर्णन केलें आहे.

"प्रचंड शक्तीचा आवेश" हा लेख अत्यंत मननीय आहे. समाज उन्नत होईल, राष्ट्रोद्धार होईल असलेंच बोललें पाहिजे, असलेंच लिहिलें पाहिजे. जर्मनी, इटली, जपान व इतर पुढारलेल्या देशांमध्ये त्या त्या राष्ट्रांचा औद्योगिक, सामाजिक, राजकीय अधःपात होईल, असें कोणाला लिहूं देतात का ? रशियामध्ये, खुद्द इंग्लंडमध्ये असलें लिखाण–भाषण चालेल का ? असलें भाषण–लेखन–स्वातंत्र्य स्वतंत्र म्हणविल्या जाणाऱ्या राष्ट्रांत आहे का ? याचें मनन करावें आणि मगच बोलावें व लिहावें. समाजाच्या व राष्ट्राच्या

ऐक्याला बाधक असें कांहीएक करूं नये, हें पंडितजींचें म्हणणें विचारी माणसाला पटलेंच पाहिजे.

आपली ' आर्य-संस्कृति ' जगांतील एकंदर संस्कृतींपेक्षा जुनी व जवळ जवळ इतर संस्कृतींची जननी आहे, असें म्हणावयाला हरकत नाही. या विषया-वर अनेक उदाहरणें, नाना ग्रन्थांतील उतारे देऊन पंडितजींनी विषय फार उत्तम रंगविला आहे.

या असल्या संस्कृतीचें रक्षण, आम्ही वसिष्ठ, काश्यप, विश्वामित्र, सावर्णि इत्यादि प्राचीनतम थोरांचे गोत्रज म्हणविणारांनी अत्यंत कसून केलें पाहिजे, हें कोणत्याहि विचारी माणसाला पटलेंच पाहिजे. जुनें सोडूं नये, नवें चांगलें घेतल्यावाचून राहूं नये; पण तें आपल्या जुन्या चौकटींत, आमच्या आर्यसंस्कृतींत बसेल असें करूनच नव्याचें अनुकरण केलें पाहिजे. याबद्दल कोणाचेंहि दुमत होणार नाही, असें आम्हाला वाटतें.

अनेक थोर विभूतींच्या राष्ट्रासाठी तळमळणाऱ्या, मानवी प्रयत्नांची शिकस्त करणाऱ्या थोर लोकांच्या, असंख्य स्त्रीपुरुषांच्या कारागृहवासापासून सुचलेला " अत्रि ऋषींचा कारागृहवास " हा विषय पंडितजींनी आपल्या नेहमीच्या वेदव्यासंगाच्या भारदस्तपणाने उत्तम रंगविला आहे. त्यापासून काढलेलीं अनुमानें इतकीं शाश्वत आहेत की, तीं कोणत्याही उद्धारक चळवळीला, कोणत्याही देशाला व कोणत्याही माणसाला लागू पडतील.

' वेदकालीन लेखनकला, ' ' सौंदर्याची कल्पना ' इत्यादि विषय-सुद्धा पंडितजींच्या वेदाभ्यासाला शोभण्यासारखेच आहेत. सहा किंवा आठ-हजार वर्षांपूर्वी कोणती लिपि होती, याचा पत्ता लागला तर फार चांगलें होणार आहे. पण इजिप्त अथवा मिसर देशांतील प्राचीन लिपीचा शोध अनेक विद्वान् अनेक शतकें करीत होते, तेव्हा तिचा दुवा सापडला. आजही मोह-नजोदारो या इसवी सनापूर्वी चार हजार वर्षे असलेल्या संस्कृतींत काय लिहिलें आहे, त्याचा काय अर्थ आहे, हें अजून प्राचीनवस्तुसंशोधकांना सम-जलें नाही. हल्ली प्रचलित असलेल्या लिपि दोनहजार वर्षांच्या आंतील बाहेरीलच

आहेत. पण जेवढे मुद्दे लेखनकलेविषयी आणि तिच्या ऋग्वेदकालीन अस्तित्वाविषयी पंडितजींनी उद्धृत केले आहेत, ते विचारणीय असेच आहेत.

" वामनावताराचा संदेश " हा लेख कसा व कां लिहिला गेला, याचा इतिहासही आम्हाला माहीत आहे. सत्यशोधक म्हणविणाऱ्यांना उठल्यासुटल्या ब्राह्मणांची खोड काढण्याची सवय कांही वर्षांपूर्वी होती, हें सर्वांस माहीत आहे. संस्कृतभाषाभिज्ञ, बऱ्याच परीक्षा उत्तीर्ण झालेल्या अशा एका लेखकाने पुराणेतिहास-ग्रंथांतील आपल्या विचारांना उपयोगी पडतील, अशीं कांही वचनें घेऊन ब्राह्मणांनी फार प्राचीन काळापासून प्रत्यक्ष क्षत्रियांचासुद्धा छळ केला; बलि हा यज्ञयाग करणारा उत्तम क्षत्रिय राजा असतांना एका ब्राह्मण-बटूने-वामनाने-त्याला विनाकारण पाताळांत घातला, इत्यादि लिहिलेले लेख एका नियतकालिकांत आम्ही वाचले. त्यावर बलि हा आर्यक्षत्रिय नव्हता. तो सुर-द्वेष्टा असुर होता. भरतखंड पादाक्रान्त करून त्याने येथील चांगल्या लोकांचा छळ केला होता. त्याला वामन ब्राह्मणाने महत्प्रयासाने बद्ध करून सोडून न देतां आपल्या देखरेखीखाली पाताळांत ठेवलें इत्यादि गोष्टी पंडितजींनी खुद्द श्रीमद् भागवत-पुराणाच्या आधारानेच उत्तम विशद करून त्या लेखकाला गप्प बसविलें होतें. हा लेख अत्यंत मननपूर्वक व संपूर्ण उतारे देऊन लिहिला आहे, यांत कांही शंका नाही.

एकंदरीने असलें सुंदर पुस्तक छापल्याबद्दल उभय पितापुत्रांचे-पंडितजी व रा० वसंत सातवळेकर, यांचें आम्ही अभिनंदन करतों.

आश्विन शु० ६ शके १८६१
औंध.

भवानराव पंडित प्रतिनिधि,
राजेसाहेब, सं० औंध.

# अनुक्रमणिका



# चित्रकलाविषयक मतें

**प्रश्न– चित्र-कलेची आवड आपणांस केव्हा उत्पन्न झाली?**

उत्तर– मला पक्कें आठवतें की, मी सहाव्या वर्षीं भिंतीवर चित्रें काढीत होतों, तेव्हापासून मला चित्रकलेची आवड आहे. वडिलांचीं चित्रें पाहून मला चित्रें काढावीं, असें प्रथम वाटलें.

**प्रश्न– चित्रकलेचा अभ्यास कोठे व किती केला? त्या वेळीं प्रावीण्य कितपत होतें?**

उत्तर– प्रथम सावंतवाडीच्या टेक्निकल्-स्कूलमध्ये केला व नंतर मुंबईच्या स्कूल ऑफ् आर्टमध्ये केला. त्या वेळीं जें काय या आर्ट-स्कूलमध्ये शिकण्यासारखें होतें, तें सर्व शिकलों. स्कूल ऑफ् आर्ट्स्चीं मेडल्स मिळालीं व प्रदर्शनांतहि बक्षिसें मिळालीं. तथापि मला वाटतें की, त्या वेळीं अधिक अभ्यास झाला पाहिजे होता. त्या वेळीं पॅरिसमध्ये जाऊन अधिक अभ्यास करण्याची इच्छा होती; पण ती सफल झाली नाही.

प्रश्न- चित्रकलेपैकी कोणता भाग अधिक आवडतो?

उत्तर- ऐतिहासिक, पौराणिक व आध्यात्मिक चित्रें काढणें मनापासून आवडतें; पण त्या वेळीं परिस्थिति प्रतिकूल असल्यामुळे हें घडलें नाहीं.

प्रश्न- आजपर्यंत चित्रें किती काढून झालीं? पैकी अत्यंत सुंदर चित्रें कोणतीं व कोणाच्या संग्रहीं तीं आहेत?

उत्तर- चित्रें पुष्कळ काढलीं; पण पिठापुरम्‌च्या महाराजांजवळ वर्ष दीड वर्ष राहून जशीं चित्रें करतां आलीं, तशीं दुसरीकडे करतां आलीं नाहीत. कांही दृश्यें औंधच्या महाराजांकडेहि आहेत.

प्रश्न- अजण्ठा, रजपूत, वेरूळ, मोगल, बंगाली इ० चित्रपद्धती· विषयीं आपलें काय मत आहे?

उत्तर- या सर्व भारतीय पद्धति आहेत व त्यांत एक प्रकारची रमणीयता आहे. या पद्धतींमध्ये सध्यासुद्धा जर कोणी विशेष प्रवीण होईल, तर त्याची वाहवा युरोपमध्येहि सहज होईल. या दृष्टीनेहि या कलेचें सध्या महत्त्व आहे. केवळ चित्रकलेच्या दृष्टीने म्हणावयाचें झालें तर (Decorative) सजावटी चित्रकलेचा तो भाग आहे; म्हणजे ती कांही सर्वांगपूर्ण कला नव्हे. ती केवळ सजावटी कला आहे. एवढी दृष्टि ठेवली म्हणजे हिंदी चित्रकले-बद्दल गैरसमज होणार नाही.

केवळ निसर्गाचें अनुकरण करून निर्माण होणाऱ्या चित्रकलेपेक्षा खऱ्या भारतीय चित्रकलेचें वैशिष्टय फार मोठें आहे. त्या वैशिष्ट्या-कडे बंगाली लोकांचें लक्ष्य प्रथम वेधलें. युरोपियन लोक सध्या या कलेकडे फारच आकर्षिले गेले आहेत. इटली-रोममध्ये तर या भारतीय

चित्रकलेचा विशेष अभ्यास करण्याचें स्वतंत्र खातें उघडलें असून त्यावर फार मोठ्या कलाभिज्ञ अधिकाऱ्याची नेमणूक झाली आहे. तेथे हिंदी, तिबेटी, ब्रह्मी, चिनी पुराण-चित्रांचा फार मोठा संग्रह आहे. कदाचित् उत्तम कलापूर्ण हिंदी चित्रें पाहण्यासाठी यापुढे इटलींतील रोम शहरीं जावें लागेल कीं काय, असें आज वाटूं लागलें आहे.

सध्या हिंदुस्थानांत बऱ्याच चित्रशाळांमधून हिंदी चित्रकला शिकवली जात आहे. ही कला येथे वाढत गेली व त्यांत हिंदी वैशिष्ट्यच टिकून राहिलें, तर हिंदी मनाचें आविष्करण होण्यास तें एक फारच मोठें कार्यक्षेत्र निर्माण झाल्यासारखें होईल.

प्रश्न- कला व नीति यांचा संबंध कसा असावा ?

उत्तर- मनुष्य जें काय करीत असेल, तें त्याने मानवी उन्नतीसाठी, मानवी शक्तींच्या सात्त्विक विकासासाठीच केलें पाहिजे. एखाद्या रणशूराने निष्कारण आपलेच हातपाय तोडण्यांत कितीहि कौशल्य दाखविलें, तरी त्यामुळे त्याची प्रशंसा होणार नाही. मनुष्याचा विकास हा शारीरिक, मानसिक, बौद्धिक व आत्मिक इतक्या क्षेत्रांत तरी व्हावयाचा असतो व यांपैकी जर कशाचा त्याग करावयाचा असेल, तर तो मागच्यासाठी पुढच्याचा करावयाचा नसून पुढच्यासाठी मागच्याचा त्याग करावयाचा असतो. म्हणजे शरिराच्या विकासासाठी आत्मिक विकासांत विघ्न आणतां कामा नये; तर आत्मिक विकासासाठी शारीरिक उन्नतींत थोडा कमीपणा राहिला, तरी चालेल; अशा भावार्थाने वरील उत्तर समजावें. नीति म्हणजे हा वरील मानवी विकास पूर्ण होण्यास सहाय्यक होणारी वागणूक. याशिवाय नीतीला दुसरा अर्थ नाही. खरी कला आत्मिक

विकासाला सहाय्यकच असते. कला ही खरोखर आत्म्याचीच लीला आहे. सध्या जे कवि किंवा चित्रकार 'कला व नीति यांचा संबंध नाही' असें म्हणतात, त्यांच्या त्या विकृत कल्पनेला शास्त्रीय वातावरणांत स्थान नाही, असें मला वाटतें.

प्रश्न– महाराष्ट्रीय चित्रकारांनी कोणता आदर्श पुढे ठेवावा ? आणि त्या मार्गाने प्रयत्न कसा करावा ?

उत्तर– औन्धाधिपति हे सोडले, तर बाकीचे बहुतेक सर्व महाराष्ट्रीय चित्रकार पोटार्थी आहेत. कलाप्रेमी अत्यंत दुर्मिळ. जेव्हा कलाप्रेमी निघतील, तेव्हा त्यांचा आदर्श ते ठरावितील. पोटार्थी माणसांना कांही आदर्श असूंच शकत नाही. कलाप्रेमी चित्रकारांचा काल महाराष्ट्रांत अजून यावयाचा आहे. त्यास बराच अवकाश आहे. प्रयत्न करावयाचा असेल, तर उच्च ध्येय चित्रांत प्रतिबिंबित करण्याचा प्रयत्न करीत जावें. पैशासाठी चित्रें काढण्याऱ्याकडून तें साधणें शक्य नाही.

प्रश्न– चित्रकला ही ध्येयात्मक असावी कीं यथार्थ असावी ?

उत्तर– यथार्थ चित्रकला ही शिकाऊ स्थितींत अत्यंत आवश्यक आहे. जितकी उन्नति अधिक होईल, तितकी ध्येयात्मकता आपोआपच येत जाते. शेवटची परमोच्च अवस्था शुद्ध ध्येयात्मकच असते. कारण वास्तववादाने मनुष्याच्या आत्म्यास कधीहि समाधान प्राप्त होत नसतें. वास्तववाद हा अगदीच स्थूल व प्राथमिक अविकसित स्थितीचा द्योतक आहे.

**प्रश्न–** **चित्रकलेचा सर्वसाधारण समाजाच्या जीवनाशीं कितपत संबंध असावा किंवा असतो ?**

**उत्तर–** प्रत्येक कलेचा मानवी जीवनाशीं संबंध आहेच, त्याप्रमाणे तो चित्रकलेचाहि आहे. ही कला जर समाजामध्ये मुरली जाईल, तर समाज अधिक सुसंस्कृत होईल. मानवी संस्कृतीचा कलेशीं व चित्रकलेशीं विशेषच संबंध आहे. लेखनकलेपेक्षा चित्रकलेचा संबंध मानवी जीवनाशीं अधिक घनिष्ठ आहे व तो अधिक प्राचीनहि आहे. मनुष्य अक्षर-लेखन विसरूं शकेल; पण चित्र-लेखन विसरणें त्यास शक्य नाहीं.

**प्रश्न–** **पाश्चात्य व हिंदी चित्रकलांपैकी कोणती कला आपणांस अधिक आवडते ?**

**उत्तर–** दोन्ही पद्धति आवडतात. दोहोंतहि रमणीयता आहे. दोहोंचें क्षेत्र भिन्न आहे. दोहोंपासूनहि आम्हांस घेण्यासारखें पुष्कळ आहे. म्हणून एक आवडते व दुसरी आवडत नाहीं, असें नाहीं. पण दोहोंत आवडनिवड करावयाचीच असेल, तर उत्तम पाश्चात्य चित्रकलेपेक्षा उत्तम हिंदी चित्रकलाच मला अधिक आवडते.

**प्रश्न–** **चित्रकला ही ध्येयात्मक असावी कीं प्रचारात्मक असावी ?**

**उत्तर–** प्रचार हा ध्येयाचाच करावयाचा असल्यामुळे या विषयामध्ये मतभेदाला स्थान असणें शक्य नाहीं. ध्येय काय असावें, तें ठरलें की, त्याचा प्रसार करणें आवश्यकच होणार. व्यक्तीचें व राष्ट्राचें ध्येय निश्चित ठरणें अगत्याचें आहे. राष्ट्रहिताच्या विरुद्ध व्यक्तीचें ध्येय कधीहि असतां नये. राष्ट्र संपूर्ण स्वातंत्र्यासाठी लढत असतां

व्यक्तीने शत्रूकडून लांच घेऊन, त्यास मदत करून आपलें हित साधणें हें कोणाचेंहि ध्येय होऊंच शकत नाहीं. राष्ट्राचें ध्येय राष्ट्रांतील धुरीणांनी ठरवलें म्हणजे त्याचा प्रसार हरएक व्यक्तीपर्यंत करणें, हेंच चित्रकारांनी करावयास पाहिजे. आज 'आपल्या हिंद-राष्ट्राचें ध्येय पूर्ण स्वातन्त्र्य' हें ठरलें आहे. ज्या चित्रकृतीने संपूर्ण स्वातन्त्र्य व्यक्त होईल व त्यासाठी आत्मबलिदान करण्याची तयारी जनतेची होईल, अशा तऱ्हेचीं चित्रें काढून राष्ट्राची सेवा करणें हें आजचें चित्रकारांचें कर्तव्य आहे.

याविषयी चित्रकारांना अनेक प्रसंगांचीं चित्रें काढतां येतील; पण या चित्रांतून संपूर्ण स्वातन्त्र्याचा ध्वनि स्पष्ट निघाला पाहिजे. जशी साहित्यिकांना तशींच चित्रकारांना स्वातन्त्र्याची तळमळ लागलेली असेल, तर तीं त्यांच्या कृतींत व्यक्त होईल. जसे कांही साहित्यिक अशा स्वातन्त्र्ययुद्धाच्या आणीबाणीच्या वेळींहि जनतेचीं मनें आपुकमापुकांच्या प्रणयी कथांनी दूषित करून आपला स्वार्थ साधत आहेत, त्याचप्रमाणे जर चित्रकारहि करतील, तर तें त्यांचें कृत्य तसेंच निंदनीय ठरेल; कारण सध्या राष्ट्राचें ध्येय 'पूर्ण स्वातंत्र्य' हें ठरलेलें आहे. यासाठी ज्याने शक्तिसंवर्धनाकडे जनतेचा कल वाढेल, ब्रह्मचर्याच्या साधनांकडे अभिरुचि वाढेल व आपली अभेद्य संघटना घडून येईल, त्या प्रकारचीं चित्रें सध्या चित्रकारांनी काढलीं पाहिजेत.

कित्येक समजतात की, मयसभेंतील व लंकेंतील शिल्प होतें, तें आर्यशिल्प होतें. पण मयासुर हा असुर होता व रावणी लंकेंतहि असुरच शिल्पी होते. असुर हे हिंदी आर्य नव्हते. ते असीरियन असावे. ते येथे येऊन राहिले व त्यांना आर्यराजांनी धन देऊन

अद्भुत कारागिरी करवून घेतली. पण ती आर्यशिल्पाची कारागिरी नव्हे. मयासुराने मयसभा बनवण्यासाठी सर्व रंगसामान, सर्व कारागीर असुर देशांतून आणले होते; इतकेंच नव्हे तर मयसभेच्या चारही बाजूंस पहारा करण्यासाठी हजारो असुरहि विदेशीच आणलेले होते ! पांडवांच्या खजिन्यांतून त्यांचा खर्च झाला, पण एकहि आर्यशिल्पकारास या कारागिरीचा अनुभव मिळालेला नाही. मयासुर पूर्ण स्वदेशाभिमानी होता, पण आपले सर्व सम्राट् मात्र तसे नव्हते. म्हणून संस्कृत भाषेंत वर्णिलली सर्व कारागिरी आर्यांची होती, असें म्हणणें चुकीचें होईल.

हिन्दी चित्रकलेच्या संबंधाने बोलावयाचें तर असें म्हणतां येईल की, उत्तमोत्तम हिंदी चित्रकलेचे नमुने सध्या हिंदुस्थानांत फार तर शेपन्नासच मिळतील. बाकीचीं चित्रे तिसऱ्या दर्जाचीं असलीं तर असतील. तीं पहिल्या प्रतीचीं होण्यासाठी चित्रकारांनी अहर्निश खटपट केली पाहिजे.

हिन्दी चित्रकार हा आपल्या शुद्ध व उच्च ध्येयाने रंगून निघालेला पाहिजे; म्हणजे त्याच्याकडून त्या ध्येयाच्या प्रसारासाठी जें चित्र बनेल तें उत्तमच बनेल, यांत शंका नाही.



# भारतीय चित्रकलेचें वैशिष्ट्य

पुष्कळ लोकांची अशी खोटी समजूत झालेली आहे की, चित्रकलेमध्यें देशपरत्वें भेद असूं शकणार नाही. ज्याप्रमाणे गणितामध्ये २+२ = ४ हे सर्व देशांत सारखेच होत असतात, कोणत्याही देशांत ते ३ किंवा ५ होत नाहीत, त्याचप्रमाणे पदार्थांचीं दृश्य चित्रें काढणें, हें सर्व ठिकाणीं सारखेंच होणें संभवनीय आहे; त्यांत देशपरत्वें विशेषता कशी होणें शक्य आहे ?

कोणाही माणसाचें चित्र (पोर्ट्रेट) काढावयाचें असतां, किंवा कोणत्याही सुंदर देखाव्याचें चित्र काढावयाचें असतां, तें चित्र त्या त्या माणसासारखें किंवा त्या त्या दृश्यासारखें वठलें पाहिजे, म्हणजे मुळाची ओळख चित्रावरून पटली पाहिजे, यांत शंका नाही. पण ही ओळख उत्तम पटली म्हणजे उत्तम चित्र तयार झालें, असें मात्र म्हणतां येणार नाही. ओळख पटणें, ही गोष्ट स्वतंत्र आहे व चित्र उत्तम होणें, ही गोष्ट अगदी स्वतंत्र आहे.

## धंदा व कला.

जर केवळ उत्तम ओळख पटण्यानेच काम भागणें शक्य असतें, तर नुसत्या फोटोग्राफवरून तें काम सहज भागलें असतें. पण "चित्रकले" ची भूक केवळ फोटोग्राफवरून भागत नाही; म्हणूनच फोटोग्राफीमध्ये सुद्धा साधे "धंदेवाईक फोटोग्राफ" व "हुन्नरीचे फोटोग्राफ" (Art-Photographs) असे सध्या भेद होऊन चुकले आहेत. साध्या धंदेवाईक फोटोग्राफांनी गांवढळ माणसाचेंच समाधान होतें; पण सुसंस्कारसंपन्न कलाभिज्ञ माणसाचें "हुन्नरीय फोटोग्राफां" शिवाय समाधान होत नाही. साध्या धंदेवाईक फोटोंमध्ये प्रत्येक पदार्थ ठळक व अत्यंत व्यक्त दाखवला जातो, तसा तो "हुन्नरीय फोटोग्राफा" मध्ये दाखवला जात नाही; तर यामध्ये कांही भागांचा उत्तम फोकस् दाखवून इतर भाग अंधुक व अस्पष्ट दाखवलेले असतात. तसेंच कांही भाग विशेष स्पष्ट दाखवून इतर अस्पष्ट व किंचित् गौण दाखवलेले असतात, त्यामुळे चित्रकलेचें तत्त्व जाणणारांना यांपासूनच विशेष हृदयस्पर्शी आनंद होत असतो व असे फोटो पाहिल्या-बरोबर त्यांच्या तोंडांतून एकदम "वाहवा !" असा शब्द निघतो.

याचें तात्पर्य असें की, सर्व भाग सारखे ओळखतां आले किंवा मुळासारखे दाखवले गेले म्हणजेच काम झालें असें नसून, तसे ते न दाखवणें ह्यालाच विशेष महत्त्व चित्रकलेमध्ये आहे. म्हणून दोन अधिक दोन चार होण्याचा नियम येथे लागू होत नाही. दोन चित्रकार एकाच दृश्या-वरून विभिन्न महत्त्वाचीं चित्रें तयार करूं शकतात, त्याचें कारण तरी हेंच आहे. "त्या दृश्यामध्ये कोणत्या पदार्थाला कसें महत्त्व द्यावें व इतर पदार्थांना किती व कसें गौणत्व दाखवावें," हें ठरवणाऱ्या चित्रकारावर चित्राचें कौशल्य अवलंबून असल्यामुळे दृश्य जरी एकच असलें तरी शेवटच्या चित्रा-मध्ये महदन्तर होतें.

## चित्रांचे दोन भेद.

वरील कारणांमुळे चित्रांचे मुख्य दोन भेद झालेले आहेत. एक (Realistic Painting ) यथार्थ चित्रें व दुसरीं (Idealistic Painting ) भावनात्मक चित्रें. यथार्थ चित्रें काढणारे चित्रकार दृश्याबरहुकुम आपलीं चित्रें तयार करण्याच्या खटपटींत असतात व भावनात्मक चित्रें काढणारे चित्रकार आपलीं चित्रें दृश्याप्रमाणें झालीं नाहीत तरी चालेल, पण आपली भावना त्यांवरून व्यक्त झाली म्हणजे आपलें काम झालें, असें समजतात. यथार्थ चित्रें काढणारांपेक्षा भावनांचें उद्दीपन करणारीं चित्रें काढणारे चित्रकार अधिक योग्यतेचे आहेत, असें युरोपांतील सर्व श्रेष्ठ चित्रकारांनीही मानलें आहे.

## यथार्थ चित्रांचें स्वरूप.

यथार्थ चित्रें ( Realistic Painting ) हीं मुळासारखीं अगदी यथार्थ काढलीं जातात, अशी पुष्कळांची समजूत आहे. ही समजूत कांही साधारण लोकांचीच आहे असें नसून चांगल्या चांगल्या चित्रकारांचीही आहे. पण ही समजूत इतकी चुकीची आहे की, तितकी चूक वास्तविक कोणीही करतां कामा नये. यथार्थ चित्रें हीं अगदी मुळासारखीं नसतातच, असें जर आम्ही म्हटलें, तर तें सध्या कोणास खरेंसुद्धा वाटणार नाही; इतका या यथार्थ चित्राच्या खरेपणाचा मोह सर्व लोकांस पडलेला आहे !

यथार्थ चित्रपद्धतीने काढलेला माणसाचा चित्रपट ( पोर्ट्रेट ) घ्या, त्यामध्ये आपणांस दिसेल की, चित्रांतील तोंड अधिक स्पष्ट व अधिक उठावदार आहे व मागच्या दृश्यां ( Back-ground ) मधील पदार्थ वाजवीपेक्षा फाजील अस्पष्ट केलेले आहेत. इतकेंच नव्हे तर त्याच चित्राचे हातपायसुद्धा फाजील अस्पष्ट दाखवलेले आहेत. त्याच माणसाचे नोकर चाकर जवळ दाखविले असले तर तेसुद्धा त्याच्यापेक्षा पुष्कळ अंधुक

दा खवलेले असतात. या गोष्टी चित्रकारांस नाकबूल करतां यावयाच्या नाहीत. ही गोष्ट झाली एका माणसाच्या ( Portrait ) चित्राची.

ऐतिहासिक किंवा पौराणिक चित्रें जीं याच यथार्थ पद्धतीने काढलेलीं असतात, त्यांमध्येसुद्धा मुख्य विभूति ठळक काढलेली असते व त्या मानाने इतर पात्रें अस्पष्ट रेखाटलेलीं असतात.

देखाव्याच्या चित्रांतसुद्धा चित्रकाराच्या दृष्टीने जो भाग महत्त्वाचा असतो, तो विशेष स्पष्ट दाखवला जातो व गौण असतो, तो अधिक अस्पष्ट दाखवला जातो. इतकेंच नव्हे तर कांही प्रसंगीं एखादा भाग अनावश्यक वाटला तर तो सोडूनही दिला जातो.

ज्यांना यथार्थ चित्र ( Realistic Painting ) अशी संज्ञा आहे तींसुद्धा वर दाखवल्या कारणाने पुष्कळ अंशीं " अ-यथार्थ " ( Unrealistic ) असतात व असें असूनसुद्धा त्यांस लोक मोहाने व सवयीमुळे यथार्थ चित्रें असें समजतात. जर हें खरें आहे, तर यथार्थ-चित्रवादी चित्रकारांना भावनात्मक चित्रवाद्यांच्या चित्रांना नांवें ठेवण्याचा अधिकार कसा पोचतो, हें समजणें कठीण आहे.

## दृक्प्रत्यय ( Perspective ).

भावनात्मक चित्रांचा विचार करावयाच्यापूर्वी यथार्थ चित्रकलेंतील आणखी कांही मुद्दयांचा येथे विचार करणें आवश्यक आहे. यामध्ये ( Perspective ) दृक्प्रत्ययासंबंधाने विशेष विचार झाला पाहिजे; कारण हिंदी चित्रकला ही दृक्प्रत्ययाच्या नियमाला मानीत नाही, किंवा तीमध्ये या नियमांच्या अनुरोधाने चित्र काढलेलें नसतें, असें पुष्कळांना वाटतें. म्हणून दृक्प्रत्यय म्हणजे काय व तो चित्रांत कसा दाखवला जातो, या संबंधाने थोडें विवेचन करणें आवश्यक आहे. सध्या या दृक्प्रत्यय ( Per-

spective ) शास्त्राचे मुख्य दोन भाग मानले जातात. एक रेखात्मक ( Lineal Prespective ) दृक्प्रत्यय व दुसरा ( Airial Prespective ) अंतरिक्षात्मक दृक्प्रत्यय. हे दोनच दृक्प्रत्यय (Perspective) आहेत, असें सध्या समजलें जातें.

रेखात्मक दृक्प्रत्ययाच्या नियमांप्रमाणे अंतराच्या अनुरोधाने रेषा लहान लहान होत जातात व दूरचे पदार्थ लहान आकाराचे दिसूं लागतात. घराच्या खिडकींतून दूरचा डोंगर दिसतो, याचें कारण तो दूरचा डोंगर अति दूर असल्यामुळे खिडकीच्या आकारापेक्षाही लहान दिसूं लागला हें होय. अंतरिक्षात्मक दृक्प्रत्याप्रमाणे अंतराच्या अनुरोधाने जसजसा मध्ये हवेचा पडदा अधिक होतो, त्याप्रमाणे दूरच्या पदार्थांचा रंग अंधुक किंवा निळसर होत जातो. दूरचे डोंगर निळे दिसतात, त्याचें कारण हेंच आहे.

हे दोन दृक्प्रत्यय यथार्थ चित्रकले ( Realistic Painting ) मध्ये प्राधान्येंकरून दाखवलेले असतात. हे दृक्प्रत्यय हिंदी चित्रकलेमध्ये नाहीत व यासाठी ही चित्रकला वैगुण्याने युक्त आहे, असा आरोप या हिंदी चित्रकलेवर पुष्कळ लोक करतात, म्हणून यासंबंधाचा विचार येथे प्रामुख्याने केला पाहिजे.

## दृक्प्रत्यय किती प्रकारचा आहे ?

आधुनिक युरोपियन चित्रकारांनी जो दोन प्रकारचा दृक्प्रत्यय अनुभविला आहे, तो वर दिला आहे. युरोपियनांची प्रकृति भौतिक दृष्टीने व्याप्त झालेली असल्यामुळे अभौतिक दृक्प्रत्यय म्हणून कांही असूं शकेल, हें त्यांच्या ध्यानींमनींही अजूनपर्यंत आलेलें नाही !! भौतिक दृक्प्रत्यय ( Physical Perspective ) यूरोपियन चित्रकारांनी अनुभवलें आहे व त्यामध्ये ते परिपूर्ण झाले आहेत; पण अभौतिक, आत्मिक किंवा दिव्य दृक्प्रत्यय ( Spiritual Perspective ) म्हणून कांही आहे व

तें अनुभवतां येतें व चित्रपटावर दाखवतां येतें, ही गोष्ट अजून युरोपियन चित्रकारांना समजावयाची आहे. भौतिक दृष्टी ( Physical Vision ) ने युरोपियन लोक जगताकडे पाहतात, पण अभौतिक आत्मिक दिव्य दृष्टी ( Spiritual Vision ) ने जगाकडे पाहतां येतें. हेंसुद्धा अजून त्यांस समजलेलें नाही.

यावरून वाचकांच्या लक्ष्यांत येईल की, दिव्य दृष्टीने होणारा दृक्प्रत्यय हा युरोपियन यथार्थ चित्रकलेंत मुळींच नाही. जे लोक हिंदी चित्रकलेंत दृक्प्रत्यय ( Perspective ) नाही असें म्हणतात, त्यांस युरोपियन यथार्थ चित्रकलेंतसुद्धा एक दृक्प्रत्यय नाही, असें या दृष्टीने म्हणावें लागेल व जर हा ( Spiritual perspective ) दिव्य दृक्प्रत्यय हिंदी चित्रकलेंत आहे असें सिद्ध झालें, तर हिंदी चित्रकलेंत दृक्प्रत्यय नाही असें म्हणणारांचीं तोंडेंच बंद होतील; कारण जर भौतिक दृक्प्रत्यय हिंदी चित्रकलेंत नसला, तर दिव्य दृक्प्रत्यय युरोपच्या यथार्थ चित्रकलेंत नाही, असें सिद्ध झाल्यामुळे त्यांतही एक प्रकारचा ( Perspective ) दृक्प्रत्यय नाही, असें सिद्ध होईल व दोनही चित्रकलांवर दृक्प्रत्ययाच्या अभावाचा दोष सारखाच लागू होईल.

## दृक्प्रत्यय म्हणजे काय ?

दृक्प्रत्यय ( Perspective ) म्हणजे दृष्टीचा अनुभव. दृष्टि निदान दोन प्रकारच्या तरी आहेत. एक भौतिक दृष्टि किंवा चर्मचक्षु व दुसरी अभौतिक किंवा दिव्य दृष्टि होय. या दोनही दृष्टींनी जगाकडे बघतां येतें. जर दृक्प्रत्यय ( Perspective ) नजरेने ठरवावयाचे असतील व जर या दोन दृष्टि खात्रीने असतील, तर दोन प्रकारचे दृक्प्रत्यय ( Perspective ) मानणें आवश्यकच आहे. अर्जुन जन्मापासून जगाकडे पहातच होता; पण भगवंतांनी जेव्हा त्याला दिव्य दृष्टीने पहावयास

शिकविलें, तेव्हा त्यास जग निराळेंच दिसलें. जर दिव्य दृष्टीने जग निराळया तऱ्हेचें दिसत असेल, तर त्या दृक्प्रत्यया ( Divine perspective ) प्रमाणे काढलेलें चित्रही सर्वस्वीं निराळेंच असणें स्वाभाविक आहे, हें कोणीही नाकबूल करूं शकणार नाही. चित्रकलेमधील हा दिव्य दृष्टीचा संबंध नीटपणाने समजल्याशिवाय हिंदी चित्रकला व तीमधील वैशिष्टय हीं बरोबर रीतीने समजणार नाहीत. इतक्या विवेचनावरून दृक्प्रत्ययाचे पुष्कळच भेद आहेत, ही गोष्ट सहज समजणार आहे. यांपैकी कांही मुख्य भेद येथे देतों :—

| | |
|---|---|
| **भौतिक** | (Physical) |
| रेखात्मक दृक्प्रत्यय | Lineal perspective |
| अंतरिक्षात्मक दृक्प्रत्यय | Airial perspective |
| **अभौतिक** | (Spiritual) |
| दिव्य दृक्प्रत्यय | Divine perspective |
| आत्मिक दृक्प्रत्यय | Spiritual perspective |
| भावनात्मक दृक्प्रत्यय | Perspective of feelings |

याशिवाय सन्मानाची दृष्टि, अधिकाराची दृष्टि, गांजलेल्याची दृष्टि, पतिताची दृष्टि, आत्मिक स्वरूपीं लीन झालेल्याची दृष्टि, भगवद्भक्ताची दृष्टि, अशा किती तरी दृष्टि आहेत व त्या त्या प्रत्येक दृष्टीचे दृक्प्रत्ययही अगदी भिन्न आहेत. जग जसें भक्ताला दिसतें, तसें तें कामी पुरुषाला दिसत नाही. म्हणून दोघांचे दृक्प्रत्यय ( Perspective ) अगदी भिन्न असतात, हें आधी नीट समजलें पाहिजे, म्हणजे हिंदी चित्रकलेकडे कसें पहावें तें समजेल व पहिले दोनच दृक्प्रत्यय तेवढे खरे व इतर खोटे, असें म्हणण्याचें धाडसही कोणी करणार नाही.

## दृष्टींचा भेद.

भौतिक दृष्टीने जगामध्ये लहानमोठा, उच्चनीच वगैरे भेद दिसतात व या वेळीं पहिल्या दोन दृक्प्रत्ययांचा अनुभव येतो. पण जेव्हा दिव्य दृष्टीने जगाकडे पाहण्याची सवय होते, तेव्हा वरील भेद दिसेनासे होऊन जगाचें दृश्य निराळेंच नजरेसमोर येतें. या वेळचा दृक्प्रत्यय ( Perspective ) पूर्वीच्या वेळच्या दृक्प्रत्ययापेक्षा भिन्न असतो, हें जर समजलें तर हिंदी चित्रकलेमध्ये दृक्प्रत्यय ( Perspective ) नाही, असें जे म्हणतात, त्यांच्या म्हणण्यांत कांही अर्थ नाही, असें ठरेल. याला उदाहरण असें–

भौतिक दृष्टीने राजाचा अधिकार फार मोठा, दरारा मोठा व त्याची शक्तीही मोठी व त्याच्याशीं तुलना केली असतां एखाद्या दरिद्री माणसाचा अधिकार फारच लहान हें खरें.

पण अभौतिक दिव्य दृष्टीने तो निर्धन मनुष्य जर साधुसंत असेल, तर तो आध्यात्मिक भूमिकेमध्ये फारच मोठा असल्यामुळे त्याच्या पुढे अधिकारसंपन्न मोठ्या सम्राटाचीही किंमत राहणार नाही.

पहिल्या दृष्टीने चित्र काढलें तर त्यांत राजा ठळक व मोठा दाखवला जाईल व दुसऱ्या दृष्टीने चित्र काढलें तर त्यांत तो अकिंचन साधु महात्मा फारच ठळक व मोठा दाखवला जाईल व सम्राट् अगदी अस्पष्ट किंवा लहान दाखवला जाईल. गौतम बुद्धाचें चित्र आकाराने फार मोठें व त्याच्या अपेक्षेने इतर शिष्यांचें लहान दाखवण्याचा परिपाठ याच दृक्प्रत्यया ( Perspective ) च्या अनुरोधाने प्रचारांत आला, एवढें येथे सुचविलें म्हणजे हिंदी चित्रकलेमधील दृक्प्रत्यय( Perspective ) कोणत्या दृष्टीचा असतो, हें यावरून तेव्हाच समजूं शकेल.

या ठिकाणीं कित्येक असें म्हणतील की, घरांदारांचीं चित्रें व इतर दृश्य पदार्थांचीं चित्रें हीं तरी भौतिक दृक्प्रत्ययाच्या नियमाला अनुलक्षून पाहिजेत कीं नकोत ? यावर उत्तर असें की, जर चित्रांतील सर्व भाग भौतिक दृष्टीने जसे दिसतात तसे अगदी हुबेहुब काढले, तर तो देखावा भौतिक होईल. हा देखावा भौतिक नाही; पाहणाराने कांही केलें तरी त्याला हें स्पष्ट कळलें पाहिजे की हा देखावा भौतिक नाही. हें कळण्यासाठी त्यांतील रेखाचित्र, वर्णविन्यास व इतर ठेवण अगदी हुबेहुब भौतिक जगांत जशी दिसते, तशी असतांच नये. कांही तरी विलक्षणपणा हा पाहिजेच पाहिजे. मग हा विलक्षणपणा कोणी रेखाविकाराने दाखवो, वर्णविकाराने दाखवो, अथवा दोहोंनी मिळून दाखवो. पण सृष्टीशीं तुलना करून पाहतांना थोडा तरी अस्वाभाविकपणा अवश्य पाहिजे. मग तें चित्र कामी जनाचें असो, साधूचें असो अथवा युद्धदुर्मद वीराचें असो. कामविकार, साधुत्व व वीर्य हे आत्मिक भाव आहेत व ते अभौतिक भाव आहेत, म्हणून ते दाखवावयाचे असतांना जरी दृश्यजगांतील वस्तूंचा आश्रय करावयाचा असला, तथापि त्यांतील अभौतिक भावांचें आविष्करण करण्यासाठी कोणत्या ना कोणत्या रीतीनें अस्वाभाविकपणा हा दाखवलाच पाहिजे. त्याशिवाय इष्ट उद्देश सिद्धीस जाणार नाही.

## अस्वाभाविकपणा.

बुद्धाचें चित्र अस्वाभाविकपणाने मोठें दाखवणें व त्याच्या शिष्यांचें चित्र त्या प्रमाणाने फारच लहान दाखवणें, ही गोष्ट वरील कारणासाठीच योग्य आहे. कित्येक चित्रकार वर्णाच्या ठळकपणाने किंवा अस्वाभाविक अस्पष्टपणाने ही दाखवितील व कित्येक रेषांच्या अस्वाभाविक विन्यासाने दाखवितील. हा ज्याच्या त्याच्या खुषीचा भाग आहे; पण चित्रांतील 'अ-भौतिकत्व' व्यक्त करण्यासाठी रेषा व वर्ण यांमध्येही अस्वाभाविकपणा पाहिजे, हें उघड आहे.

## नियमांचें उल्लंघन.

सध्या युरोपांत चित्रकलेमध्ये "नवयुग" ( Modern art ) सुरू झालें आहे. या नवयुगाचे प्रवर्तक आचार्य उघडपणें असें बोलूं लागले आहेत की, चित्रकलेचे बांधीव नियम पाळून चित्रें काढणें, हें गौण धंदेवाईक चित्रकारांचें काम आहे. त्या नियमांचें उल्लंघन करून नियमांच्या पलीकडील अतींद्रिय वातावरणांतील स्वातंत्र्यांत मग्न होऊन हृदयाच्या भावना चित्रांत वठवणें, हेंच श्रेष्ठ चित्रकाराचें परम ध्येय असलें पाहिजे; म्हणजे युरोपियन नवयुगांतील चित्रकार हे तत्त्वदृष्टीने हिंदी चित्रकलेंतील तत्त्व कसें मानूं लागले आहेत, हें यावरून उघड होणार आहे. तात्पर्य, दृक्प्रत्ययाच्या नियमांचें व इतर नियमांचें उल्लंघन करणें, हें दूषण नसून तेंच हिंदी चित्रकारांच्या विशेषतेचें प्रधान अंग आहे. भौतिक नियमांनी बद्ध झालेला चित्रकार हा अभौतिक मुक्त अवस्थेंतील अनुभव कसे व्यक्त करणार? मुक्त अवस्थेंतील अनुभव व्यक्त करण्यास नियमांच्या बाहेरील स्वतंत्र वातावरणांत स्वेच्छेने संचार करण्याची शक्ति पाहिजे, हें कोण नाकबूल करील?

## पूर्वाचार्यांचें ठराविक प्रमाण.

येथे कोणी असें विचारील की, हिंदी चित्रकार हे अभौतिक ज्ञानाने संपन्न आहेत किंवा असत, असें कशावरून मानावें? याला प्रमाण काय? हा प्रश्न सयुक्तिक आहे. आम्ही असें म्हणत नाहीं की, हरएक हिंदी चित्रकार अभौतिक आत्मिक अनुभवाने संपन्न असे किंवा आहे; असें होणें शक्यही नाही. चित्रकार हे सामान्य प्रतीचे सांसारिक मनुष्यच असणार, हें उघड आहे. अशा माणसांकडून एक सांच्याचीं अभौतिक चित्रें निघावीं, अशी योजना हिंदी चित्रकलेच्या पूर्वाचार्यांनी करून ठेविलेली आहे, ही गोष्ट प्राधान्येंकरून येथे दाखवणें आहे.

हात, पाय, कमर, गळा, तोंड, डोळे वगैरे माणसांच्या– स्त्रियांच्या व पुरुषांच्या– अवयवांचें चित्रण कसें व्हावें, याचे नियम पूर्वाचार्यांनी करून ठेवले आहेत. हत्तीच्या सोंडेसारखा हात, केळीसारखी जंघा, शंखासारखी मान, कमलपत्राप्रमाणे डोळे, इत्यादि नियम ठरवून टाकलेले आहेत व सर्व हिंदी चित्रकार या नियमांच्या पूर्णतेसाठी आपली वैयक्तिक सत्ता पूर्णपणाने अर्पण करीत आलेले आहेत. हिंदी चित्रकारांना वळणच असें मिळालेलें आहे की, आजपर्यंत कोणीही या नियमांचें उल्लंघन केलेलें नाही.

हें जें सादृश्य ठरवलें गेलें आहे, तें उगीच नाही. या हाडामांसाच्या डोळ्यामध्ये कमलदलाची जी झांक आहे, तीच रमणीय आहे. त्याचप्रमाणे हाडामांसाचे अवयय सुंदर दिसत नसून त्यांमधून जे अन्य सदृश पदार्थांचे दिव्य भाव दिसतात, तेच प्रियकर वाटत असतात व हे सदृश भाव अधिक व्यक्त करून दाखवल्यानेच चित्रांमधील सौंदर्य अधिक खुलत असतें. भौतिक दृश्यांमधून अभौतिक भाव व्यक्त करण्याची ही रीति हिंदी चित्रकलेच्या पूर्वाचार्यांनी फार प्राचीन कालापासून ठरवलेली आहे व ती आजपर्यंत जशीच्या तशी चालत आलेली आहे.

याशिवाय अवयवांचें प्रमाणही पूर्वाचार्यांनो ठरवलेलें आहे. अमुक देवतेचें चित्र अमुक प्रमाणांतच असलें पाहिजे; धर्माचार्य, धर्मसंस्थापक, त्यांचे शिष्य, राजा, प्रजा, नोकर वगैरेंचीं प्रमाणेंही ठरलेलीं आहेत. हीं प्रमाणें ठरवून टाकतांना त्यांनी त्यांचे परस्पर अभौतिक संबंध कल्पून त्या प्रमाणानुरोधाने हीं प्रमाणें ठरवलेलीं आहेत व त्या प्रमाणांमधूनच हिंदी चित्रकार आपआपलीं चित्रें काढीत असतात. यामुळे स्वतः चित्रकाराला अभौतिक आत्मतत्त्वाची व त्याच्या शक्तीची जाणीव नसली तरी वरील ठरलेल्या नियमांच्या अनुरोधाने ते आपआपलीं चित्रें काढीत असल्यामुळे न समजतां सुद्धा त्यांचीं चित्रें जशीं वठलीं पाहिजेत तशीं वठत असतात.

वर्णविन्यासाविषयींही असेच नियम आहेत. सात्त्विक चित्रामध्ये अमुक प्रकारचा रंग असावा, राजसिक चित्राचा रंग अमुक असावा व तामसिक चित्राचा अमुक असावा, हें ठरवलेलें असल्यामुळे चित्रकाराला स्वतः त्या त्या भावनेचें ज्ञान नसलें तरीहि चित्र वठवावयाचें तसें वठलें जातें. रामकृष्णांचा निळा रंग, भगवान् कृष्णाचा पीतांबर, अमुक देवतेचा अमुक रंग, हें सर्व ठरलें असल्यामुळे सर्व चित्रकारांच्या चित्रांचें समीकरण (Combination) एक प्रकारचेंच होतें. ही महत्वाची गोष्ट येथे लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे.

## व्यक्तित्वाची आहुति.

युरोपमध्ये जितके चित्रकार तितक्या त्यांच्या ( Styles ) चित्रें काढण्याच्या तऱ्हा असतात. पण येथे जर पाहिलें तर हजारो चित्रकारांची मिळून एकच तऱ्हा असते. हा हिंदी चित्रकलेमधील विशेष मनन करण्यासारखा आहे. राष्ट्रीय कलेच्या पावित्र्यरक्षणासाठी चित्रकारांनी व्यक्तित्वाची आहुति दिलेली जशी हिंदी चित्रकलेमध्ये दिसते, तशी ती इतरत्र कोठेही दिसत नाही·

जरी हिंदी चित्रकलेमध्ये महाराष्ट्र, रजपूत, मोगल, काङ्गडा, वगैरे दहापांच शाखा असल्या तरी त्या शाखांमधील भेद डोळयांची ठेवण, रेषेचा नाजुकपणा वगैरे गोष्टींवर अवलंबून आहे. मुख्य हिंदी चित्रकलेचें जें वैशिष्ट्य म्हणून पूर्वी दाखवलें तें सर्वांत सारखेंच आहे; म्हणजे भेद केवळ औपचारिक आहे, मूळ तत्त्वामध्ये कांही भेद नाही.

युरोपची यथार्थ चित्रकला ( The art of Realistic Paintings ) व हिंदी चित्रकला यांमधील भेद या ठिकाणीं थोडासा दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. आता युरोपमध्ये जी भावनात्मक चित्रकला

( The art of Idealistic Paintings ) आहे, तिच्याविषयी येथे थोडेंसें लिहिलें पाहिजे. यथार्थ चित्रकलेपासून ज्या मुद्दयावर भावनात्मक चित्रकलेची फारकत युरोपमध्ये झाली व ( Modern art ) नवयुगांतील चित्रकला सुरू झाली, त्याच मुद्दयाचा विचार हिंदी चित्रकलेच्या पूर्वाचार्यांनी फार प्राचीन कालापासून केला होता व त्याचें वैशिष्ट्य त्यांनी कोणत्या धोरणाने आपल्या कलेमध्ये व्यक्त केलें, तें याच निबंधांत पूर्वी दाखवलेंच आहे.

युरोपच्या भावनात्मक चित्रकलेमध्ये जरी भावनेचा प्रादुर्भाव झालेला आहे, तथापि नाकडोळे वगैरे अवयवांमध्ये अन्य सदृश पदार्थांची झाक दाखवण्याचा जो अपूर्व प्रघात हिंदी चित्रकलेमध्ये प्रचलित झाला आहे, त्याचा युरोपमध्ये अजून गंधही नाही; या दृष्टीने युरोपच्या चित्रकलेच्या आचार्यांना वरील गोष्ट अजून समाजावयाची आहे.

यावरून वाचकांच्या लक्षांत हें येईल की, या दृष्टीने हिंदी चित्रकलेचें वैशिष्ट्य स्वयंसिद्ध आहे व आजपर्यंत कोणत्याही देशांतील चित्रकारांनी ज्या तऱ्हेचा शोध सुद्धा केला नाही, त्या अपूर्व तऱ्हेचा शोध भारतीय चित्रकारांनी केला; इतकेंच नव्हे तर त्या बाजूने इतकी प्रगति त्यांनी केली की, त्या प्रगतीशीं तुलनाही इतर देशांतील चित्रकारांच्या कृतींशीं होऊं शकत नाही. इतर देशांतील चित्रकारांच्या कृति जरी आपआपल्यापरी उत्तम असल्या, तरी भारतीय चित्रकलेचें जें वैशिष्ट्य आहे, त्या बाबतींत त्यांच्याशीं स्पर्धा आजपर्यंत कोणीही केलेली नाही, एवढेंच येथे दाखवणें आहे.



# वास्तववादी व ध्येयवादी चित्रकला

मोठमोठे विद्वान् गेलीं दोन हजार वर्षे कलेची पूर्ण व्याख्या करण्याची खटपट करीत आहेत; पण जशी लोकांची संस्कारसंपन्नता वाढत चालली आहे, तशी ती जुनी व्याख्या अपुरी वाटत आली आहे; यामुळे सर्वमान्य व सर्वतः परिपूर्ण अशी कलेची व्याख्या अजून होऊं शकली नाही. असें असलें तरी आपणांस या व्याख्येसाठी फार खोलांत शिरण्याचें आज मुळीच कारण नाही; कारण आजच्या विषयाच्या समजुतीसाठीच कलेची व्याख्या करावयाची असेल, तर ती अशी केली असतांहि आपलें काम भागेल—

**' आकार, रंग, स्वर, शब्द व गति यांच्या द्वारें सौंदर्याचा व त्याबरोबरच अलौकिक ध्येयाचा विकास व प्रकाश जिच्या योगाने होतो, ती कला होय. '**

आकृति व रंग यांनी सौंदर्याची अभिव्यक्ति करणारी मूर्तिकला व चित्रकला, स्वरांच्या द्वारें सौंदर्य प्रकट करणारी गायनकला, शरिराच्या विशिष्ट गतींनी किंवा हालचालीनी सौंदर्य व्यक्त करणारी नृत्यकला, शब्दांना

गद्यपद्यरचनेंत गोवून त्यांच्या द्वारें सौंदर्य प्रकट करणारी कवींची व लेखकांची लेखनकला, अशा अनेक कला आपणांस माहीत आहेत. या सर्व कला नुसतेंच सौंदर्य प्रकट करीत राहिल्या, तर त्यांचें जें स्थान समजलें जाईल, त्यापेक्षा वरचें स्थान त्यांस प्राप्त होण्यासाठी त्यांच्या द्वारें अलौकिक परिशुद्ध ध्येयाची अभिव्यक्ति होणें अत्यंत आवश्यक आहे.

मानवामध्ये ‘ ज्ञात मानव ’ व ‘ अज्ञात मामव ’ ( Man the known & Man the unknown ) असे दोन भाग आहेत. ज्ञात मानव हा केव्हातरी सहजासहजीं केवळ नुसत्या सौंदर्यालाहि वश होईल; पण अज्ञात मानव हा मात्र नेहमीच ध्येयवादाने पोसला जाणारा आहे व जी कलाकृति या अज्ञात मानवाला ध्येयवादाने वाढवूं शकत नाही, ती केव्हाहि उच्च कलाकृति समजली जाणें शक्य नाही; म्हणूनच उच्च कला होण्यासाठी तिच्या द्वारें सौंदर्याविष्काराबरोबरच उच्च व परिशुद्ध ध्येयाचा आविष्कारहि झालाच पाहिजे.

या विश्वामध्ये आकार, रंग, स्वर, शब्द व गति यांचें अखंड साम्राज्य अप्रतिहत स्वैर सत्तेने चाललें आहे. त्या साम्राज्याचे स्वतःचे नियमहि अगदी पूर्णपणें स्वतंत्र असेच आहेत. कलावानाच्या अन्तःकरणामध्ये जें (Inspiration) स्फुरण होतें, तें या विश्वांतील विशिष्ट घटनांतील अलौकिक सत्तेच्या साक्षात्कारामुळेच होत असतें, यांत शंका नाही. विश्वांतील अशा घटनांच्या साक्षात्कारापासून कलावानांनी स्फुरण घेतलें, तरी खरा कलानिपुण त्या स्फुरणामध्ये आपला आत्मा ओतून त्यांतून नवीनच अद्भुत अशी प्रति-सृष्टि निर्माण करतो; म्हणून कलाकृति ही निसर्गाची नुसती प्रतिकृति आहे, असें केव्हाहि म्हणतां येणार नाही. किंबहुना नुसती निसर्गाची प्रतिकृति ही कलाकृति होऊंच शकणार नाही.

उदाहरणार्थ असें समजा की, एका कवीने किंवा एखाद्या चित्रकाराने

सृष्टीमध्ये अशी एक घटना पाहिली की, एके ठिकाणीं पृष्ठभागीं गगनचुंबित असें गौरीशंकराचें शिखर आहे व पुरोभागीं एका लहानशा दगडावर एक गोगलगाय बसली आहे व ती आपलीं शिंगें ताठ करीत आहे. येथे कवीच्या किंवा चित्रकाराच्या मनांत असें स्फुरण झालें की, ही गोगलगाय या हिमशिखराशीं स्पर्धा करीत आहे. हिचा हा नुसता पोकळ डौल आहे. अशी कल्पनास्फूर्ति होतांच कवि या प्रसंगावर पोकळडौलाचें वर्णन करणारें काव्य करील व चित्रकार तेंच आपल्या चित्रांत दाखवील. चित्रकार आपलें चित्र तयार करतांना असें दाखवील की, तें हिमशिखर या गोगलगाईच्या स्पर्धेकडे ढुंकूनहि पहात नाही, तर तें आपल्या धीरगंभीर स्थितींत अढळ राहिलें आहे व ही गोगलगाय मात्र स्पर्धेच्या उत्कटतेने आपलें पोट फुगवीत आहे, शिंगें उंच करीत आहे, डोळे वटारीत आहे व तिच्या एकंदर शरिरावर या स्पर्धेची अभिव्यक्ति स्पष्ट दिसत आहे.

केवळ निसर्गानुकरणच करावयाचें झालें, तर नुसतें शिखर व नुसती गोगलगाय एवढेंच दाखवलें म्हणजे झालें; पण हा फोटोग्राफ झाला, यांत कांही स्फुरण नाही, कांही दिव्य संदेश नाही, कांही मानवी ध्येयाचा आविष्कार नाही.

पण जेव्हा चित्रकार त्या गोगलगाईच्या अवयवांतून तिचा डामडौल व तिची स्पर्धा व्यक्त करून एक नवा संदेश सांगूं लागतो, त्या वेळीं निसर्गाचें तें अनुकरण न होतां चित्रकाराचा आत्मा, चित्रकाराच्या अन्तःकरणांत झालेलें अभौतिक स्फुरण त्या चित्रांत ओतलें जातें व त्याच्या निष्पत्तीने तेथे कलेचा अवतार होऊं लागतो.

यावरून लक्ष्यांत येईल की, केवळ अनुकरण ही कला नसून, त्यांत चैतन्य दाखवणें ही कला आहे. म्हणूनच म्हटलें आहे की—

**जेव्हा कलावान् निसर्गाची प्रतिकृति करण्याचें सोडून देतो व जेव्हा**

तो आपल्या ध्येयवादाच्या अपूर्व व असाधारण कल्पनांनी निसर्गावर आपली ताण करून आपल्या तंत्राने त्यास वागावयास लावतो, त्याच वेळीं त्याच्या कृतींत कलेचा अवतार होणें शक्य असतें. ज्या मानाने त्याचें हें प्रभुत्व अधिक असेल, त्या मानाने त्याची कलाकृति श्रेष्ठ प्रतीची होत जाईल. म्हणूनच उच्च कलाकृति निसर्गनियमांच्या बंधनांनी बांधलेली नसते व श्रेष्ठ कलाकार या बंधनांच्या पलीकडे जाऊन आपली कला निर्माण करतो; किंवा स्वभावतःच त्याच्याकडून तशी निर्मिति होते, असें म्हटलें तर तेंच अधिक सत्य होईल.

येथे निसर्गाचें अनुकरण ही कला नव्हे असें म्हटलें, यावरून कित्येक असें समजतील की, निसर्गाचें अनुकरण न करणें व हवें तसें कांहीतरी काढणें ही कला आहे; पण असें कोणीहि समजतां नये. निसर्गाचें उत्तमोत्तम अनुकरण करतां येऊं लागल्यानंतरच, अनुकरण करण्याचें सोडून देऊन निसर्गाला आपल्या तंत्राने वागावयास लावण्याचें सामर्थ्य अंगीं येऊं शकतें. अशा चित्रकाराचा कुंचला चित्रफलकावर लागला की, तेथे अद्‌भुतता निर्माण होते. तो कुंचल्याचा फटकारा निसर्गासारखा असो वा नसो, त्याची त्याला पर्वा नाही. त्याच्या असाधारण प्रभुत्वामुळे तो इच्छील ती प्रतिसृष्टि त्याच्या कृतींत निर्माण होते. ही स्थिती उत्तम निसर्गानुकरणानंतरची आहे, तत्पूर्वीची नाही; म्हणून हवें तसें काढणें म्हणजे कला, असें कोणी समजूं नये. नाहीतर लहान मुलाच्या हव्या त्या रेघोट्याही कलाकृति म्हणून प्रसिद्धि पावतील.

कला अनेक आहेत. त्यांपैकी फक्त चित्रकलेसंबंधानेच आज या ठिकाणीं आपणांस विचार कर्तव्य आहे.

## चित्रकलेचें सर्वांगीण महत्त्व.

कला जरी पुष्कळ असल्या, तरी सर्व कलांमध्ये चित्रकलेचें महत्त्व

विशेष आहे, यांत शंका नाही. आपण मुलांस अक्षरें शिकवितांना—

१ अननसांतील अ  २ ईडनिंबांतील ई
३ उखळांतील उ  ४ कणसांतील क

असें शिकवतों. अर्थात् मुलांना आधी चित्र आपोआप समजतें व मग त्या चित्राच्या आश्रयाने अक्षर–ओळख होते. यावरून न शिकतां सहजासहजीं ज्ञान करून देणारी चित्रकला आहे व शिकल्यानंतर ज्ञान होऊं शकलें, तर तें करून देणारी लेखनकला आहे, असें म्हणतां येईल; म्हणून चित्रकला आधी व लेखनकला नंतरची आहे. लढाईचें चित्र पाहून एखाद्या निरक्षर गावढळाचेहि बाहु स्फुरण पावूं लागतील; पण तें कार्य मोठ्या निबंध-कारास किंवा कवीस तितक्या सुलभतेने कधीहि करतां येणार नाही, हें उघड आहे.

कवि एखाद्या दृश्याचें वर्णन, शेकडो पृष्ठें लिहून करण्याची खटपट करील; पण जसें एखादा चित्रकार लहानशा कागदावर तें दृश्य थोड्याशा रेषांनी हुबेहूब दाखवूं शकेल, तसें तें त्यास पूर्णपणें कधीहि साधणार नाही.

कोणत्याहि राजसभेचें, वीरांचें, युद्धाचें, निसर्गाचे किंवा नव्या कल्प-नांचें इत्थंभूत निदर्शन जसें चित्रकार सहज करूं शकेल व तें जसें निरक्षरां-सहि समजूं शकेल, तसें तें शब्दचित्रकार लेखक व कवि यांच्याकडून होणें शक्य नाही, हें सर्वांस समजण्यासारखें आहे. यावरून मी कवि व लेखकांना कमी लेखतों असें नसून, चित्रकारांना त्यांचें स्थान हक्काने कोठे मिळालें पाहिजे, तें सांगत आहें. चित्रकारांनी हें आपलें विशिष्ट स्थान आहे, हें जाणून तें हक्काने ताब्यांत घेण्यास पुढे आलें पाहिजे.

कवि–लेखक व चित्रकार यांमधील हें भांडण प्रेमाचें आहे. दोघांच्या सहकार्यानेच राष्ट्राचें परम कल्याण साधणार आहे; कारण हे परस्परांस

पोषक होणारेच आहेत. इतकेंच नव्हे, तर ते परस्परविरोधक होणें कधीहि इष्ट नाही.

ग्रंथकाराचा ग्रंथ किंवा कवीचें काव्य चित्रकाराचें सहाय्य घेतलें असतांना जसें परिणामकारक होऊं शकेल, तसें चित्रकाराशीं संबंध न ठेवतां ग्रंथकारास व कवीस आपली कृति परिणामकारक करतां येणार नाही. यावरून चित्रकाराचें महत्त्व समजून येणें शक्य आहे.

## चित्रकाराची योग्यता.

पुष्कळ लोक असें समजत असतात की, जो मुलगा युनिव्हर्सिटीच्या परीक्षेंत पास होत नाही, त्यास चित्रशाळेंत घालून पहावें. म्हणजे इतर परीक्षांत हिणकस ठरणारीं मुलें चित्रकलेंत सरस ठरूं शकतील किंवा निदान चालू तरी शकतील, असा समज आहे; पण हा भ्रम आहे. कांही मर्यादेपर्यंत असलीं निर्बुद्ध मुलें कदाचित् कांही प्रगतीहि करतील, हें खरें; पण तीं एका मर्यादेपेक्षा चित्रकलेंत अधिक प्रगति करूं शकणार नाहीत, हें कोणासहि सहज समजणें शक्य आहे.

चित्रकाराला थोर कवीची कल्पना आकलन करून घेऊन ती चित्रांत दाखवावी लागेल; लेखकाचें हृद्गत जाणून त्या लेखासाठी चित्र तयार करावें लागेल; इतिहासकाराने दाखवलेले युद्धाचे डावपेच समजून घेऊन ते चित्रांत नीटपणाने दाखवावे लागतील; गाणारांच्या सभेचें ज्ञान त्यास पाहिजे व त्या वेळीं गवई व तबलजी कसे एका समेंत आणावे, तें त्यास समजलेंच पाहिजे; नृत्यकलेंतील गोड रहस्यमय भाव चित्रकाराच्या अन्तःकरणांत आधी उतरले पाहिजेत, तेव्हा चित्रांत तें कोमल व स्वादु नृत्य दाखवलें जाणें शक्य होईल. ईश्वराचा अभौतिक अवतार त्यास आकलन झाला पाहिजे व भक्ताच्या भक्तीने द्रवलेल्या अन्तःकरणाचा ठाव त्यास लागला पाहिजे; योग्याची तल्लीनता कशी

असते, तें त्यास कळलें पाहिजे; बुद्धानें सर्व प्रलोभनें कोणत्या निश्चयानें झुगारलीं, तें त्याच्या लक्ष्यांत आलें पाहिजे. एक कीं दोन– खरा व श्रेष्ठ चित्र- कार होण्यास तो या विश्वरूपाशीं एकरूप होऊन पुनः ती एकरूपता अनुभवावयास त्याच्या बाहेर दहा अंगुलें उरला पाहिजे !! ज्याच्याकडून आपण असें काम करून घेणार, तो इतर परीक्षांच्या कसोटीस न उतरणारा निर्बुद्ध चालू शकेल काय ? याचा वाचकांनी विचार करा.

अशीं निर्बुद्ध मुलें चित्रकलेचें शिक्षण घेण्यासाठी पाठवलीं गेल्यामुळेच आपल्या देशांत चित्रकलेची प्रगति थांबलेली आहे. ज्याला सर्व विषयांचें सहज आकलन होऊं शकेल, असेच बुद्धिमान् लोक उत्तम चित्रकार होऊं शकतील, हें आता निराळें सांगण्याचें कारण नाही. उत्तम चित्रकाराला जितक्या विविध विषयांचें ज्ञान आवश्यक असतें, तितकें तें दुसऱ्या कोणालाहि आवश्यक असत नाही. हें जसें कोणीहि विसरतां नये, त्याचप्रमाणे चित्रकारां- नीहि विसरतां नये.

चित्रकाराला सौंदर्यहीन वस्तु खपतच नाही. कुरूपावर त्याचा कुंचला फिरला की, तेथे रमणीयता निर्माण होते ! चित्रकाराची छाप स्थापत्यां– ( Engineers ) वर पडली, तर सुंदर घरें निर्माण होतात; गृहस्थांवर पडली, तर घरांतील व्यवस्था सुंदर होते, बागेला तो सुंदर बनवतो. जेथे जेथे चित्रकाराची छाप पडेल, तेथे तेथे सौंदर्याची वृद्धि झालीच पाहिजे. राष्ट्रांत चित्रकार जर अधिक निर्माण झाले, तर राष्ट्राचा डोळाच सुधारला, असें म्हणण्यास हरकत नाही. चित्रकार हा राष्ट्राचा डोळाच आहे. आपल्या शरिरांत जें डोळ्याचें महत्त्व आहे, तें राष्ट्रांत चित्रकाराचें आहे. डोळ्यांत एक लहानसें कस्पट जसें सहन होत नाही, त्याप्रमाणे चित्रकाराच्या मेंदूमध्ये थोडीशी उणीव असली, तर तीहि खपली जाणार नाही; कारण चित्रकाराकडून सर्व अन्य लोकांना आवश्यक असलेलें सौंदर्य त्यांच्या त्यांच्या ग्रहणशक्ती-

प्रमाणे मिळावयाचें असतें. म्हणून चित्रकाराचे दोष राष्ट्राला घातक होतात व गुण तारक होत असतात.

## आर्यांचें कलानैपुण्य.

आर्यांनी चौदा विद्या, चौसष्ट कला आपल्या शिक्षणक्रमामध्येच घेतलेल्या होत्या. आर्यांच्या गुरुकुलीय विद्याभ्यासांत शिकलेला विद्यार्थी चौसष्ट कलांचे संस्कार घेऊनच बाहेर पडत असे. म्हणूनच आपणांस संस्कृत नाटकांतील नायक–नायिका प्रियकराचें चित्र कल्पनेने काढीत असल्याचें दिसतें. मृच्छकटिकांतील विदुषकासारखा सामान्य मनुष्य आपल्या बोलण्यांत चित्रकाराच्या वर्णविन्यासाची श्रीमंती जेवणाला अगदी अन्वर्थक उपमा देत आहे. वात्स्यायन ऋषि आपल्या कामसूत्रामध्ये घरांत काय काय वस्तु असाव्या, हें सांगतांना चित्रें काढण्याचें सामान असावें, असें सांगण्यास विसरले नाहीत. भास आपल्या प्रतिमा नाटकांत राजा दशरथ मरतांच त्याची मूर्ति करून ती सार्वजनिक मंडपांत उभी करीत आहे. आर्य चाणक्य अर्थशास्त्रांत चित्रकलेचा उल्लेख करीत आहे. इतकेंच काय पण देवांमध्येही चित्रगुप्त हा गुप्तपणें लोकांच्या कर्मांचीं चित्रें काढून तीं जपून ठेवण्यासाठी आर्यधर्म–ग्रंथकारांनी निर्माण करून ठेवला आहे ! देवांतील एक 'लेखा' ही जातच चित्र काढणारी असावी, असेंहि आता पुष्कळांस वाटूं लागलें आहे. वेदांतील कवीहि ईश्वराचा विश्वांतील रूपांशीं संबंध दाखवतांना—

रूपं रूपं प्रतिरूपो बभूव ॥ ( ऋग्वेद )

विश्वांतील प्रत्येक रूपाला परमेश्वर हा आदर्श ( Model ) बनलेला आहे, असें चित्रकाराच्या भाषेने वर्णन करतो. यावरून आपल्या लक्ष्यांत येईल की, वैदिक काळापासून आर्यांमध्ये चित्रकला ही दैनिक जीवनांतून रुळत आलेली आहे.

आर्यांच्या प्रत्येक धर्मकृत्यांत रांगोळ्या घातल्याच पाहिजेत. हें तर

अगदी प्रत्येकाला यावयाचें कौशल्य होय. चांगल्या रंगवल्लिका चित्रकारच काढूं शकेल. या रंगविल्याशिवाय धर्मकृत्य होणारच नाही. इतक्या कटाक्षाने हिंदूधर्माने चित्रकला आपणांजवळ घेतलेली आहे.

या कारणाने हिंदी चित्रकला विविध बाजूंनी वाढलेली होती. याचा प्रत्यय आपणांस आज हिंदूधर्म-ग्रंथांमध्ये स्पष्टपणें दिसत आहे. तेथे हिंदी चित्रकलेच्या तीन अवस्था आपणांस दिसत आहेत- ( १ ) एक प्रतिरूप ( Model ) पुढे ठेवून त्याच्यासारखें चित्र काढणें. वैदिक मंत्रांत यांचीं वर्णनें येतात. ( २ ) पुढे पौराणिक कालांत हें समोर प्रतिरूप ठेवणें अजिबात निघून गेल्याचें दिसतें. या काळचे चित्रकार ज्याचें चित्र काढावयाचें असेल, त्याला निरखून पहात व घरीं येऊन स्मरणाने त्याचें चित्र काढीत. हिंदी चित्रकारांनी ही स्मरणाने हुबेहूब चित्र काढण्याची कला अत्यंत पूर्णत्वास नेलेली होती व असे चित्रकार परवापर्यंत आपणामध्ये होते. अशा रीतीने एकदा स्मरणांत ठेवलेल्या मनुष्याच्या आकृतीचें स्मरण चित्रकारास वर्षानुवर्षे रहात असे, हें सर्वांत आश्चर्य होय !

असे चित्रकार मी औंधास, सावंतवाडीस, जयपुरास व दिल्लीस पाहिलेले आहेत. इतर ठिकाणींहि ते होतेच.

औंधाच्या राजाश्रित चिताऱ्यांच्या तीन पिढ्यांपैकी पहिल्या दोन पिढ्यांत स्मरणाने चित्र काढण्याचा गुण पूर्णपणें विकसित झालेला होता. त्यांनी पाहिलेल्या माणसाचें चित्र ते इतक्या जलद काढीत व त्यांची बाह्यरेषा इतकी बरोबर असे की, ती बाह्य रेषा काढतांच सादृश्य तत्काल येत असे, यांचें फारच आश्चर्य वाटतें !

तिसऱ्या पिढीमध्ये युरोपियन चित्रकलेचा संस्कार झाला. मॉडेल किंवा फोटो पुढे ठेवूनच चित्र काढण्याचे संस्कार यामुळे वाढले व पूर्वीचे

स्मरणशक्तीने हुबेहूब चित्र काढण्याचे संस्कार लोपून गेले ! स्मरणशक्तीने आकर्षक चित्र काढण्याची हिंदी लोकांतील कला दिवसानुदिवस लोपत चालली आहे. ही हिंदराष्ट्राची हिंदी कलेच्या दृष्टीने केवढी हानि झालेली आहे, हें निराळें सांगण्याचें कारण नाही. युरोपियन संस्कारांनी हिंदी संस्कृतीचा जसा इतर बाबतींत नाश केला, त्याचप्रमाणे तो चित्रकलेच्या बाबतींतहि झालेला आहे व त्यामुळे आम्ही आज स्वत्वासच पारखे झालों आहों. पूर्वी आपणाजवळ काय होतें, तेंही सध्या कोणास माहीत नाही.

आज युरोपांत खऱ्या हिंदी चित्रकलेची मागणी वाढत्या प्रमाणांत आहे. इटलीसारख्या चित्रकलेचें आगर असलेल्या स्वतंत्र देशांत हिंदी चित्रकला शिकविण्यासाठी स्वतंत्र शाखा तेथील ॲकॅडेमींत मुद्दाम सुरू केलेली आहे; पण आपल्याकडे मात्र या बाबतींत पूर्ण उदासीनता दिसत आहे !

(३) हिंदी चित्रकलेची तिसरी शाखा ध्येयवादी चित्रकलाहि येथे बरीच पूर्णत्वास पोचली होती. आगमग्रंथांत यासंबंधाचें जें शास्त्र आहे, तें पाहिलें म्हणजे कोणतें चित्र कसें काढावें, याचीं दिव्य प्रमाणेंच ठरवलीं गेलीं होतीं असें दिसतें ! हें पाहिलें म्हणजे हिंदी चित्रकलेचा खरा इतिहास आपणांसमोर उभा राहतो. या सर्व इतिहासाचें निरीक्षण करण्यास आज आपणांजवळ वेळ नाही, तथापि मॉडेलवरून चित्र काढण्यापासून तों अगदी निसर्गाचे नियम तोडून ध्येयवादाच्या आकाशांत स्वेच्छेने भराऱ्या मारण्यापर्यंत सर्व शाखांत आपल्या आर्यचित्रकारांची प्रगति झालेली होती, ही गोष्ट निर्विवाद आहे.

## पर्स्पेक्टिव्ह.

आपल्या हिंदी चित्रकलेमध्ये ( पर्स्पेक्टिव्ह ) दर्शनशास्त्राचे नियम पाळले जात नाहीत, अशी शंका पुष्कळ चित्रकार काढीत असतात. त्यासंबंधाने थोडेंसें शांतपणाने येथे विचार करणें इष्ट आहे. प्रथमतः किती

प्रकारचें निदर्शन आपणांस घडतें, हें पाहिलें पाहिजे. सध्याचे नवशिक्षित चित्रकार सांगतील की, तें फक्त दोनच प्रकारचें आहे–

१. एक ( Linial Perspective ) रेखात्मक निदर्शन,

२. दुसरें ( Airial Perspective ) वायूच्या परिणामाचें निदर्शन.

आगगाडीच्या दोन रुळांमध्ये आपण उभें राहिलों, तर दोनही लोखंडी रूळ शेवटीं एकमेकांस मिळत आहेत, असें दिसतें. मोठ्या गल्लींत उभें राहिलें तर पुढचीं पुढचीं घरें लहान होत जात आहेत, असें दिसतें. हे प्रकार रेखात्मक निदर्शनाचे आहेत. दूरचे डोंगर निळे दिसतात, हा निळेपणा व रंगांतील मन्दपणा हा वायूच्या परिणामाचा निदर्शक आहे. हीं दोनच फक्त निदर्शनें आहेत, असें सध्या समजण्यांत येतें व या दृश्यनिदर्शनाचे नियम हिंदी चित्रकार पाळीत नव्हते; म्हणून त्यांस सध्या दोषहि देण्यांत येत असतो; पण आपणांस जें काय विश्वामध्ये दिसतें व अनुभवास येतें, तें फक्त या दोनच निदर्शनांनी येतें काय ? हाच मुळीं मुख्यतः वादाचा प्रश्न आहे. केवळ चर्मचक्षूंनी दृश्य पाहिलें व त्याचें अगदी स्थूल रूपच अवलोकन केलें, तर कदाचित् एवढींच दोन निदर्शनें अनुभवांत येतात, असें म्हणतां येईल; पण मनुष्य हा नेहमी या स्थूल दृष्टीनेच जगाकडे पाहतो, असें नाही.

दीडशे वर्षांपूर्वी जेव्हा युरोपियनांचा हिंदी लोकांशीं संबंध घडला, त्या वेळीं युरोपचे चित्रकार फक्त स्थूल दृष्टीनेच विश्वाचें निरीक्षण करीत व जसें डोळ्यांनी दिसतें, तसेंच काढीत; पण आजच्या युरोपमधील आधुनिक चित्रकारांची दृष्टि त्यापेक्षा पुष्कळच व्यापक झालेली आहे व त्यांत थोडथोडी अतींद्रियताहि येऊं लागलेली आहे. यालाच ( Modern Schcol of Painting ) आधुनिक चित्रकला असें म्हणतात. युरोपला ही नवी दृष्टि या विसाव्या शतकांत येऊं लागली आहे व जें फक्त डोळ्यांनी दिसतें, तेवढ्यावरच ते यापुढे संतुष्ट राहणें शक्य नाही, अशी स्थिति स्पष्ट दिसूं लागलेली आहे.

आपल्या आर्यावर्तांतील चित्रकारांना ही अतींद्रिय दृष्टि फार प्राचीन काळापासून प्राप्त झालेली व ती अत्यंत वाढलेलीहि होती, असें स्पष्ट दिसतें. जेव्हापासूनचा आपल्या चित्रकलेचा इतिहास आपणांस उपलब्ध आहे, तेव्हापासून भारतीय चित्रकार स्थूल दृष्टीच्या बंधनाच्या पलीकडे पोचले होते, असें स्पष्ट म्हणावें लागतें.

कवि जी अतीन्द्रियता शब्दांनी व्यक्त करतो, तीच अतीन्द्रियता चित्रकार आपल्या रेषेने व वर्णविन्यासाने व्यक्त करीत असतो. मनुष्यालाही अतीन्द्रिय निदर्शन होतें कीं नाही, हें आता आपण पाहूं—

## दिव्य दृष्टि.

कोणी भक्त आपल्या सद्गुरूकडे किंवा महात्म्याकडे ज्या श्रद्धाभक्तीने आपला तारक गुरु म्हणून पाहतो, त्या त्याच्या श्रद्धामय अन्तर्दृष्टीला त्या गुरूच्या स्थूल शरिरांतले दोष दिसतच नाहीत. गुरूचें शरीर कुरूप असो, त्याचा वर्ण गोरा नसो, शरिरावर कांही डाग असोत, ते त्या भक्ताला मुळीच दिसत नाहीत. तो भक्त आपल्या गुरूचें आध्यात्मिक तेज पाहतो, त्याचा निर्दोष अभौतिक थोरपणा अनुभवतो व आपला हा तारक आहे, असें समजतो. भक्ताला हें जें निदर्शन होतें, तें त्याच्या चर्मचक्षूंनी होणारें निदर्शन नव्हेच नव्हे. हा अंतर्मनाने घ्यावयाचा अनुभव आहे. या वेळीं मन डोळ्यांवर आपला प्रभाव घालतें व डोळ्यांनी दिसत असलेलीं व्यंगें झाकून आपल्या कल्पना-सृष्टींतील ध्येयाचा आभास अनुभवावयास लावतें. अशा वेळीं सद्गुरूची शरीरयष्टि अगदी लहान किरकोळ असली, तरी तिचासुद्धा भक्ताच्या मनावर विशेष मोठा प्रभाव पडल्याशिवाय राहणार नाही. बुद्धाच्या चित्रांत शिष्यांच्या प्रतिमा एकपट काढून गुरूच्या प्रतिमा पांचसहापट मोठ्या काढण्यांतील हेतु हा असा आहे. ही दृष्टीच निराळी म्हणजे अतीन्द्रिय आहे. मानसिक भूमिकेवर अनुभवास येणारें चित्र येथे दाखवलेलें असतें.

३. याला आपण आध्यात्मिक निदर्शन ( Spiritual perspective ) असें नांव देऊं.

जगामध्ये स्थूल निदर्शना ( Physical perspective ) पेक्षा आध्यात्मिक निदर्शन ( Spiritual perspective ) अधिक महत्त्वाचें आहे, यांत आज तरी कोणास शंका राहिलेली नाही. आज आपण महात्मा गांधी व एक मोठा थोरला मल्ल यांचा विचार करूं लागलों, तर जड शरिराने मल्ल थोर व चेतन आध्यात्मिक शक्तीने महात्मा गांधी त्यापेक्षा किती तरी पटीने थोर आहेत. हा निरनिराळा थोरपणा जो अनुभवास येत आहे, तो चित्रांत कसा दाखवावा, हा प्रश्न चित्रकारांपुढे पुष्कळ वर्षांपासून उभा आहे. तो भारतीय चित्रकारांनी एका रीतीने सोडवला व सध्या युरोपचे नव-विचारांचे चित्रकार निराळ्या मार्गांनी सोडवूं इच्छीत आहेत. अशीं निदर्शनें मनुष्यास अनेक प्रकारचीं होतात; म्हणून दोनच निदर्शनें आहेत, असें समजणें चुकीचें आहे.

यावरून लक्ष्यांत येईल की, प्राचीन भारतीय चित्रकलेमध्ये निदर्शनाचे ( Perspective ) नियम पाळले जात नसत, असें नसून आध्यात्मिक निदर्शन दाखवण्याचा त्यांचा तो प्रयत्न होता, हें लक्ष्यांत घेणें इष्ट आहे.

## शान्तचिं निदर्शन.

बुद्धाचें चित्र पहा. त्यांत आपणांस शान्ति,अहिंसा,निर्भयपणा,सन्तोष, तृप्ति हे गुण दिसतील. हे गुण चर्मचक्षूंनी अनुभवून पाहण्यासारखे नाहीत, अन्तर्दृष्टीने अनुभवावयाचे आहेत; पण चित्रीकरणामध्ये ते विशिष्ट प्रकारच्या रेखावर्णविन्यासाने दाखवून तेच पाहणाऱ्याच्या मनाला भासवावयाचे किंवा सुचवावयाचे असतात. उदाहरणार्थ, आज बुद्धाचें जें चित्र आपणांस दिसतें, त्याचप्रमाणे मूळच्या बुद्धाचें शरीर होतें कीं नव्हतें, हा महत्त्वाचा प्रश्न नसून, त्या वेळच्या बुद्धाने तत्कालीन जनतेवर अहिंसादि ज्या श्रेष्ठ गुणांची

छाप पाडली, ते सद्गुण या चित्राने सूचित होत आहेत कीं नाही, हा प्रश्न महत्त्वाचा आहे. स्थूल शरीर हा खरा बुद्ध नसून, याचें शुद्ध मन हाच खरा बुद्ध होता, हें सत्य चित्रांत दाखवण्याचा यत्न हिंदी चित्रकार करीत आले आहेत.

हें एक अगदी स्वतंत्र असें आध्यात्मिक निदर्शन आहे, एवढेंच येथे सांगावयाचें आहे. मनुष्याला जसें डोळ्यांनी दिसतें, त्यापेक्षा निराळेंच दृश्य त्याला मनाने, बुद्धीने व आत्म्याने अनुभवतां येतें. पुष्कळ वेळा डोळ्याने दिसणाऱ्या दृश्याच्या विरुद्धच मनाने दृश्य दिसत असतें. हा अनुभव सर्वांसच आहे. पहा—

एक मोठा थोरला राजा आहे. त्याचा दरारा, त्याचा अधिकार व डामडौल व त्याच्या शरिराचा आकारहि फार मोठा व प्रभावशाली आहे. हें दृश्य स्थूल डोळ्यांनी दिसतें तें होय; पण मनाने दिसणारें याचेंच आणखी एक दृश्य असतें. त्याचें खासगी वर्तन अशुद्ध व अनीतीचें असेल, तर तो त्या दृष्टीने अगदी तुच्छ व हीन आहे, असें दृश्य मन अनुभवीत असतें. हाही तसाच खरा दृष्टिकोन आहे. आता केवळ डोळ्यांनी ज्याचें वैभव लोकांस दिपवून टाकतें, तोच आध्यात्मिक दृष्टीने कःपदार्थ भासूं लागतो. एखादा अगदी गरीब शुद्धाचरणी सत्पुरुष एकीकडे व दुसरीकडे वरील दुराचरणी सम्राट्, यांचें भौतिक दृश्य निराळें आहे व आध्यात्मिक दृश्य अगदी निराळें आहे. या दृश्यांचा अन्तर्भाव ज्या निदर्शनांत ( Perspective ) होतो, तें निदर्शन निराळेंच आहे व त्याचे नियमहि निराळेच आहेत, हें काय निराळें सांगितलें पाहिजे ?

अशीं कितीतरी निदर्शनें आपल्या जीवनांत आहेत व जीं वेळोवेळीं अनुभवासहि येतात. तीं चित्रांत दाखवणें, हें चित्रकारांचें कर्तव्यच आहे. या सर्व प्रकारच्या निदर्शनांचा येथे ऊहापोह करण्याचें कारण नाही; तथापि येथे

एवढें अवश्य दाखवलें पाहिजे की, डोळ्यांच्या निदर्शनापेक्षाही अधिक सत्य अशीं दुसरीं अनेक निदर्शनें आपल्या जीवनांत आहेत व त्यांच्याकडे चित्रकाराने कानाडोळा करून चालणें शक्य नाही.

## वास्तववादी चित्रकला.

युरोपमधील चित्रकला पुष्कळ अंशीं वास्तववादी ( Realistic ) होती व आहे, यांत शंका नाही; पण मानवाला वास्तववादाने कधीच समाधान होत नाही, हेंहि त्याहून अधिक सत्य आहे. मानवाची प्रवृत्तीच वास्तववादांतून फुटून ध्येयसृष्टींतील नभोमंडलांत ( Idealistic ) कल्पनेच्या भराऱ्या मारण्याकडे असते. वास्तववादी चित्रकार जी बाह्य रेषा म्हणून काढतो, ती वस्तुतः तेथे नसतेच. गोल आंखणी, गोल बाटली अथवा कोणत्याही गोल वस्तूला कोठेहि बाह्य रेषा असतच नाही. केवळ रेषा असल्याचा भास दृष्टिदोषाने होतो इतकेंच; पण तो भासच असतो. जेथे रेषा नसते, तेथे ती भासते. भासली म्हणजे ती तेथे असते, असें ठरत नाही. भास हा बहुधा मिथ्याच असतो. आता हा रेषेचा भास— जो खरा नव्हेच नव्हे —तो भासतो तसा काढणें, याला वास्तववाद ( Realistic ) म्हणावयाचें काय ? मुळांतच वास्तववाद हा शब्दप्रयोग तात्त्विक दृष्टया चुकीचा झालेला आहे. भ्रमाने जें भासतें, तें भ्रमाने तसेंच काढणें हा वास्तववाद ( Realism ) आहे असें मानणें, शास्त्रीय दृष्टया योग्य होणार नाही.

मनुष्याच्या शरिराला बाह्य म्हणून कांही भासात्मक रेषेशिवाय खरेपणाची रेषा मुळीच नाही; पण या भ्रमावरच सर्व व्यवहार चाललेले आहेत. यांतच एकाने आपणांस (Realist) वास्तववादी म्हणवून घ्यावें व दुसऱ्यास ( Idealist ) ध्येयवादी म्हणून हिणवावें ! खरें पाहिलें तर वास्तववादी हा खरा वास्तववादी नव्हेच. ध्येयवादी हा मात्र थोडातरी सत्याजवळ गेलेला असतो; पण वास्तववाद्याला सत्य कधीच मिळणें शक्य नसतें.

या बाह्यरेषेच्या वादाचा क्लिष्टपणा कोणास वाटत असेल, तर तो आपण क्षणभर सोडून देऊं व वास्तववादी चित्रकार आपलें चित्र कसें तयार करतात, त्या विधीकडे आपण थोडेंसें अधिक लक्ष्य देऊं.

समजा, महावीर नेपोलियनच्या युद्धाचें चित्र काढावयाचें आहे. युद्धक्षेत्रावर अनेक योद्धयांसह नेपोलियनाची खुजी वामनमूर्ति काढावी लागेल व त्या मानानें त्याचे सेनापति मोठे धिप्पाड काढावे लागतील; पण कोणताहि वास्तववादी चित्रकार असें चित्र काढणार नाही व तशा चित्राची जगांत कांही किंमतहि होणार नाही. कुशल चित्रकार छायाप्रकाशांची अशी व्यवस्था ठेवील की, त्यामुळे नेपोलियनची आकृति अधिक उठावदार दिसावी व तसाच वर्णविन्यास करून नेपोलियनचें शरीर व कपड्यांचे रंग अधिक ठळक दाखवून त्या मानाने इतरांचे वर्ण अधिक मंद दाखवील. छाया व प्रकाश आणि रंगांचा ठळकपणा व मंदपणा यांमुळे ह्या त्या आकृतीस अधिक उठावदार-पणा किंवा अधिक मंदपणा दाखवणारे चित्रकार वास्तववादी आहेत, असें कधीतरी म्हणतां येईल काय ? व नजरेला दिसतें, तसेंच ते दाखवतात, असेंतरी म्हणतां येईल काय ? कधीच नाही. जसें असतें व जसें दिसतें, तसें चित्रांत कोणीहि उच्च चित्रकार कधीहि दाखवीत नाही. विशिष्ट माणसाच्या चित्रांतहि (Portrait) चेहऱ्यापेक्षा हातपाय अधिक मन्द व चेहऱ्यांतहि नाकातोंडांपेक्षा कान जरासे मन्द व अस्पष्ट दाखवलेले असतात. सर्व चित्रकारांना हें माहीत आहे व असें दिसतें त्याच्याविरुद्ध एखाद्या चित्रकारा-ने काढलें नाही व जर एखाद्या चित्रकाराने सर्व अवयव सारखे ठळक काढले तर चित्रकारांमध्ये त्याचें हसेंहि होतें.

वास्तववादी म्हणवून घेणारे चित्रकारसुद्धा असतें किंवा दिसतें, तसें कधीच काढीत नाहीत; तर त्या दृश्यांत आपला आत्मा ओतून तें आपले ध्येय चित्रकार चित्रांत रंगवीत असतो. मग त्यास तें किती साधेल, हा प्रश्न

निराळा; पण आपणांस वास्तववादी म्हणवून घेऊन ते ध्येयवाद्यांना पाहून नाकें मात्र मुरडीत राहतात, याचें आश्चर्य करावें, तेवढें थोडेंच आहे !

अगदी वास्तववादी चित्रकला खरोखर कोठे नाहीच. ज्यांना वास्तववादी म्हणतात, तेहि अंशतः ध्येयवादीच असतात; पण ते दृश्याची थोडीतरी भीड धरतात; म्हणूनच त्यांस वास्तववादी म्हणतात. दुसरे जे ध्येयवादी चित्रकार असतात, ते दृश्याची भीडमुर्वत न ठेवतां दृश्याचे नियम तोडून कल्पनेच्या भराऱ्यांनी आपलीच नवी सृष्टि उत्पन्न करीत असतात. हे प्रतिसृष्टि निर्माण करणारे असल्यामुळे यांचें महत्त्व कलेच्या दृष्टीने अधिक आहे, यांत शंकाच नाही.

## सर्वांवर सारखी छाप कां पडत नाही ?

येथे कोणी असें विचारील की, जर ध्येयवादी चित्र हें सारखेंच उच्च असेल तर तें चित्र पाहतांच त्याचा सुपरिणाम किंवा इष्ट परिणाम पाहणाऱ्या हरएक मनुष्यावर सारखा कां होत नाही ? असा प्रश्न नेहमीच विचारतात; पण हा प्रश्नच अस्थानीं आहे, असें थोड्याशा विचाराअन्तीं आपणांस कळून येईल. चुलीवर भांड्यांत ठेवलेलें लोणी उष्णतेने वितळतें; पण चुलीची माती वितळत नाही, हें आपण पाहतों. स्थूल संस्कारापेक्षा सूक्ष्म संस्कार स्वीकारण्यास निराळ्या प्रकारची क्षमता आवश्यक असते. ती क्षमता नसेल, तर त्यावर कांहीएक परिणाम होणें शक्य नाही. काव्य किंवा गायन अथवा दुसऱ्या कोणत्याही उच्च कला असोत, त्यांचा तरी परिणाम असंस्कृत मनुष्यावर सारखा कोठे होतो ? परिणाम होण्यास विवक्षित संस्कारसंपन्नता पाहिजेच. हें विचारांत घेतल्यानंतर मग वरील प्रश्नच उत्पन्न होत नाही.

तन्तुवाद्याच्या तारांपैकी जेवढ्या सारख्या ताणल्या असतील, तेवढ्याच त्यांपैकी एक वाजली असतां वाजतील; ज्यांना कमीअधिक ताण असेल, त्या कधीहि वाजणार नाहीत. कांही तारा वाजल्या नाहीत, म्हणून दुसऱ्या तारां-

सून संवादी स्वरच निघत नाही, असें म्हटलें तर तें कधीतरी योग्य होईल काय ? असेंच चित्रांविषयीहि समजावें.

चित्रकाराच्या आत्म्याइतका ज्यांचा आत्मा उच्च झाला असेल, तेवढ्यांवरच त्याच्या कलाकृतींचा ठसा उमटेल; इतरांवर तो कधीहि उमटणार नाही व इतरांवर तो उमटावा, असें म्हणणें ही मोठी थोरली चूकच आहे.

## फोटो व वास्तववाद.

वास्तववादी म्हणून जी चित्रकला प्रसिद्ध आहे, ती जर खरोखरच अगदी नितान्त वास्तववादी असेल, तर तिच्यांत व साध्या फोटोंत कांहीच भेद राहणार नाही; पण कोणताहि चित्रकार आपल्या चित्रास ( Photographic ) 'हें अगदी फोटोसारखें आहे,' असें म्हणवून घ्यावयास तयार होणार नाही व तसें कोणी म्हटलें, तर ती शिवी आहे, असेंच तो समजेल व त्यामुळे आपला अपमान झाला, असेंहि तो समजेल ! म्हणजे वास्तववादी चित्रकाराची कृति ही फोटोहून निराळी असते, हें लक्ष्यांत येण्यासारखें आहे व हा निराळेपणा असण्याचें कारण चित्रकार हा चित्रांत आपला आत्मा ओततो, तसा फोटोंत त्यास ओततां येत नाही, हें आहे.

फोटोमध्येहि फोटोग्राफरला आपला आत्मा ओततां यावा, यासाठी निरनिराळ्या प्रकारचे लेन्स व निरनिराळीं साधनें सध्या निर्माण झालेलीं आहेत व ४० वर्षांपूर्वी जशी फोटोग्राफी मृत होती, तशी ती आता राहिलेली नाही. सध्या फोटोमध्येहि युक्त्याप्रयुक्त्या करून त्यांत थोडातरी आत्मा ओततां येऊं लागला आहे; तथापि अजूनहि ध्येयवादी चित्रकारांनी आपल्या उच्चांकापर्यंत फोटोग्राफरला येऊं दिलेलें नाही, हेंहि कांही खोटें नव्हे.

गतिमान् पदार्थांचा, विशेषतः शर्यतीचा घोडा किंवा धावणारा मनुष्य

यांचा फोटो क्षणांत एक किंवा दोन अशा वेगाने घेतले, तर त्यांत गति नाश पावलेली दिसते.

चित्रकार अथवा मूर्तिकार आपल्या चित्रांत हवी तशी गति आणूं शकतो. याचें कारण चित्रकार आपल्या कल्पनेने दुहेरी–तिहेरी गति चित्रांत दाखवूं शकतो, तशी फोटोमध्ये एकच स्थिति खेचली जात असल्यामुळे गति दिसत नाही व आणतांहि येत नाही. निसर्गानुकरण व ध्येय यांतील हा भेद आहे.

चित्रकार आपल्या गतिमान् चित्रांत तीन गतींचें मिश्रण करतो. पायांत एक गति, हात व छातींत त्यापुढील गति व मस्तकाच्या ठेवणीमध्ये तिसरी गति. अशा तीन किंवा निदान दोन तरी गति चित्रकार आपल्या कुशलतेने दाखवीत असतो. या तीन गतींचा सारखा मेळ झाल्यामुळे दगडाच्या जड नृत्यमूर्तीमध्येहि सतत नृत्य चालू असल्याचा अथवा ती मूर्ति चालत अथवा धावत असल्याचा भास पाहणाऱ्याच्या मनावर होतो.

पण फोटोमध्ये कोणत्या तरी निमिषार्धाच्या वेळीं जी स्थिति त्याची असते, तीच स्थिति दाखवली जाते. मागील व पुढील कालांतील गतींचा संबंध कायमचा तोडून टाकला जातो; म्हणून धावत्या घोड्याच्या फोटोमध्ये गति दिसत नाही व चित्रकाराने काढलेल्या चित्रांत ती दिसते. यावरून लक्ष्यांत येईल की, शुद्ध यंत्रानुकरण व चित्रकारकृति यांत भेद कोठे व कसा आहे.

फोटोग्राफर सरळपणाने ध्येयवादी चित्रकाराची बरोबरी करील, असें सध्यातरी संभवनीय दिसत नाही; कारण चित्रकार हा आपल्या कल्पनासृष्टीचा निर्माता असतो व फोटोग्राफर हा अनेक परिस्थितींनी अत्यंत बांधलेला असतो. इतका बांधलेला असतांहि यथार्थ दृश्याचे नियम तोडून फोटोग्राफर त्या बंधनांतून सुटून बाहेर पडण्याचा अट्टाहास गेलीं ४० वर्षें करीत आला आहे व सध्या

त्यास त्या कामीं बरेंच यशहि आलेलें आहे, हें सिनेमाची व दुसरी फोटोग्राफी काळजीपूर्वक पाहिली असतां तेव्हांच कळून येण्यासारखें आहे. यावरून हें उघड होतें की, मनुष्य हा वास्तववादांत रमणारा नसून तो ध्येयवादांत भराऱ्या मारून अभौतिक आनंदाला प्राप्त करून घेऊं इच्छिणारा आहे. सर्वच कलांमध्ये हें सत्य आहे.

## चित्रकाराच्या तीन अवस्था.

प्रथमारंभीं शिकाऊ चित्रकार हा निसर्गाची नुसती प्रतिमा काढणाराच असतो. अगदी हुबेहूब चित्र काढतां आलें, म्हणजे त्याचें पहिलें शिक्षण संपलें. प्रत्येक चित्रकाराला या अवस्थेमधून गेलेंच पाहिजे. जर कोणी या अवस्थेमधील पाठ नीट करणार नाही, तर त्यास पुढच्या परीक्षांस बसतांही येणार नाही. निसर्गाच्या सर्व नियमांचीं बंधनें त्यास या वेळीं पाळावीं लागतात.

यापुढे जेव्हां दुसऱ्या अवस्थेंत चित्रकार जातो, तेव्हां त्याच्या निसर्गावरील विशेष प्रभुत्वास प्रारंभ होतो. या वेळीं हा आपल्या इच्छेप्रमाणे रेषा व वर्ण यांचा विलक्षण विन्यास करून जवळजवळ निसर्गाप्रमाणेच, पण त्यावर स्वत्वाचा कमीअधिक छाप मारून, आपलें चित्र तयार करीत असतो. निसर्गनियमांच्या बाहेर जाण्याकडे या वेळीं याची थोडीशी प्रवृत्ति होते व त्यामानाने याच्या कृतींत कलेचा थोडासा अवतार होऊं लागलेला दिसतो.

यानंतर तिसऱ्या उच्च अवस्थेमध्ये पोचलेला चित्रकार हा स्वतःचे निराळेच नियम बनवील व जें काय त्याच्याकडून होईल, तेंच आदर्श चित्र म्हणून समजलें जाईल. याची कलाकृति ही निसर्गाची अचूक प्रतिकृति, असें कधीहि म्हणतां येणार नाही. खरी कला याच्या कुंचल्यांतूनच निघूं शकते व ती विशेष प्रभावीहि असते.

तिसऱ्या अवस्थेंतील चित्रकार नियम झुगारून देतो, म्हणून पहिल्या अवस्थेंतील चित्रकारहि तसेंच कांही करूं लागेल, तर तो फसेल.

सध्याच्या हिंदी चित्रकारांची प्राचीन परंपरा सध्या सुटलेली आहे व युरोपियन परंपरा येथे अजून नीटशी मुरलेली नाही. युरोपमध्ये गेलीं चारपांचशे वर्षे चित्रकारांकडून निसर्गाचा अभ्यास इतका अधिक झालेला आहे की, आता ते चित्रकलेमध्ये नवयुग निर्माण करण्याची भाषा बोलूं लागले आहेत; हें त्यांच्या एवढ्या तपश्चर्येस साजेसेंच होत आहे. भारतीय चित्रकार अजून पहिल्यादुसऱ्या अवस्थेंतच आहेत; यामुळे ते नवयुग निर्माण करण्याच्या युरोपियनांच्या कल्पना अजून जाणूंहि शकत नाहीत.

हिंदी चित्रकलेसंबंधाने बोलावयाचें म्हटलें, तर बंगालमधील कांही थोर लोकांनी नव्या उत्साहाने हिंदी चित्रकलेंतील गुण नव्या दृष्टीने दाखवण्याचा स्पृहणीय यत्न केला व आज त्यास जगांत थोडीबहुत मान्यताही येऊं लागली आहे. ठिकठिकाणच्या चित्रशाळां ( Arts Schools )मधून तो विषय शिक्षणक्रमांत घातला गेला आहे; परंतु ही परंपरा पुनः रूढ होण्यासहि अर्ध शतक तरी जावें लागेल. या परंपरेंत नव्या कल्पनांचे चित्रकार तयार होतील व ते जेव्हा आपली पद्धति निर्माण करतील, त्या वेळींच या चित्रकलेची स्वतःची रूढि निर्माण होणें शक्य आहे.

## चित्रकारांशीं हितगुज.

आपल्या देशांतील चित्रकारांनी हिंदीच पद्धतीने चित्रें काढावींत अथवा युरोपियन पद्धतीने काढूं नयेत, असा कोणीहि आग्रह धरूं नये. दोनही पद्धतींमध्ये स्वतःचे असे विशेष गुण आहेत व त्यांचा पूर्ण विकास आपल्या देशांत झालाच पाहिजे. यासाठी मला असें वाटतें की, कोणत्या पद्धतीची चित्रकला शिकावी, हें ज्याच्या त्याच्या मनाच्या ठेवणीवर अवलंबून राहणार आहे. चित्रकारांनी कोणतीहि पद्धति स्वीकारावी; पण तींत उच्च दर्जा संपादन करण्याचा होईल तितका प्रयत्न करावा व त्यांत स्वत्व दाखविलें जाईल, असें करावें.

## चित्रकाराचा साहित्यिक दर्जा.

चित्रकाराने स्वतःचा साहित्यिक दर्जाही वाढवला पाहिजे. ग्रंथवाचन व मनन करण्याने हें साध्य होणें शक्य आहे. निदान लेखकाचें हृद्गत समजण्याइतकें तरी चित्रकाराचें मन साहित्यसंस्कारांनी संपन्न झालेलें असलेंच पाहिजे. चाळीस वर्षांपूर्वींच्या कल्पना आता पुढील काळांत टिकून राहणें शक्य नाही. म्हणून ही जबाबदारी आता चित्रकारांनी ओळखली पाहिजे.

## साहित्योपयोगी चित्रें.

आता ऐतिहासिक, पौराणिक, सामाजिक, अशा अनेकविध विषयांसंबंधाच्या चित्राबद्दल थोडासा विचार करणें अगत्याचें आहे.

अशा चित्रांमध्ये नेहमी जो दोष होतो, तो कालव्युत्क्रमाचा (Anochronism) दोष होय. हा दोष चित्रांत होऊं नये, अशी खबरदारी घेतली पाहिजे. जनकाच्या राजसभेमधील मंत्र्यांच्या डोक्यावर आजची पुणेरी पगडी घालणें, वैदिक कालच्या ऋषींच्या घरांत यंत्रांनी बनलेलीं भांडीं ठेवणें, अशा प्रकारचे दोष पुष्कळ चित्रकारांकडून होत असतात. एका चित्रकाराने भगवान् श्रीकृष्णाच्या द्वारकेंतील त्या काळच्या देखाव्यांत मशीद दाखवली होती ! हा कालव्युत्क्रमाचा दोष जसा चित्राचें महत्त्व कमी करतो, त्याचप्रमाणे स्थानव्युत्क्रमाचा दोषहि फार हानिकारक आहे. काश्मीर शीतप्रधान देश आहे व मद्रास उष्णताप्रधान देश आहे; यामुळे तेथील राहणी निराळी असते व लोकांचे कपडेलत्ते त्या हवामानास अनुकूल असे तेथे वापरले जातात. जें चित्र आपणांस काढावयाचें असेल, तें ज्या देशांतील असेल, तेथील हवापाण्याच्या परिस्थितीस अनुसरून तें चित्र काढलें पाहिजे. मद्रासच्या चित्रांतील माणसाच्या अगांत भरभक्कम आंगरखे घालणें व हिमालयांतील चित्रांत नुसतीं उपरणीं दाखवणें, हें या दोषांचें स्वरूप आहे.

कालव्युत्क्रम, स्थानव्युत्क्रम हे जसे चित्रांमध्ये मोठे दोष गणलेले

आहेत, त्याचप्रमाणे ध्येयव्युत्क्रमही फार मोठा दोष आहे. आर्यांचें ध्येय व अनार्यांचें ध्येय कधीहि एक नसतें; सुरांचें व असुरांचें ध्येय एक असणें शक्य नाही; साम्यवादी, समाजवादी, फॅसिस्ट, नाझी, लोकसत्ताक यांचीं निरनिराळीं ध्येयें असतात. जें चित्र आपण काढणार, त्यांत कोणतें ध्येय व्यक्त व्हावयास पाहिजे, हें चित्रकाराच्या मनांत आधी नक्की झालें पाहिजे. अशा प्रकारचे व्युत्क्रमदोष अनेक असूं शकतात, हे दोष चित्रकाराने टाळले पाहिजेत.

समजा की, पुस्तकाच्या दर्शनी भागासाठी चित्र काढावयाचें आहे; तर तें काढावयास प्रारंभ करण्यापूर्वी या पुस्तकांत कोणत्या कालांतील, कोणत्या देशांतील व कोणत्या जातींतील, कोणत्या ध्येयाच्या लोकांचें वर्णन आहे, त्यांत प्रसंग कोणते आहेत, पुस्तकाचें ध्येय काय आहे, लेखाचा एकंदर ठसा वाचकांवर कोणता पडणार आहे, याची नक्की कल्पना चित्रकाराच्या मनांत आधी आली पाहिजे. ती न आली, तर गृहस्थाश्रमाचें वर्णन असलेल्या पुस्तकावर श्रमणाचें चित्र व संन्यासधर्मप्रचार करणाऱ्या पुस्तकावर आधुकमाधुकांचें चित्र, असा प्रसंग ओढवेल! ग्रंथकार व चित्रकार यांचें या बाबतींत जेवढें ऐक्य होईल, तेवढें तें इष्ट आहे. या व्युत्क्रमाच्या दोषांची सर्व जबाबदारी चित्रकारांवरच सध्या टाकतां येईल असें नाही. कारण कांही लेखकही याचे वाटेकरी सध्या होण्यासारखे आहेत; म्हणूनच या दोषांचा विचार दोघांनीहि एकमताने केला पाहिजे.

चित्र काढावयाचे वेळीं हें चित्र देवघरांत टांगावयाचें, रंगमहालांत ठेवावयाचें, स्वयंपाकघरांत असावयाचें कीं राजदरबारीं रहावयाचें, याचाही विचार झाला पाहिजे. देवघरांत ठेवावयाच्या चित्रांत सात्त्विकपणा, रंगमहालांत टांगावयाच्या चित्रांत विलासीपणा व राजदरबारच्या चित्रांत वीरता हे गुण प्रामुख्याने पाहिजेत. इतर चित्रांसंबंधीहि असाच विचार व्हावयास पाहिजे.



# कला, नीति व 'ओलेती'

चित्रकलेच्या प्रारंभापासून अखेरपर्यंत निदान चार तरी वर्ग कल्पिले पाहिजेत; म्हणजे ' ओलेती ' हें चित्र कोणत्या वर्गांत येतें तें समजण्यास बरें पडेल व त्यावरून कला या दृष्टीने त्याची योग्यता ठरवितां येईल. एकदा चित्रांतील कलेची आपणांस परीक्षा करतां आली म्हणजे त्याच विचारसरणीने लेखनांतील कलेचाही आपणांस निश्चय करतां येईल. कारण ' वर्ण-विन्यास ' हा जसा चित्रामध्ये असतो, त्याचप्रमाणे तो लेखनामध्येहि असतोच. चित्रामध्ये वर्ण म्हणजे ' रंग ' व लेखनामध्ये वर्ण म्हणजे ' अक्षर ' हे जरी अर्थ निराळे असले, तरी दोनही कलांचे नियम अगदी सारखेच आहेत म्हणून एका कलेची जर आपणांस चांगली कल्पना होईल, तर तेच नियम लावून आपणांस दुसऱ्या कलेचीही कल्पना करतां येणें शक्य आहे.

### चित्रकारांचे चार वर्ग.

(१) चित्रकलेच्या पहिल्या वर्गांत असलेला विद्यार्थी निसर्गाचें अनुकरण करण्याची खटपट करीत असतो; पण त्याला तें चांगलें साधलेलें

नसतें. तो फक्त खटपट करीत असतो. या वर्गांतील चित्रकार रेघोट्या काढणारा असो किंवा जलवर्ण, तैलवर्ण अथवा धूलिवर्णांमध्ये प्रयत्न करीत असो, तो कोणत्याही साधनाने निसर्गाचेंच अनुकरण करीत असतो. तो फक्त अनुकरणच करीत असल्यामुळे व त्यापेक्षा त्याची प्रगति अधिक झालेली नसल्यामुळे त्याचा पहिला वर्ग आहे, असें आपणांस म्हणतां येईल. याला आपण **'अनुकरणेच्छूंचा वर्ग'** अशी संज्ञा देऊं. ही चित्रकाराची अगदी प्राथमिक स्थिति आहे. मुंबईच्या आर्ट स्कूलमधून आठ वर्षें शिकून तयार झालेले विद्यार्थी या वर्गांत येतात.

(२) जे निसर्गाच्या सारखें चित्र रेखाटूं शकतात, अशा चित्रकारांचा दुसऱ्या वर्गांत समावेश होतो. अगदी मुळासारखें हुबेहूब चित्र काढण्यांत यांची फार प्रवीणता असते. पण हा हुबेहूबपणा चित्रांत उतरविण्यास त्यांस काळजीपूर्वक प्रयत्न करावा लागतो. हीच दुसऱ्या वर्गाची मर्यादा आहे. याला आपण **'अनुकरण-प्रवीणांचा वर्ग'** असें म्हणूं. यांत बरींच वर्षें काम करीत असलेले चित्रकार येऊं शकतील. यांच्यांत कलेचा अल्पसा प्रारंभ झालेला असतो.

(३) जे लीलेने सहजगत्या फारसा प्रयत्न न करतांच निसर्गासारखें चित्र काढूं शकतात, अशा चित्रकारांचा चित्रकलेच्या तिसऱ्या वर्गांत समावेश होतो. काळजीपूर्वक चित्र न काढतांही त्यांच्या चित्रांत इतका हुबेहूबपणा येतो की, दुसऱ्या वर्गांतील चित्रकारांनी महिन्यांचे महिने खटपट केली तरीही, यांच्या चित्रांची सर त्यांच्या चित्रांस येऊं शकत नाही. चित्रांत निसर्गासारखा हुबेहूबपणा वठवणें, हा त्यांचा सहज स्वभावच बनलेला असतो. या वर्गांतील चित्रकारास आपण **'अनुकरणपारंगत चित्रकार'** असें म्हणूं. या वर्गांतील चित्रकारांमध्ये कला अवतरलेली असली, तरी त्यांत कलेची परिपूर्णता झालेली नसते.

या तीनही वर्गांतील लोकांना जें काय करावयाचें असेल, तें चित्र

करतेवेळीं रेषांचे पर्स्पेक्टिव्हचे नियम, रंगाच्या छायांचे नियम, ठेवणीचे नियम वगैरे सर्व चित्रशास्त्राचे नियम पाळावे लागतात; म्हणजे यांचें काम शास्त्रनियमांनी सुसंबद्ध असतें. त्यांना नियमांचें उल्लंघन करून, शास्त्रनियमांना आपल्या आधीन ठेवून, त्या नियमांना आपल्या इच्छेप्रमाणें वळवून, त्यांच्यावर आपल्या प्रभुत्वाचा छाप मारण्याचा अधिकार आलेला नसतो. या तीनही वर्गांतील चित्रकार हे नियमांचे गुलाम असतात. नियमांच्या कक्षांत वागणें यांना भागच असतें. नियमांवर आपला ताबा चालविण्याचें धैर्यच यांना होणें शक्य नसतें. वेदान्तशास्त्रदृष्टीने आपण यांना ' बद्ध जीव ' म्हणूं शकतों. यावर आणखी एक चित्रकारांचा वर्ग आहे. त्याला आपण ' मुक्तात्म्यांचा वर्ग ' असें म्हणूं. हे चित्रकार बंधनांच्या पलीकडे पोचलेले असतात; म्हणून यांचें स्थान फार वर असतें.

(४) जे आपल्या इच्छामात्रेंकरून रेखाविन्यास, वर्णविन्यास, आदींमध्ये असें प्रभुत्व दाखवतात की, यांच्या चित्राची नक्कलसुद्धा पूर्वींच्या तीन वर्गांतील चित्रकारांना करतां येणें शक्य नसतें. असे चित्रकार चित्रकलेच्या चवथ्या वर्गांत येतात. हे मुक्तच असल्यामुळे स्वैरविहारी, नियमांची पर्वा न करणारे ( पण यांच्यामागून नियम धावत येत असावेत असेंही म्हणतां येईल ), चित्रसृष्टींत स्वर्गीय चैतन्य खेळवणारे, जड चित्रांमध्ये सजीवपणाचा भास उत्पन्न करणारे असे असतात. हे करतील तो नियम व हे ठेवतील तो वर्णविन्यास आणि हे ठरवतील ती पूर्वदिशा, असा यांचा अधिकार असतो. ' असें कां ? ' असें त्यांना विचारण्याचा कोणालाहि अधिकार नाही. कारण निसर्गनियमनांवर प्रभुत्व गाजवून आत्मिक चैतन्य जड फलकावर आणण्यांत यांच्यासारखे हेच असतात. म्हणून यांना ' चित्र-कला-सम्राट् ' असें आपण म्हणूं. यांच्या चित्रांत खरा ' कला-विकास ' दिसत असतो.

## कला-दृष्टीने 'ओलेती'

ज्यांना आपण ' चित्र-कला-सम्राट् ' अशी येथें पदवी दिली, ते

चवथ्या वर्गांतील चित्रकार आपल्या हिंदुस्थानांत मुळीच नाहीत. बहुतेक हिंदुस्थानांतील चित्रकारांना मी ओळखतों; पण त्यांत जो या चवथ्या वर्गांत आहे असें म्हणतां येईल, असा एकही चित्रकार नाही. ज्या ' ओलेती ' चित्राचा आपणांस विचार करावयाचा आहे, तें चित्रही या चवथ्या वर्गांतील कृति आहे, असें म्हणतां येणार नाही. तेव्हा ' कला ' या दृष्टीने 'ओलेती' हें चित्र 'कलासम्राट्' वर्गांत येत नाही, हें वाचकांनी लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. आज आपल्या हिंदुस्थानांत जे चित्रकार आहेत, ते फार तर दुसऱ्या वर्गांत मोडणारे आहेत व अगदी थोडे तिसऱ्या वर्गांत, अगदी खाली बसण्या-जोगे आहेत. प्रस्तुत 'ओलेती' चे चित्रकार श्री० ठाकुरसिंह हे सुप्रसिद्ध चित्र-कार आहेत खरे; पण ते फक्त आपण ठरविलेल्या दुसऱ्या वर्गांत बऱ्याच वरच्या जागेवर बसूं शकतील. यापेक्षा त्यांस वरचें स्थान मिळणार नाही; म्हणजे आपण जे चित्रकला मापण्याचे चार वर्ग ठरवले आहेत, त्यांतील दुसऱ्या वर्गांतच हे येऊं शकतात व दुसऱ्या वर्गांतील चित्रकाराच्या चित्रांत फार मोठी ' कला ' आहे, असें म्हणतां यावयाचें नाही, हें वाचकांनी विसरतां नये.

## हिंदुस्थानांतील चित्रकारांची वर्गवारी.

सुप्रसिद्ध चित्रकार राजा रविवर्मा हे सुद्धा तिसऱ्या वर्गांत बसूं शकतील कीं नाही, याबद्दल मला शंका आहे. ते दुसऱ्याच वर्गांत सरासरी मध्याच्या थोडे वर बसूं शकतील इतकेंच. बाकी जे वर्तमानपत्रांत प्रसिद्धी करून घेणारे चित्रकार महाराष्ट्रांत आहेत, त्यांपैकीं बहुतेक पहिल्या वर्गांत बसूं शकतील व कांही प्रसिद्ध चित्रकार असे पांचचार चित्रकार असतील, ते दुसऱ्या वर्गांत बसूं शकतील. यापेक्षा वरच्या योग्यतेचा चित्रकार महाराष्ट्रांत नाही. पण प्रत्येक हिंदी चित्रकार आपल्या कारागिरीच्या कुयांत मात्र असतो. याचें कारण अर्धवटपणा हेंच आहे. ही जी वर्गवारी मी येथे ठरवली आहे, ती

-युरोपचे सर्व चित्रकार लक्ष्यांत घेऊन केलेली आहे. आज फ्रान्समध्ये वर्ण-विन्यासाच्या दृष्टीने चवथ्या वर्गांत बसूं शकणारे थोडे चित्रकार आहेत व आकारविन्यासाच्या दृष्टीने चवथ्या वर्गांत बसूं शकणारे कांही चित्रकार इटलीमध्ये आहेत. त्यांच्या पासंगाला पुरेल इतकीसुद्धा चित्रकला आपल्याकडे अजून झालेली नाही व ज्या रीतीने प्रगती चालू आहे त्या रीतीने पुढील शेदोनशे वर्षांत तरी प्रगति होईल कीं नाही, याची शंकाच आहे. पण जर भारतवर्ष स्वतंत्र झाला तर त्याची प्रगति लवकर होईल; कारण येथे चित्रकलेला जशी बुद्धि हवी तशी ती आहे. सध्याचा प्रगतीचा अभाव हा विपरीत परिस्थितीमुळे आहे.

तेव्हा कलेच्या दृष्टीने ' ओलेती ' हें चित्र अगदीच मध्यम आहे. 'चांगलें अनुकरण' एवढेंच काय तें त्यांत आहे. तेंही बेफाम स्वतंत्रतेने केलेलें नव्हे, तर जपून मला अमुकाचें अनुकरण करावयाचें आहे अशा भावनेने केलेलें अनुकरण आहे. 'मी सहज लीलेने कुंचला मारीन, तेथें आपोआप दृश्य तयार झालेंच पाहिजे,' अशा अमर्याद आत्मविश्वासाची त्यांत छटाही नाही. ही गोष्ट ज्याला चित्रकला समजते, त्यास सांगण्याची गरज नाही.

पहिल्या वर्गांतील चित्रकार यास कला म्हणोत; पण जगाच्या प्रदर्शनांत फ्रान्स व इटलींतील महानुभाव चित्रकलासम्राटांनी आपली दृष्टि या 'ओलेती' वर टाकावी असें त्यांत कांही सुद्धा नाही. म्हणून या 'ओलेतीं' त कला आहे असें जे म्हणतात, त्यांस कला म्हणजे काय तें तरी समजतें कीं नाही, याची जबरदस्त शंकाच आहे. पहिल्या इयत्तेतील मनुष्य बी. ए. च्या वर्गांत असलेल्यास पुष्कळ विद्वान् समजो, पण कविवर्य रवींद्रनाथ ठाकुरांच्यासमोर त्या बी. ए. ची काय किंमत असणार ? तेंच प्रमाण येथे आहे असें समजावें.

## नांवाची निरर्थकता.

या चित्रास 'ओलेती' हें नांव कोणी दिलें, हें मला माहीत नाही; चित्र-

-कारानेही यापेक्षा अधिक सरस काव्यमय नांव दिलेलें असावें, असें वाटत नाही; पण जर त्याच चित्रास 'ओलेती' हें नांव न देतां **'जडाच्या पलीकडे'** असें किंवा अशासारखें कांही सूचक नांव दिलें तर चित्राची किंमत कलेच्या दृष्टीने थोडीशी वाढेल.

**'ओलेती' हें नांव अगदीच गद्य** आहे; त्यांत कांहीच काव्य नाही. अपारदर्शक वस्त्ररूपी जड आवरणाच्या पलीकडे जी सत्य जीवन-कला आहे, ती जीवनकला शुद्ध ( जलरूपी ) जीवन मिळाल्यामुळे अपारदर्शक आवरण पारदर्शक म्हणजे सूक्ष्म झाल्यामुळे, व्यक्त होऊन दिसत आहे, अशा अर्थाचें सूचक एखादें नांव या चित्रास मिळालें, तर यांतच थोडें काव्य उत्पन्न होईल व जर हें काव्य या चित्रांत निर्माण झालें, तर त्या दिव्य दृष्टीने पाहणारा-पुरती त्यांतील **अश्लीलता नाहीशी** होईल व त्यांत कलेचीहि अधिक निर्मिति होऊं शकेल. चित्रामध्ये पूर्ण कलाविकास व्यक्त होण्यासाठी योग्य अभिधान ठेवणें किती आवश्यक आहे, याची कल्पना येथे वाचकांस सहज होईल. ही व्हावी म्हणूनच या अभिधानासंबंधाने येथे हे चार शब्द लिहिले आहेत. 'ओलेती' या नांवामुळे जी अश्लीलतेची कल्पना डोळयाला दिसते, ती **'जडाच्या पलीकडे'** असें सूचक अभिधान दिलें तर ती अश्लील कल्पना रहातच नाही व पाहणाराचें मन उच्च आध्यात्मिक भूमिकेमध्ये विराजूं लागतें. इतका अभिधानाचा कलेशीं निकट संबंध आहे. असो.

## कलावंताची दृष्टि.

यावरून कलाप्रेमी मनुष्याची दृष्टि कोठपर्यंत पोचली पाहिजे, तें कळेल. जर कोणी 'नुसती चित्रकला शिकूनच मी चित्रकलासम्राट् होईन,' अशी आकांक्षा धरील तर ती कधीही साध्य होणार नाही. ही पदवी मिळविण्यासाठी त्याला सर्व इतर काव्यादि कलांमध्ये बरेंच प्रावीण्य संपादन केलें पाहिजे; इतकेंच नव्हे तर साहित्य, तत्त्वज्ञान आदींमध्येही तो बराच पुढे गेला पाहिजे.

तरच तो 'चित्रकला-सम्राट्' होऊं शकेल. इटलीमध्ये जे चित्रकलासम्राट् होऊन गेले व ज्यांना 'मास्टर आर्टिस्ट' असें म्हटलें जातें, त्यांपैकी प्रत्येक जण अनेक कलांमध्ये निष्णात होता. इतकेंच नव्हे तर चित्रकला, मूर्तिकला, काव्य, वक्तृत्व, तत्त्वज्ञान, धर्म इत्यादींमध्ये एखाद्याची विशेष प्रगति नसली तर त्यास त्या वेळच्या चित्रकारांच्या संघामध्ये स्थानच मिळत नसे. अशा रीतीने हे अष्टपैलू कलानिधि चित्रकार होते, म्हणूनच त्यांच्या 'निर्मिती' मध्ये अपूर्वता आलेली आहे. ती अपूर्वता अजूनपर्यंत टिकलेली आहे, हें त्यांच्या तपस्येचें फळ आहे.

जें चित्रकलेसंबंधाने खरें आहे, तेंच मूर्तींच्या कलेसंबंधानेहि खरें आहे. तीच गोष्ट गायनकलेविषयीहि आहे. परमपूज्य अलादियाखाँसारखे गायन-कलासम्राट् उच्च अशा चवथ्या वर्गांतील गवयी क्वचित् कोठे तरी दिसतात. त्यांच्या आधीन स्वरसप्तक झालेलें आहे. त्यांनी ज्या रागांत जो स्वर गाणार असें म्हणावें, तो त्या रागांत हमखास गाऊन दाखवावा !! स्वरांचे वर्ज्यावर्ज्य त्यांना बाधक होत नाहीत. इतर गवयांनी ते खालच्या तिसऱ्या वर्गांत मोडत असल्यामुळे वर्ज्यावर्ज्याचे नियम पाळावे. साधारणतः कला व कलाविकास यांच्या मर्यादा याप्रमाणे ओळखतां येतील. कोणतीही कला व कोणत्याही कलेचा विलास पहावयाचा असतांना त्याची परीक्षा अशा रीतीनेच करतां येईल. आता हेच नियम लेखनकलेला लावून पाहिले पाहिजेत.

## लेखकांचे चार वर्ग.

लेखन हें गद्य असो किंवा पद्य असो, तें एक प्रकारचें शब्दचित्रच आहे व चित्रकलेप्रमाणेच याचाही निसर्गाच्या अनुकरणापासूनच प्रारंभ होत असतो. म्हणून आपण चित्रकारांचे जे चार वर्ग वर कल्पिले आहेत, तेच आपण येथे लेखकांचे आहेत असें समजूं. म्हणजे लेखनकला कोणामध्ये कशी आहे व कलाविलास कोणामध्ये किती झालेला आहे, तें आपणांस समजून येईल.

(१) अनुकरणेच्छा, (२) अनुकरण–निपुणता, (३) पारंगतता व (४) लीला–कलाविलास हे आपले चार वर्ग आहेत. निसर्गाच्या गोष्टींचें अनुकरण लेखक शब्दांच्या द्वाराने करीत असतो. यांत कथालेखन, वृत्तांत-लेखन, वगैरे सर्व प्रकारचें लेखन येतें. ही सर्व निसर्गाची अनुकृतीच आहे. चित्रकार निसर्गाची छाया कागदावर काढतो व लेखक निसर्गाचा फोटो शब्दांत घेतो. दोघेहि निसर्गाचेंच अनुकरण करीत असतात. पहिल्या तीनही वर्गांतील लेखक केवळ अनुकरणतत्पर असल्यामुळे त्यांनी कितीहि पटुता दाखवली, तरी यांच्या प्रतिकृतीची मर्यादा बिंबाप्रमाणे प्रतिबिंब उठवणें एवढीच असते.

केवळ हुबेहूब प्रतिबिंब उठवणें, हीच कला असेल तर कॅमेऱ्यांतून निघणारा फोटो कलाविलासाचें शेवटचें टोंक मानावें लागेल; पण तसें कोणी मानणार नाही. कारण केवळ बिंबासारखेंच प्रतिबिंब उठवणें हें कांही विशेष महत्त्वाचें नाही; तें आरशांतसुद्धा खटपटीशिवाय दिसूं शकतें. म्हणून अनुकरणांत येणारी कला ही फारशी महत्त्वाची नाही. ती फार तर अनु-करणाचें आवरण फोडून पलीकडे जाण्याची पायरी होऊं शकेल. यापेक्षा तिला फारसें महत्त्व नाही. खरा कलाविलास अनुकरणाचें आवरण फोडून बाहेर पडल्यावर होत असतो.

## सांप्रतचा लेखकवर्ग.

आता महाराष्ट्रांतील लेखक–वर्ग पाहिला तर असें दिसतें की, तो अनुकरणसुद्धा जसें केलें पाहिजे तसें करूं शकत नाही. निसर्गामध्ये व विशेषतः मानवी जीवनामध्ये इतक्या अनंत घटना आहेत की, त्यांचें यथा-योग्य शब्दचित्र काढणार म्हटलें तरी केवढी तरी अनंत, अपरिमित व विविध निर्मिति होऊं शकेल. त्या निर्मितीमुळे मनुष्याचा मानसिक विकासहि होऊं शकेल; पण महाराष्ट्रांतील लेखक या निसर्गाच्या अनंत घटनांकडे पहात तरी आहेत काय? सध्याच्या तरुण महाराष्ट्रीय लेखकवर्गाची दृष्टि ही केवळ

'प्रणय' एवढ्या एकाच विषयावर वेधलेली आहे. निसर्गामध्ये व मानवी जीवनामध्ये अनंत पैलू असतांहि व त्यांकडे पाहणें अत्यंत इष्ट असतांहि जेव्हा एका काळचा लेखकवर्ग एकाच पैलूचें अनुकरण करीत बसतो, त्या वेळीं त्यांत सरस्वतीचा प्रवाह खेळत नाही, तें नासक्या पाण्याचें डबकें झालेलें आहे, असें म्हणावयास कांही हरकत नाही. एखाद्या राष्ट्राच्या तरुणांचा दृष्टिकोन असा संकुचित होणें केव्हाहि इष्ट नाही. केवळ एका प्रणयाकडेच तरुण लेखकवर्ग वळल्यामुळे व त्याची दृष्टि अनंताकडून ढळल्या-मुळे महाराष्ट्राच्या अफाट प्रतिभेमध्ये किती ऱ्हास झालेला आहे, याचा विचार या वेळीं पुढाऱ्यांनी करणें जरूर आहे.

आपल्या मानवी देहामध्ये अनेक अवयव आहेत. त्या सर्वांस उत्तम व्यायाम मिळावा व सर्वांची सारखी वाढ व्हावी, हें देहाच्या आरोग्याच्या दृष्टीने अत्यंत इष्ट आहे; पण अशी सर्वांगीण उन्नति न करतां जर कोणी शरिरांतील एकाच अवयवाला अत्यधिक व्यायाम देईल व इतर अवयवांची हेळसांड करील तर त्याच्या त्या संकुचित दृष्टीमुळे शेवटीं त्याचा नाशच होईल. म्हणून शरिराच्या सर्व भागांना व्यायाम मिळणें जसें अगत्याचें आहे, तसेंच राष्ट्राच्या देहाविषयीहि जाणावें. जर राष्ट्रामध्ये प्रणयी वाङ्मय व तेंहि हीन प्रणयाने भरलेलें असें वाढूं लागलें व दुसऱ्या लेखनाकडे दुर्लक्ष्य झालें, किंवा लोकांची मनःप्रवृत्ति दुसरें वाङ्मय न वाचतां प्रणयाकडेच वाढली, तर मानवी मेंदूतील एकच केंद्र उद्दीपित होईल. त्याच केंद्रावर असाधारण दाब पडल्यामुळे इतर केंद्रें अशक्त होतील व या अशक्ततेने अशा राष्ट्राचा घात होईल. यासाठीच पुढाऱ्यांनी हा वाङ्मयाचा समतोलपणा आपल्या राष्ट्रांत कायम टिकेल, असें करण्यास झटलें पाहिजे.



# सांस्कृतिक सारस्वत व सद्य:स्थिति

सध्याचा काळ विचार-स्वातंत्र्याचा आहे. स्वातंत्र्य चिरायु होऊन तें विजयी होवो ! विचारस्वातंत्र्याचें मी मन:पूर्वक अभिनन्दन करतों; कारण मनुष्यांनी स्वतंत्र्याचा जर खरोखर सदुपयोग केला तर त्यांची उन्नति झाल्याशिवाय कधीहि राहणार नाही.

जेव्हा विचारपारतंत्र्याचा काल असतो, तेव्हा आपले विचार जनते" पुढे मांडण्यास लोकांस फार प्रतिबंध होत असतो; तसा प्रतिबंध विचारस्वातंत्र्याच्या कालामध्ये होणें शक्य नाही. स्वतंत्रपणाने विचारविनिमय होऊन सत्यनिर्णय होण्याच्या दृष्टीने विचारस्वातंत्र्याचा काल हा भाग्योदयाच्या पूर्वीचा काल आहे, असें म्हणण्यास मुळीच हरकत नाही. मात्र विचारस्वातंत्र्याचा उपयोग सत्यनिर्णयासाठीच केला पाहिजे; नाहीतर पक्षभेद वाढून शक्ति क्षीण झाल्याशिवाय राहणार नाही. म्हणूनच या स्वातंत्र्याचा उपयोग सावधानतेने केला पाहिजे.

## आमचें ध्येय.

आमची संस्कृति ही स्वातंत्र्यप्रिय संस्कृति आहे. स्वातंत्र्यप्रिय नसलेल्या लोकांचें ध्येय 'मोक्ष' हें होऊंच शकत नाही. ज्या संस्कृतीने **'बंधनान्मोक्षः'** हें आपलें साध्य ठरवून **'ज्ञान'** हें त्याचें साधन आहे असें निश्चित केलें व प्रत्येक मनुष्य हा ज्ञानाने आपलीं बंधनें तोडून मोक्ष प्राप्त करून घेऊं शकतो, असा ज्या संस्कृतीने असंदिग्ध सिद्धान्त ठरवला, त्या संस्कृतीची स्वातंत्र्यप्रियता किती उच्च दर्जाची होती, हें कांही निराळें सांगण्याचें कारण नाही.

ज्या संस्कृतीमध्ये वाढलेल्या दार्शनिक विचारकांनी ईश्वरत्वाची छाननी करून **( ईदृशेश्वरसिद्धिः सिद्धा )** या गुणांनी युक्त असेल तरच तो ईश्वर आम्हांस मान्य आहे, या गुणांनी युक्त नसेल तर तो ईश्वर आम्हांस मान्य नाही, असें निर्भयपणाने उद्घोषित केलें; ब्रह्म, ईश्वर, परमात्मा, आत्मा यांच्या गुणांची छाननी करण्यासही ज्यांचें मन कचरलें नाही व आम्ही सत्कर्म करीत असल्याने ईश्वराच्या दयेची याचना करण्याचें आम्हांला कारण नाही, असेंहि ज्या संस्कृतींतील कर्ममार्गीयांनी निःसंकोचपणाने सांगितलें व त्यांचें म्हणणें इतरांनी ऐकूनहि घेतलें, त्यांची स्वातंत्र्यप्रियता निःसंशय अत्यंत उज्ज्वल होती, यांत शंका घेण्याचें कारण नाही.

ज्या संस्कृतीमधील विचारकांनी विश्वसंचालक परमात्मशक्तीचेसुद्धा 'गुलाम' बनण्याचें नाकारलें व '**अहं ब्रह्मास्मि**' असें म्हणून '**मी आज नर असलों तरी मी नराचा नारायण खात्रीने होणार आहे,**' असें निश्चितपणाने ठरवून जीवाचा शिव बनण्याचा हिय्या धरला, ते विचारक या पृथ्वीवरील लहानशा क्षेत्रांतील राजकीय किंवा सामाजिक संस्थांचें पारतंत्र्य स्वीकारून सहजासहजीं गुलामपणांत राहतील, हें कोणासहि खरेंसुद्धा वाटणार नाही; पण तें जर एखाद्या कालांत खरें आहे असें दिसलें तर त्याच्या कारणांचा शोध फारच सावधपणाने केला पाहिजे.

' मोक्ष ' हें ध्येय ठरवणारे व ' नराचा नारायण बनण्याचा हिय्या ' धरणारे लोक कधीहि कायमचे पारतंत्र्यांत राहणें शक्य नाही.

## क्रांतीचा काल.

सध्याच्या कालास क्रान्तीचा काल म्हणतात. क्रान्ति चिरायु होवो, असें आम्ही म्हणूं शकत नाही; पण ती यशस्वी होवो, असें मात्र म्हणतों. कारण क्रांति या शब्दानेच मधल्या अल्प कालांतील घडामोडींचा बोध होत असतो. कोणत्या तरी दोन मोठ्या कालखंडांच्या सन्धिसमयींच तेवढें क्रान्तीचें अस्तित्व असतें. यापेक्षा तिला अधिक शाश्वती नाही. इतका क्रान्तिकाल लहान असतांहि त्याला महत्त्व मात्र फार आहे.

क्रान्ति दोन प्रकारची असते– एक उपसर्गरहित व दुसरी उपसर्गसहित. सर्व प्रकारचे उपसर्ग टाळून केली जाणारी क्रान्ति फारशी महत्त्वाची असूं शकत नाही. असल्या उपसर्गरहित नुसत्या 'क्रान्ती' चा कांहीच अर्थहि होऊं शकत नाही. जिच्या पाठीमागे अनेक उपसर्ग लागत जातात, त्य क्रान्तीचीच कोणती तरी दिशा ठरवतां येते. उदाहरणार्थ, 'उत्क्रान्ती' च पहा. हिच्या मागे उपसर्ग असल्याने हिची दिशा उच्च आहे, असें तत्काल ठरतें; पण हें ठरतांच खालच्या बाजूला किंवा आजूबाजूला जातां नये, हें बंधन ती क्रान्ति करणारांना स्वीकारावेंच लागतें व वर जाण्यासाठी चढण चढण्याचा त्रासहि सहन करावा लागतो. त्याशिवाय क्रान्तीची उत्क्रान्ति होणें शक्य नाही.

तेव्हा अशा तऱ्हेने निश्चित दिशेने जर क्रान्ति करावयास पाहिजे असेल, तर अमर्याद स्वातंत्र्य मिळणें शक्य नाही व उपसर्गांचा त्रासहि चुकावितां येणार नाही. म्हणूनच योग्य दिशेने क्रान्ति करूं इच्छिणारांनी बोलण्यांत, लिहिण्यांत व वागण्यांत योग्य मर्यादांचें पारतंत्र्य स्वीकारणें अगत्याचें आहे.

यावरून लक्ष्यांत येईल की, जर हा क्रान्तीचा काळ असेल व जर त्या क्रान्तीला कांहीं निश्चित दिशा असेल, तर त्यामुळे उपजत अमर्याद स्वातंत्र्याला थोडी तरी मर्यादा पडणार, हें अगदी निश्चित आहे. अमर्याद स्वातंत्र्याचा उपभोग घेणाऱ्या हजारों माणसांचीसुद्धा सभा होऊं शकत नाही; पण सभ्यतेची मर्यादा पाळणाऱ्या दहा माणसांचीहि महत्त्वाचा निर्णय देणारी सन्मान्य परिषद् होऊं शकते; म्हणूनच नियमांचीं बंधनें आमच्या संस्कृतीने सर्वांवर घातलेलीं आहेत. पण बंधनांतून सुटण्याच्या मार्गांत कोणालाहि अडथळा येऊं नये, अशी सावधानतासुद्धा त्यांत ठेवलेली आहे. या नियम व अपवादांचें जर योग्य प्रमाण न राहिलें तर जो त्रास होतो, त्याचा दोष समाजांतील पुढाऱ्यांवर आहे. तो दोष संस्कृतीचा नाही, हें कोणालाहि सांगण्याचें कारण नाही.

## तीन कार्यक्षेत्रें.

'**धीः, श्रीः, स्त्रीः**' ही तीन मानवांचीं कार्यक्षेत्रें आहेत, असें प्राचीन कालापासून ज्ञानी समजत आले आहेत. यांतील '**स्त्री**' या शब्दाचा अर्थ '**स्त्रीपुरुषसंबंधव्यवस्था**' इतका समजला म्हणजे या क्षेत्राची व्याप्ति तेव्हाच लक्ष्यांत येईल. बाकीचीं दोन क्षेत्रें अगदी स्पष्ट आहेत. मानवांनी केलेल्या सर्व क्रान्त्या या तीन क्षेत्रांत समाविष्ट होत असतात; म्हणून आपणहि हे तीन शब्द सांस्कृतिक क्रान्तीचा विचार करावयाचा असतांना वापरूं.

क्रान्ति करावयाची असेल व जर ती विजयी व्हावी अशी इच्छा असेल, तर ती '**धीः श्रीः स्त्रीः**' याच क्रमाने झाली पाहिजे. हा क्रम बदलला तर कोणतीहि क्रान्ति विजयी होणार नाही, असा आमच्या आर्य-संस्कृतीचा सिद्धान्त आहे.

## बौद्धिक क्रान्ति.

सर्वांत प्रथम '**धीः**' म्हणजे बौद्धिक क्षेत्रांत क्रान्ति झाली पाहिजे.

सर्व क्रान्त्यांचा हा पाया आहे. जे खरोखर मनापासून क्रान्ति करणारे असतील, ते आधी खेडोपाडीं जाऊन तेथील जनतेमध्ये एकजीव होऊन निरक्षरांना साक्षर करून, व असंस्कृतांना संस्कारसंपन्न करून त्यांच्या बौद्धिक क्षेत्रांत परिवर्तन घडवून आणतील.

पण आमच्या देशांत कोठेहि शिक्षित तरुण स्वतःस खेड्यांतील जनतेशीं समरस करून घेण्यास तयार झालेले दिसत नाहीत. नोकऱ्या न मिळाल्यामुळे बेकार-शिक्षित लाखो आहेत; पण खेड्यांतील जीवनांत क्रान्ति घडवून आणणारे कोणी दिसत नाहीत.

चीनसारख्या मागसलेल्या देशांतसुद्धा साठ साठ हजार विद्यार्थी मोठ्या सुट्या मिळतांच एका गटाने व एका विचाराने हजारो खेड्यांत जाऊन निरक्षरांस साक्षर करण्यांत आपल्या सुटीचा सद्व्यय करीत असलेले दिसतात. यांना धीक्षेत्रांतील क्रान्ति करणारे, असें अभिमानाने म्हणतां येईल. पण आमच्याकडे काय चाललें आहे बरें ?

एक साक्षर आपल्या संस्कृतीचा योग्य अभ्यास न करतांच कांही विडंबनात्मक लेख लिहितो व छापतो आणि दुसरा साक्षर तोच लेख वाचतो व हे दोघेहि समजतात की, आम्ही मोठी क्रान्ति चालविली आहे ! यांचे हे विचार क्रान्तिकारक आहेत, असें जरी क्षणभर मानलें, तरीसुद्धा ते विचार तळापर्यंत पोचत नाहीत, ही गोष्ट डोळ्याआड करून चालणार नाही. म्हणूनच सध्याच्या क्रान्तीला उपसर्ग वगळून चालविलेली क्रान्ति, असें म्हणत आहों. असली क्रान्ति निरुपयोगी व हानिकारक असते.

वेदांमध्ये अत्रीसारख्या ऋषींनी आपल्या संस्कृतीच्या रक्षणार्थ व प्रचारार्थ, तुरुंगवासाचे कष्ट सोसूनहि क्रान्त्या केल्याचा उल्लेख सापडतो. रामचंद्राच्या वेळीं वसिष्ट-विश्वामित्र-भारद्वाज आदि ऋषि अशाच घडामोडींत

होते, असें दिसतें. यांनी आपल्या हजारो शिष्यांच्या द्वारें आधी जनतेला संस्कारसंपन्न केलें होतें व मग क्रान्ति घडून आली. महाराष्ट्रांतील सन्तांनी व रामदासस्वामींच्या १५०० शिष्यांनी आपणांस खेड्यापाड्यांत कसें समरस केलें होतें, याचा इतिहासहि संस्कृतिसंरक्षणाचा विचार करीत असतां अवश्य पाहिला पाहिजे. विचारक्रान्ति झाल्याशिवाय पुढची क्रांति होणार नाही, हें यावरून ठरतें.

सध्याच्या शिक्षणाने अल्पसंख्याक शिक्षित व बहुसंख्याक खेडवळ यांमध्ये मोठी असहकारितेची भिंत उभारली जात आहे व शिक्षितांमध्ये आर्यसंस्कृतीचा पारखेपणा गणितश्रेढीने वाढत चालला आहे. हा अडथळा दूर केल्याशिवाय क्रान्तीची भाषा नाटकाशिवाय दुसऱ्या ठिकाणीं बोलणें धाडसाचें होईल.

## आर्थिक क्रान्ति.

यानंतर दुसरी क्रान्ति '**श्री**' या क्षेत्रांतील. हिलाच 'आर्थिक **क्रान्ति**' असें म्हणतात. कांही शिक्षित जे या बाजूने खटपट करीत आहेत, ते प्रशंसेस पात्र आहेत. पण विचारक्रान्तीच्या अभावीं व सुशिक्षित–अशिक्षितांतील वाढत जाणारें अन्तर कमी झालें नाही, तोंपर्यंत या क्षेत्रांत काय होणें शक्य आहे, याचा विचार सूज्ञांनीच करावा.

## स्त्रैण क्रान्ति.

वरील दोनही क्षेत्रांमध्ये फारसें कार्य न करतां एकदम तिसऱ्या '**स्त्री**' विषयक क्षेत्रांत मात्र नवसाहित्यिकांनी क्रान्तीचा धूमधडाका चालविलेला आहे! हा '**आधी कळस मग पाया रे**' अशासारखा प्रयत्न होत आहे. '**धीः**' व '**श्रीः**' या क्षेत्रांतील कार्य पक्कें व स्थायी झाल्याशिवाय जर तिसऱ्या '**स्त्री**' या क्षेत्रांतील कार्य चालवलें, तर तें तीनही क्षेत्रांची नासाडी केल्याशिवाय राहणार नाही. म्हणून या तिहींचा क्रम आमच्या संस्कृतीमध्ये

धीः, श्रीः व स्त्रीः असाच मानला आहे. त्याकडे दुर्लक्ष्य करून आजचे जे साहित्यिक या तिसऱ्या क्षेत्रांतच क्रान्ति करीत आहेत, त्यांची घोषणा अशी आहे—

१ स्त्रियांना मुलें होण्यांत नीति-अनीतीचा संबंध नाही, असें समाजाने मानल्याशिवाय स्त्रियांचा खरा उद्धार होणार नाही.

२ स्त्रीपुरुषसंबंधास विवाहाचें बंधन नसावें. विवाहविरहित संबंध झाला तरी व्यभिचार होत नाही.

३ प्रेम जडतांच संबंध घडावा व मनांत येतांच तो संबंध तुटावा; असें झालें म्हणजे मानवांचा उत्कर्ष होईल.

अशा प्रकारच्या अनेक घोषणा श्रेष्ठ पदवीधरांनी व महाविद्यालयांमध्ये आचार्यांचें काम करीत असलेल्या साहित्यिकांनी स्त्रियांच्या उद्धारासाठी चालविलेल्या मासिकांतून व लिहिलेल्या उपन्यासांतून उघड उघड केलेल्या आहेत. या घोषणा म्हणजे आपल्या संस्कृतीवर फार मोठे हल्लेच आहेत, यांत शंका नाही.

## तडजोड कशी व्हावी ?

थोर थोर विद्वान् व दूरदर्शी लोक या हल्ल्यासंबंधाने बोलतांना असें सांगतात की, यांच्या घोषणांशीं तडजोड करून मिळतें घ्यावें, मतभेद वाढवूं नयेत व त्यांच्या शक्तींचा योग्य दिशेने उपयोग करून घ्यावा. हा सल्ला फारच पोक्तपणाचा आहे; पण संस्कृतिसंरक्षणवादी विवाहापूर्वी संयम करावा म्हणणार व क्रान्तिवादी विवाहापूर्वी यथेच्छ सुख लुटावें, असें प्रतिपादन करणार. या दोन टोकांची तडजोड कशी करावयाची, तें समजणें शक्य नाही. ज्या साहित्यिकांना ही तडजोड कशी करावयाची हें कळत असेल, त्यांनी तें आम्हांस अवश्य समजाऊन द्यावें.

एका विद्वानाशीं बोलणें चाललें असतां त्याने असें सुचविलें की, रात्र

व दिवस किंवा उत्तरायण व दक्षिणायन असे कालविभाग स्वभावतः असतात. त्यांपैकी एका विभागांत एका पक्षाने आपल्या मताप्रमाणे आचरण करावें व दुसऱ्याने दुसऱ्या विभागांत आपल्या मताप्रमाणे वागावें. पण हा नुसता विनोद झाला. आम्हांला तर असें वाटतें की, या बाबतींत क्रान्ति करणारांशीं सांस्कृतिक जबाबदारी संभाळणारांस तडजोड करतां यावयाची नाही व केली तर ती एका पक्षाच्या बिनशर्त शरणचिठीनेच होणें शक्य आहे. तात्पर्य, संयम व स्वैराचार यांत तडजोड अशक्य आहे.

## जुनींपुराणीं मतें.

जीं नवीं मतें म्हणून पुढे मांडण्यांत येत आहेत, तीं अगदो जुन्या-पुराण्या-काळचीं टाकाऊ म्हणून ठरलेलीं मतें आहेत, असें आमच्या संस्कृती-चा विचार केला असतां म्हणावें लागतें. अतिप्राचीन काळीं कांही विलक्षण चाली होत्या, असें दिसतें.

१. गणविवाह— म्हणजे पुरुषांच्या गणांचा स्त्रियांच्या गणांशीं गटाने विवाह. या गटांतील स्त्रीपुरुषांचा कसाही संबंध घडला तरी तो या गणविवाहपद्धतींत दोष मानला जात नसे. या गणस्त्रियांना 'गणिका' म्हणत. आजची गणिका या प्राचीन गणविवाहपद्धतीची साक्ष देत आहे.

२. वारविवाह— अमुक वार म्हणजे अमुक दिवसांपुरताच विवाह करण्याची मुदतबंदीची पद्धति ही होती. 'वारस्त्री' ही या मुदतबंदीच्या विवाहाचें स्मारक आहे.

'गणिका' व 'वारस्त्री' या वेश्या नव्हेत. त्यांचे नियम इतर पति-व्रतांप्रमाणेच कडक असत. यांपैकी कांही त्या कालच्या पतीचें निधन होतांच सतीहि जात असत.

३. बंधुभगिनींचा विवाह वेदपूर्वकालीं असावा, असा संशोधकांचा

तर्क आहे. याचा अवशेष सध्या नाही.

४. मनाला वाटेल तेव्हा नवऱ्यास सोडून दुसऱ्याबरोबर जाण्याची चाल उद्दालकापर्यंत होती, असें महाभारतांत स्पष्ट लिहिलेलें आहे.

५. पण लावून स्वयंवर करीत व पण जिंकणारा कसाही असला तरी त्याच्याशीं आजन्म पातिव्रत्यानें रहात. यांमध्ये घटस्फोट नव्हता.

६. पहिल्या भेटींत स्वयंवरही होत असे; असा विवाह दुष्यंत-शकुंतले-चा झाला होता, पण पुढें त्यांचा विवाहसंस्कार केला जाई.

७. विवाहापूर्वी कुमारीपुत्र होत असत व अशा कुमारीपुत्रांना नरमेधा-मध्ये एक विशेष स्थान देण्यांत आलेलें होतें.

अशा अनेक प्रकारच्या विचित्र चाली फारच प्राचीन काळीं होत्या, हें खरें; पण येथे हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे की, या चाली सर्व आर्यांच्या समाजांत सरसास कधीहि पसंत नव्हत्या. एखादी चाल कोठल्यातरी एका पोट-विभागांत, त्यांची ' कुलपद्धति ' म्हणून प्रचलित होती. जसें स्वयंवर हा केवळ क्षत्रियां-तील विशिष्ट कुलांतच रूढ होता. कित्येक क्षत्रियकुलांत मुली पळवून नेण्याचीहि चाल होती.

तात्पर्य, एखादी विलक्षण चाल दिसली तर ती कोणत्या स्तरामध्ये होती हें पाहून, तिचा विचार केला पाहिजे. **एखादी विलक्षण चाल असली तरी तिची जबाबदारी तिचा विशिष्ट जातीशीं संबंध असल्यामुळे आर्यांच्या सर्व समाजावर येत नाही,** हें येथे विसरून चालावयाचें नाही. तथापि या चाली कोणत्यातरी स्तरांत होत्या व त्या समाजाच्या स्थैर्यास निरुपयोगी ठरल्या, म्हणूनच त्या हिंदू-समाजानें सोडून दिल्या व त्या वगळून आपली संस्कृति बनवली. हें हिंदूंच्या जिवंतपणाचें लक्षण आहे. हिंदू कधीहि जुन्याच पद्धतींस चिकटून राहिलेले नाहीत. जेवढें उपयोगी असेल तेवढें आत्मसात्

करावें व हानिकारक असेल तें सोडून द्यावें, असें करीतच हिंदूंची संस्कृति बनत आलेली आहे.

या निरुपयोगी जुन्यापुराण्या चाली थडग्यांतून पुनः उकरून काढून, त्या नव्या म्हणून अज्ञ जनतेला भासवून, या पुनः रूढ करण्याची खटपट करणें, हें पुच्छ-प्रगतीचें लक्षण आहे, एवढेंच येथे सांगणें आहे.

या निरुपयोगी चाली आमच्या संस्कृतीस अपरिचित नाहीत, यामुळे आम्हांला यांचें भय वाटत नाही. फक्त आम्हांला यासाठीच वाईट वाटतें की, या गोंधळांत राष्ट्राच्या उपयोगी शक्तीचा निष्कारण अपव्यय होत आहे. जवळ असलेल्या शक्तीचा सद्व्यय व्हावा, एवढीच आमची इच्छा आहे.

चालू असलेल्या तीनही क्षेत्रांतील या क्रांतीचें इतकें पर्यालोचन केलें असतां असें स्पष्ट होतें की, सांस्कृतिक दृष्ट्या निश्चयाने उन्नति होईल, अशा उच्च दिशेने या क्रान्तीचें पाऊल सध्या पडत नाही. साहित्यिकांनी याकडे लक्ष्य द्यावें.

याप्रमाणे आमच्या संस्कृतीला नव्या समजल्या जाणाऱ्या पण जुन्या टाकाऊ निरुपयोगी मतांशीं विनाकारण टक्कर कशी मारावी लागत आहे, तें आपण पाहिलें.

येथे आमच्या संस्कृतीचें स्वरूप सांगितलें तर तें अस्थानीं होणार नाही. हें स्वरूप समजलें म्हणजे सांस्कृतिक सारस्वतांत कशाचा अन्तर्भाव झाला पाहिजे, याचा उलगडा सहजच होईल—

१. सर्व विश्व एका सत्तत्त्वाचा पसारा आहे व मीहि त्याचाच अंश आहें, असा अनन्यसम्बन्ध पाहून आत्मीयतेच्या भावनेने आपलें कर्तव्य करणें;

२. प्रशस्ततम कर्में करण्यासाठी आपलें जीवित अर्पून अप्रशस्त कर्मांपासून दूर राहणें;

३. यज्ञीय जीवनाने सर्व जगत् उन्नत होऊं शकतें, हें पाहून आपलें जीवन त्यासाठी पवित्र बनवणें;

४. काम-क्रोध-लोभादिक मर्यादेच्या बाहेर प्रबळ झाले तर ते हानि करतात, हें जाणून त्यांना अमर्याद होऊं न देणें;

५. धर्माने जनतेची सुस्थिति होते, हें जाणून त्या मर्यादेने आपली दिनचर्या मर्यादेंत ठेवणें;

६. वृत्ति दैवी व आसुरी असतात, हें जाणून दैवी वृत्ति आपल्यांमध्ये वाढवणें;

७. दुःखांतून व बंधनांतून पूर्णपणाने सुटका करून घेणें, हें आपलें मोक्षरूप ध्येय आहे व ज्ञानानेच तें साध्य होतें, असें जाणून तें ज्ञान मिळविण्यासाठी व वाढविण्यासाठी यत्न करणें;

८. केलें तरच होतें असें जाणून चतुर्विध पुरुषार्थांचें साधन करण्यांत कसूर न करणें;

९. आपण जें करतों त्याचे संस्कार बीजरूपाने आपल्यांमध्ये राहतात, हें जाणून अशुभ संस्कार न राहतील असें करणें.

संस्कृतीची परिपूर्ण व्याख्या करणें हें जरी दुरापास्त असलें तरी त्यांत संस्कारांचें महत्त्व आहे, हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. संस्कारांचे परिणाम पाहून आचरण करण्याचा भाग येथे महत्त्वाचा आहे. म्हणून शुभ संस्कार कायम राखण्याकडे ज्या वाङ्मयाने प्रबल प्रवृत्ति होईल, तें संस्कृतिपोषक वाङ्मय आहे असें समजलें जाईल.

आता सांस्कृतिक सारस्वत म्हणजे काय व त्याची स्थिति सध्या कशी आहे, तें संक्षेपाने पाहिलें पाहिजे.

## सांस्कृतिक वाङ्मय.

साधारणतः 'वाङ्मय, साहित्य, सारस्वत' यांचा अर्थ एकच आहे,

असें समजलें जातें; पण हे पर्यायशब्द नव्हेत. संस्कृत शब्दांचे योग्य कोश अजून झालेले नसल्यामुळे साधारण संस्कृतज्ञास यांतील फरक समजत नाही. आपला आजचा विषय नीटपणाने समजावा, म्हणून आधी या शब्दांचा अर्थ आपण पाहूंया—

' लेखन ( किंवा वक्तृत्व ), वाङ्मय, साहित्य, सारस्वत व सांस्कृतिक सारस्वत ' असे ठोकळ मानाने एकंदर वाङ्मयाचे पांच तरी वर्ग करतां येतात. यांचीं क्षेत्रें भिन्न आहेत, हें प्रथमतः लक्ष्य लाऊन पाहिलें पाहिजे.

## आनंदाचा भागीदार.

प्रथमतः साधारण मनुष्य बाह्य सृष्टींतील दृश्य पाहतो व आनन्दाचा अनुभव घेतो. तसेंच योगी अन्तर्मुख वृत्तीने आपल्या बाहेरील प्रवृत्ति बंद करून अन्तःशक्तींचा अनुभव घेतो. दोनही ठिकाणीं त्यांस अद्‌भुत आनंद अनुभवावयास मिळतो; कारण अन्तर्बाह्य एकच आनंदमय सत्ता आहे. हा आनंद होतांच त्या आनन्दी स्थितींत त्यांस असें वाटतें की, मला कोणीतरी या आनन्दांत भागीदार पाहिजे. जसा मला आनन्द झाला आहे, तसाच हा आनंद सर्व जगाने लुटला पाहिजे. जगाला दुःखी स्थितींत मी पाहूं शकत नाहीं. अशा रीतीने आनन्दाचा फैलाव करण्यासाठी त्याची अनिवार प्रवृत्ति होते. त्यामुळे हा अनुभवलेला आनन्द जगभर फैलावण्यासाठी तो बोलूं लागतो किंवा जसें होईल तसें लिहून ठेवतो.

## वाङ्मय.

हेंच बोलणें किंवा लिहिणें संग्रहित झालें म्हणजे तेंच ' वाङ्मय ' होतें. 'वाङ्मय' म्हणजे ' वाणीमय ' किंवा ' वाणीरूप ' जें काय असतें तें. हें जसें बरें असेल व हितकारक असेल, तसेंच तें वाईटही असेल अथवा अहित-कारकहि असेल.

## साहित्य.

अशा बऱ्यावाईट वाङ्मयांत कांही भाग हितकारक व कांही भाग अहितकारक असतो, असा अनुभव येतो. थोर लोक सर्व वाङ्मय तपासून असे विभाग करतात व जें हित करणारें आहे असें थोरांच्या मताने ठरतें, त्याला ते ' स-हित ' ( हितेन युक्तं सहितं ) असें म्हणतात. हेंच ( सहितस्य भावः साहित्यं ) साहित्य असें म्हटलें जातें. यावरून सर्वच वाङ्मय ' साहित्य ' या पदवीस योग्य आहे असें म्हणतां येत नाही, ही गोष्ट उघड झाली. जें निश्चयाने जनतेचें हित करतें, त्यालाच ' साहित्य ' असें म्हणतात.

## साहित्य-निर्णय.

अमूक ग्रंथ किंवा लेख ' साहित्य ' या पदवीस योग्य आहे कीं नाही, हें ठरविण्याचें काम साहित्यपरिषद् व साहित्य-संमेलन यांसारख्या सर्वमान्य साहित्यिक संस्थांचें आहे. हें काम असहाय्य जनता करूं शकणार नाही. जनता ही तात्कालिक गंमत पाहणार; म्हणूनच जनतेला अधिकारयुक्त वाणीने योग्य मार्गाने चालविण्यासाठीच साहित्यिक संस्था अस्तित्वांत येतात. यावरून साहित्यसंस्थेचें कार्य व तिच्यावर असलेली जबाबदारी हीं लक्ष्यांत येतील. असो. अशा रीतीने वाङ्मयांतून साहित्य निवडलें जातें व जें हिणकस म्हणून शिल्लक राहतें, तें काळाच्या प्रचण्ड उदरांत गडप होऊन जातें व त्याचें नांवसुद्धा शिल्लक रहात नाही.

## सारस्वताचा प्रवाह.

जनतेचें खरें हित करणारें तेंच साहित्य हें खरें; पण जेव्हा आपण अनुभवलेला आनंद देऊन जगास आनंदित करण्याची बुद्धि मनुष्यांमध्ये अधिक प्रमाणांत उद्भवते, तेव्हा वाङ्मय अधिक निर्माण होऊन त्यांतून साहित्यहि अधिक प्रमाणांत निवडलें जातें. साहित्याची वाढ मर्यादेच्या बाहेर

होऊं लागली म्हणजे त्याचें आकलन होणें दुरापास्त होतें. अशा वेळीं त्या साहित्यांतील अगदी सारभूत किंवा सारवान् भाग कोणता आहे, तोच तेवढा एका बाजूस काढावा व तोच तेवढा सुरक्षित ठेवावा; कांही झालें तरी तो सारवान् सरस भाग नाहीसा होऊं देऊं नये; अनंत आपत्ति कोसळल्या तरी त्यांचें संरक्षण व्हावें, अशासाठी सामूहिक प्रयत्न केले जातात. अशा बुद्धीने प्रेरित होऊन सारवान् साहित्याचा सरस भाग संक्षेपाने एका बाजूस निवडून काढण्यासाठी थोर थोर पुरुष जमतात व ते हें कार्य करतात. अशा या सारवान् सरस अशा साहित्याच्या भागाचा जो संग्रह होतो, त्याचेंच नांव ' सारस्वत ' होय. सारवान् सरस साहित्याचा भागच जिवापाड यत्न करून जपून ठेवावा लागतो; कारण तो हरवला तर अनंत काळांत अनेकांनी केलेले प्रयत्न फुकट जातात.

केवळ लेख, केवळ वाङ्मय, केवळ साहित्य यांपेक्षा ' सारस्वता ' चा दर्जा केवढा मोठा आहे, हें येथे पहावें, म्हणजे ' वाङ्मय, साहित्य व सारस्वत ' हे तीन निरनिराळया पायऱ्यांवरचे वाङ्मयाचे भाग आहेत व या शब्दांनी एकाच जातीच्या वाङ्मयाचा बोध होत नाही, ही गोष्ट सहज समजेल.

यद्यपि लेख, वाङ्मय, साहित्य व सारस्वत या सर्वांचा समावेश एकाच वाङ्मयांत पुष्कळच कालापासून होत आला आहे व पुष्कळच कालापासून यांतील भेदाकडे कोणाचेंहि फारसें लक्ष्य गेलेलें नाही, तथापि हा भेद कानाडोळा करतां येण्यासारखा नाही, ही गोष्ट येथे कोणीहि विसरतां नये.

## सांस्कृतिक सारस्वत.

लेखांचें वाङ्मय बनतेवेळीं बरेच लेख गळले जातात. वाङ्मयांतून साहित्य निवडतेवेळीं अर्धाअधिक गाबाळ दूर होतो व साहित्यांतून सारयुक्त सारस्वत ठरवतेवेळीं पुष्कळच अडगळ निघून जाते. अशा रीतीने सारस्वता-

मध्ये मानवी बुद्धीने फैलावलेल्या शब्दप्रपंचामधून अगदी गाळीव भाग संग्रहीत होतो. त्यांत पुनः आपल्या संस्कृतीला धरून किती आहे व संस्कृतीला सोडून किती आहे, याचा निर्णय होऊन, '**सांस्कृतिक सारस्वत**' बनतें. एवढ्यासाठीच सांस्कृतिक साहित्य हें जिवापलीकडे जपावें लागतें.

कोणीतरी एखाद्या लेखकाने सकाळीं उठावें व म्हणावें की, आम्ही नवी संस्कृति बनवतों किंवा नवें सांस्कृतिक साहित्य बनवतों. तर त्याने समजावें की, कोणासहि तसें तें बनवतां येणार नाही. इतक्या चाळणींतून जेव्हा तें चाळलें जाईल व अनंत कालांतील विविध प्रकारचे आघात सहन करून जेव्हा तें सारवान् आहे असें ठरेल, तेव्हाच तें लोकांमध्ये असाधारण जिव्हाळा उत्पन्न करील व तेव्हाच तें **सांस्कृतिक सारस्वत** या पदवीस चढेल.

एखाद्या देशांत नव्या योजना जन्मास आल्या, त्यांनी जगाचे डोळे आपल्याकडे आकर्षून घेतले व लोकांचें कल्याणहि केलें, तरी तेवढ्यामुळे ती नवी संस्कृति झाली, असें होत नाही. त्याला प्रामाणिक प्रयोग म्हणावें; उत्तम प्रयोग आहे म्हणून त्याकडे पहावें; पण ती नवी संस्कृति झाली, असें म्हणतां येणार नाही. '**संस्कृति**' होण्यास बराच काल गेला पाहिजे, बरेच संस्कार त्यांत संग्रहित झाले पाहिजेत. एखादी योजना उत्तम असली तरी ती समाजांत पचावी व मुरून एकजीव व्हावी लागते; तीमध्ये आता बदल करण्याची आवश्यकता नाही, असें सर्वसंमतीने ठरावें लागतें. अनेक संस्कारांनी समाजाचें जीवनच तन्मय व्हावें लागतें, तरच ती संस्कृति बनते. जी २५ वर्षांत चार वेळा बदलावी लागेल, ती योजना सद्धेतुपूर्वक केलेली आहे व अत्यंत प्रशंसनीय आहे असें जरी मानलें, तरी ती आजच्या आज '**संस्कृति**' होऊं शकत नाही व तसलें साहित्य सांस्कृतिक सारस्वतहि आजच्या आज होऊं शकत नाही.

सांस्कृतिक ग्रंथांबद्दल जो सर्वांस अत्यंत आदर असतो, त्याचें कारण

हें असें आहे. अनंत कालामध्ये त्याने जनतेला आधार दिलेला असतो, अनेक संकटांतून त्याने पैलतीर दाखवलेला असतो; जसें सुखामध्ये तसेंच दुःखामध्येहि तो सहाय्यक झालेला असतो. इतकेंच नव्हे तर कित्येक वीरांनी आपलें जीवन देऊन म्हणजे आपल्या जिवाचें मोल देऊन त्या सांस्कृतिक सारस्वताचें संरक्षण केलेलें असतें. यामुळे तें सारस्वत हें त्या जातीचें प्रत्यक्ष जीवनच झालेलें असतें. म्हणून तें साहित्य जर नाश पावलें, तर त्या जातीचें जीवनच नाश पावलें, असें होतें.

सांस्कृतिक सारस्वत हा अनादि कालचा ठेवा आहे व त्याच भांडवला-वर पुढील सर्व व्यापार व्हावयाचा आहे. हा ठेवा गमावला तर मागचा आधार जाऊन एकदम दिवाळें निघाल्यासारखें होईल व पुनः व्यापार सावरणें शक्य असलें तरी मधला काळ किती सांस्कृतिक अराजकतेचा जाईल, हें सांगवत नाही.

आपलें सांस्कृतिक वाङ्मय निदान दहापांच हजार वर्षांपासून आमच्याजवळ आहे. तेव्हापासून त्याचा ठसा आपल्या समाजावर पडलेला आहे. या प्राचीन कालापासून तों मराठी संतकवींच्या पवित्र सारस्वताच्या कालापर्यंत तपशीलांत फरक होत आला असला तरी त्याच्या मूळ सिद्धान्तांत मुळीच फरक झालेला नाही. इतका अनंत काळ या संस्कृतीने टिकाव धरला आहे, एवढी एकच गोष्टसुद्धा तिच्यांत उत्तमपणा आहे, असें ठर-ण्यास पुरेशी आहे. मग इतर प्रमाणें आपल्याला हवीं तेवढीं सहाय्यक आहेत, तीं निराळींच.

## सांस्कृतिक अराजकता.

म्हणून सांस्कृतिक सारस्वताबद्दल उदासीनता दाखवून किंवा त्याची चेष्टा करून कोणाही सारस्वतभक्ताने सांस्कृतिक अराजकता वाढवण्यांत आपल्या दैवी शक्तीचा अपव्यय करूं नये.

## मराठीमधील सांस्कृतिक सारस्वत.

मराठी भाषेमध्ये असें सांस्कृतिक साहित्य संत-कवींनी निर्माण केलें आहे. कांहींनी जुन्या सरस्वती देवीलाच नवा शालू नेसवून व नवे अलंकार घालून मराठींत अवतरविलें आहे; पण संत तुकारामासारख्यांनी प्राचीन संस्कृतीच स्वतः पचवून आपल्या अभंग-वाणीने जनतेस ती नव्या भाषेने दिली आहे. ह्या मराठी सारस्वताचा अमोघ प्रवाह मराठी भाषा असेपर्यंत टिकणारा आहे व तो आंग्ल भाषेंत रूपान्तर पावून पश्चिमेकडील लोकांनाही आपल्या संस्कृतीची शिकवण देऊं लागला आहे, हें खरोखरच आपला उत्साह वाढवण्यास कारणीभूत होणारें आहे, यांत शंका नाही.

अशा या आपल्या गंभीर आर्य-सांस्कृतिक सारस्वताचा प्रवाह संत-कवींनंतर पुढे फारसा कोणी चालू ठेवलेला दिसत नाही व सध्या तर सुशिक्षितांचें तिकडे अगदी दुर्लक्ष्यच झाल्यासारखें दिसत आहे. नवीन सारस्वत-निर्मिति झाली नाही, तरी मराठीमध्ये जें आज सारस्वत आहे, तेंसुद्धा सांस्कृतिक जीवनाच्या दृष्टीने पुरून उरण्यासारखें आहे. तथापि नव्या उपपत्ति व नव्या समजाविण्याच्या पद्धति यांची भर होत गेलीच पाहिजे, हें कांही खोटें नाही.

इतक्या दिवसांनंतर नव्या उपपत्ति जोडून कै० लोकमान्य टिळकांनी मराठीमध्ये ' कर्मयोगशास्त्र ' लिहिलें. असे उपपत्तींनी युक्त पुष्कळ ग्रंथ निर्माण झाले पाहिजेत. पण त्याला जाडी विद्वत्ता, शोधकता, धारणा व तुलना करून विचार करण्याची सवय पाहिजे. सध्याचें वाङ्मय 'तुरत दान-महापुण्य' अशासारखें आहे. त्यांतून कांही गंभीर स्वरूपाचे चिरकाल जीवन देणारे विचार-प्रवाह लवकर निघतील, असें आज तरी दिसत नाही.

सध्याचें वाङ्मय टाकाऊ आहे, असें मी म्हणत नाही. त्यांत कला, सरसता, सूचकता, हृदयस्पर्शी भाव वगैरे पुष्कळच उच्च गुण आहेत; पण

त्यांत एकांगीपणा फारच आहे व सांस्कृतिक जिव्हाळा तर त्यांत अत्यंत कमी आहे; किंबहुना कित्येक लेखक आपल्या संस्कृतीची जाणून-बुजून कुचेष्टाहि करीत असलेले दिसतात!

स्वतंत्र विचारसरणी, सडेतोड टीका, चिकित्सक संशोधन, या महत्त्वाच्या गोष्टी असून त्या जर नसतील तर साहित्य मृत झालें, असें म्हणावें लागेल; म्हणून मी तर यांचा निषेध करूं इच्छीत नाही; पण हें करीत असतांना आपलेपणाचा अभाव प्रभावित होतां नये. जर सध्याच्या लेखकांना आपल्या संस्कृतीबद्दल आपलेपणा वाटूं लागेल, तर त्यांच्याच लेखणींतून चिरस्थायी सांस्कृतिक सारस्वताचा दिव्य प्रवाह वाहूं लागेल, यांत शंका घेण्याचें कारण नाही. म्हणून महाराष्ट्र-सांस्कृतिक सारस्वताचा भविष्यकाळ मुळीच निराशेचा नाही, असें म्हणण्यास मला प्रत्यवाय दिसत नाही. सांस्कृतिक अराजकतेचें युग फार वेळ टिकणारें नाही. परिवर्तन घडत आहे व तें संस्कृतिसंरक्षणाकडेच साहित्यिकांस वळवणार आहे. सांस्कृतिक अराजकता फार दिवस टिकणें शक्य नाही.

संस्कृति ही साहित्याशिवाय इतर बाबींमध्येहि असतेच. परंतु येथे केवळ साहित्याचाच विचार करावयाचा असल्यामुळे तेवढ्यापुरतेंच विवरण येथे केलें आहे. यावरून कोणी आपला असा गैरसमज करून घेऊं नये की, संस्कृति ही फक्त कांही साहित्य-ग्रंथांतच कोंडलेली आहे.

संस्कृति हा अनेक शुभ संस्कारांचा अदृश्य पण स्थायी स्वरूपाचा ठसा आहे. मनाच्या खोलांतल्या खोल स्तरांमध्ये तो साठवलेला असतो. वर्तमानकालांतील हालचालींनी त्यावर मलाचीं आवरणें बसवण्याची किंवा त्याचें तेज वाढवण्याची शक्यता असते, यांत शंका नाही; म्हणूनच साहित्यिकांनी आपल्या साहित्यनिर्मितीने तो सांस्कृतिक आदर्श जनतेच्या डोळ्यांसमोर अधिक तेजस्वी होऊन विराजत राहील, असें केलें पाहिजे. हें साहित्यिकांचें

अत्यंत आवश्यक कर्तव्य आहे.

सांस्कृतिक आदर्श हा आदर्शच नव्हे, असें भासविण्याचा उपद्व्याप सध्या सुशिक्षित समजल्या जाणाऱ्या कित्येक विद्वानांकडून होत आहे. ते तसें जाणूनबुजून करीत असतील, असें वाटत नाही; तथापि सांस्कृतिक ध्येय ज्या समाजाच्या डोळ्यांसमोरून दूर होईल,त्या समाजाचा टिकाव धकाधकीच्या मामल्यांत लागणार नाही, हें सर्व शिक्षितांनी लक्ष्यांत ठेवावें.

ज्यांच्या हातांत राष्ट्राची नियंत्रण-सत्ता आहे, त्यांनी हव्या तशा उलट-सुलट उड्या मारल्या तरी त्यांस आपला तोल सांभाळतां येणें शक्य आहे; पण ज्यांच्या हालचालींचें नियंत्रण दुसऱ्यांच्या दयेवर अवलंबून आहे व ज्यांचा तोल संभाळला जाऊं नये, म्हणून समर्थ वैऱ्यांचीं कारस्थानें अहर्निश चालू आहेत, त्यांना आपल्या संस्कृतीच्या बळावरच विसंबून आपल्या पायांवर उभे राहतां येणें शक्य आहे; पण जर का हा स्थायी आधारहि त्यांच्या पायां-खालचा निघून गेला, तर त्यांनी कशाच्या बळावर उभे रहावें बरें ?

आजच्या साहित्यिकांनी या महत्त्वाच्या प्रश्नाचा नीट विचार केला पाहिजे व आपली जबाबदारी ओळखून आपलें साहित्यिक कार्य चालवलें पाहिजे.



# प्रचण्ड शक्तीचा आवेश

मनुष्यांमध्ये वाणी ही एक प्रचण्ड शक्ति आहे. हिच्यामुळेच मनुष्यांमध्ये विलक्षण सामर्थ्य वाढलेलें आहे. ऋग्वेदाच्या १० व्या मंडलांतील वाक्सूक्तामध्ये वाणीच्या प्रचंड सामर्थ्याचें फारच बहारीचें वर्णन आहे, तें वाचकांनी येथे प्रथम पहावें—

**अहं राष्ट्री संगमनी वसूनां चिकितुषी प्रथमा यज्ञियानाम् ।**
**तां मा देवा व्यदधुः पुरुत्रा भूरिस्थात्रां भूर्यावेशयन्तीम् ॥३॥**
**मया सो अन्नमत्ति यो विपश्यति यः प्राणिति य ईं शृणोत्युक्तम् ।**
**अमन्तवो मां त उप क्षियन्ति श्रुधि श्रुत श्रद्धिवं ते वदामि ॥४॥**
**यं कामये तं तमुग्रं कृणोमि तं ब्रह्माणं तमृषिं तं सुमेधाम् ॥५॥**
**अहं रुद्राय धनुरा तनोमि ब्रह्मद्विषे शरवे हन्तवा उ ।**
**अहं जनाय समदं कृणोम्यहं द्यावापृथिवी आ विवेश ॥६॥**
**अहं सुवे पितरमस्य मूर्धन्मम योनिरप्स्वन्तः समुद्रे ॥७॥**

( ऋग्वेद १० । १२५ )

या सूक्तामध्ये 'वाणी स्वतःच आपल्या स्वतःच्या सामर्थ्याचें वर्णन करीत आहे' असा वर्णनाचा प्रसंग आहे. "मी स्वतः वाणी आहें. मी तेजस्वी राष्ट्रीय शक्ती आहें. सर्व धनांचें एकत्रीकरण करण्याचें सामर्थ्य मज वाणीमध्ये आहे. सर्व पूज्य देवतांमध्ये माझी– वाणीची –पूजा प्रथम झाली पाहिजे. मी लोकांमध्ये पुष्कळच आवेश उत्पन्न करणारी अशी प्रचंड शक्ति आहे. अनेक स्थितींमध्ये असणाऱ्या मानवांचें संरक्षण मी अनेक प्रकारांनी करतें; म्हणून देवसुद्धा मला विशेष मान देतात. ज्याला हें सर्व मी सांगत आहें तें समजतें, त्यालाच अन्न खावयास मिळतें. जे लोक माझा अपमान करतात, त्यांचा नाश होतो. मीच लोकांना उग्र, शूर, वीर, ऋषि, मुनि, ज्ञानी व बुद्धिवान् बनवितें. मीच शूराला शस्त्रास्त्रें सज्ज करून देतें व त्या शस्त्रानें तो वीर ज्ञानद्वेष्ट्या घातक शत्रूचा वध करतो. मीच लोकहितासाठी युद्ध करतें व सर्व जगांत प्रचंड आवेश उत्पन्न करतें. या राष्ट्रावर रक्षक अशा राजाला निर्माण करणें माझ्याच आधीन आहे."

## राजा व साहित्यिक.

अशा प्रकारचें हें वर्णन प्रत्येक वाङ्मय–सेवकानें लक्ष्यपूर्वक पाहण्या-सारखें आहे. या सूक्तामध्ये वाणीचें प्रचंड सामर्थ्य वर्णन केलें आहे. सर्व जगांतील लहानमोठ्या राष्ट्रांतील अनंत कालच्या इतिहासाकडे लक्ष्य दिलें असतां आपणांस असें आढळून येईल की, त्या राष्ट्रांतील राजकीय, सामाजिक व औद्योगिक अशा सर्व क्रान्त्या या सर्व वाणीच्या सामर्थ्यानेच झालेल्या आहेत. राजा आपणास प्रचंड सामर्थ्यानें युक्त दिसतो खरा; पण तो आपल्या गादीवर तेथपर्यंतच बसूं शकतो की, जेथपर्यंत उत्तम वक्ते व सामर्थ्यवान् लेखक त्याच्या विरुद्ध आपल्या वाणीचा प्रयोग करूं लागले नाहीत. केव्हा केव्हा राजे लोक आपल्या विरुद्ध असलेल्या लेखकांस, वक्त्यांस व उपदेशकांस तुरुंगांत घालतांना दिसतात खरे; पण त्यांत राजांचें सामर्थ्य व्यक्त होत नसून

त्याने राजे हे वाङ्मयोपासकांस भितात, हेंच उघड होत असतें. राजसत्तेच्या पाठीमागे विद्वानांच्या वाणीचें सामर्थ्य असेल तरच ती राजसत्ता टिकते व जेव्हा हें सामर्थ्य सिंहासनांना मिळत नाही, तेव्हा तीं उलथून पडलेलीं दिसतात. याचप्रमाणे धर्मक्रांत्या काय व औद्योगिक क्रान्त्या काय, या सर्व उलथापालथी या प्रचण्ड वाणीच्या योगाने होत असतात. इतिहासाची ही शिकवण पाहिली म्हणजे वाणीच्या प्रचण्ड शक्तीची उत्तम कल्पना येते. एवढें सामर्थ्य ईश्वराने मनुष्यांजवळ ठेवलेलें आहे; पण त्या शक्तीचा सदुपयोग हा मनुष्य करी आहे तकाय ?

## स्फूर्ति देणारें भाषण.

प्रभावशाली वक्त्याचें भाषण ऐकून निरुत्साही लोक प्रचंड उत्साहाचीं कामें करण्यासाठी उठून उभे राहतात; तर कित्येक लोक निधड्या छातीने शत्रूच्या तोफेच्या माऱ्यासमोर उभें राहण्यासहि सिद्ध होतात व आपणांस असमर्थ समजणारे लोक विलक्षण सामर्थ्य दाखवूं शकतात. आजपर्यंत मनुष्यांकडून जीं मोठमोठीं कामें झालीं आहेत, तीं या वाणीच्या प्रेरणेमुळेच झालेलीं आहेत. याच्या उलट नेभळ्या उपदेशाने सत्त्ववान् लोकसुद्धा पारतंत्र्यांत कुजत पडलेले आहेत, असें आपणांस इतिहासांत दिसून येईल. वाणीचा सदुपयोग केला म्हणजे मनुष्यांची उन्नति होऊं शकते व तिच्याच दुरुपयोगाने मानवांची अधोगतीही होते.

वाणीची शक्ति अग्नीप्रमाणे आहे. अग्नि हा मनुष्यांना सहाय्यकहि होऊं शकतो व मारकही होऊं शकतो. कोणतीहि शक्ति स्वतः कांहीच करूं शकत नाही; तिला जसें वापरावें तसें तिच्यापासून हित किंवा अहित होऊं शकतें; म्हणून कोणतीहि शक्ति प्राप्त झाली असतां मनुष्याने आनंद मानूं नये, तर तिचा चांगला उपयोग करण्याची पात्रता आपल्या अंगीं असली तरच तिच्यापासून कांही तरी फायदा होईल, हें नीट लक्ष्यांत ठेवावें. मनुष्याजवळ वाणी

ही मोठी प्रचण्ड शक्ति आहे खरी; पण मनुष्याला तिच्या शक्तीचा व्हावा तसा उपयोग होत नाही; याचें कारण मनुष्य या शक्तीचा उपयोग फारच निष्काळजीपणाने करीत आहे; म्हणून फायद्यापेक्षा केव्हा केव्हा नुकसानच अधिक झाल्याचें दिसत आहे. असें होऊं नये म्हणून ऋषींनी फार चांगली सूचना दिलेली आहे, ती पहा–

## कल्याणकारक भाषण बोला व ऐका.

भद्रं कर्णेभिः श्रृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥
( ऋग्वेद १।८९।८ )

समाजामध्ये अशी परिस्थिति उत्पन्न झाली पाहिजे की, " कानांना चांगलेच शब्द ऐकावयाला मिळावे व डोळयांनी वाचावयाचे शब्दहि चांगलेच दिसत असावे. " वरील मंत्रांत ' भद्र ' असा शब्द आहे. कानांनी भद्र विचार ऐकले व डोळयांनी भद्र विचार वाचले, तरच माणसांची उन्नति होणें शक्य आहे. असें न होतां जर अभद्र शब्द आमच्या कानांवर पडूं लागले व अभद्र विचार वाचण्याचा परिपाठ सुरू झाला, तर समाजहि अभद्र स्थितीला जाऊन पोचल्याशिवाय राहणार नाही.

भद्र विचार म्हणजे उन्नतिकारक, उच्च अवस्थेकडे नेणारे, खरें हित करणारे तेजस्वी विचार होत. ज्यांनी आपली शक्ति वाढेल, बल वृद्धिंगत होईल व आपलें तेज व यश चहूंकडे पसरेल, ते भद्र विचार होत. याच्या उलट जे विचार असतील, ते अभद्र विचार होत. सध्या जें काय आपण वाचतों व ऐकतों, तें ' भद्र ' आहे कीं अभद्र आहे, याचा विचार वाचकांनी केला पाहिजे.

वाचतांक्षणींच मनास बरें वाटणारें वाङ्मय ' भद्र ' असतें, असें कोणीही समजूं नये. जगांत अशा पुष्कळच गोष्टी आहेत की, त्या पाहतांक्षणींच

आपलें मन हरून नेतात व त्या मनाला बऱ्याही वाटतात; पण परिणामीं हानिकारक असल्यामुळे त्या त्याज्य आहेत, असें विचारी लोक मानतात. परदेशी कपडा, चहा, कॉफी किंवा स्वदेशी भजीं, चिवडा व चमचमीत मसालेदार पदार्थ हे सर्व मनास बरे वाटतात, सर्वांस आवडतात, यांचा खपही फार होतो; म्हणून हे हितकारक व चांगले आहेत असें जर कोणी म्हणेल, तर तें मात्र चूक आहे. त्यापेक्षा तत्क्षणीं मनास न आवडणारी खादी, तत्काळ न आवडणारें सात्त्विक खानपान, हेंच मनुष्यास सर्वतोपरि हितकारक आहे.

वाङ्मयाचेंहि असेंच आहे. जें वाङ्मय पुष्कळ खपतें, लोकांस चटक लावतें, वाचकांचें मन आकर्षून घेतें, तेंच हितकारक आहे, असें मानणें हा वाचकांचा भ्रम आहे व असें जे समजतील, त्या वाचकांची फसवणूक होत आहे, असें समजावें. नियमच जर बांधावयाचा असेल, तर असें समजण्यास हरकत नाही की, जें वाङ्मय अधिक खपतें, नेमकें तेंच हानिकारक असतें; कारण सर्वसाधारण जनतेची रुचि बरें-वाईट समजण्याइतकी शुद्ध असत नाही. जेवढें हानिकारक, अपायकारक व घातक असेल, तेवढें लोकांस घ्यावेंसें वाटतें. तंबाखू व दारू पिण्याचा उपदेश कोणी करीत नाही; पण त्यांचा खप फारच वाढत आहे; पण हीं व्यसनें सोडा, असें सांगण्यासाठी मोठमोठ्या संस्था आहेत, तरी त्यांचा फारसा उपयोग होत नाही. याचें कारण जनतेची पडण्याकडे प्रवृत्ति आपोआप असते, तशी ती उठण्याकडे नसते; यासाठी हीन वाङ्मय लिहिणारे व प्रसिद्ध करणारे या जनतेच्या सर्वसाधारण प्रवृत्तीचा फायदा करून घेतात व आपली कमाई करून यशस्वी झालों, असें समजतात; पण त्यांचें यश हें जनतेचें मरण आहे, हें त्यांसही कळत नाही व जनतेस तर कळणें शक्यच नसतें; म्हणूनच म्हटलें आहे—

> न मांसभक्षणे दोषो न मद्ये न च मैथुने ।
> प्रवृत्तिरेषा भूतानां निवृत्तिस्तु महाफला ॥ (मनुस्मृति)

" मांसभक्षण, मद्यपान व कामविषयक अत्याचार यांत कांहीच दोष नाही, असें मानण्याकडे सर्वांची प्रवृत्ति आहे खरी; पण खरें पाहिलें असतां यांपासून निवृत्त होण्यानेच फार मोठें कल्याण साधत असतें. "

मांस खावें, मद्य प्यावें व यथेच्छ विहार करावे, ही तर सर्व प्राण्यांची प्रवृत्तीच आहे. याच प्रवृत्तीला उत्तेजन देणारे जे लेख असतील, तेच लोकांस आवडणार ! याच्या उलट संयम करा, कर्मफलाचा त्याग करा, असे विचार लोकांस सहजासहजीं आवडणारे नाहीत. म्हणून असें प्रतिपादन करणारे लेख जनता नापसंत करणार, हें अगदी उघड आहे. हें जरी उघड असलें तरी राष्ट्राची भवितव्यता ज्या लेखकांवर व ज्या वाङ्मय-सेवकांवर आहे, त्यांनी काय लिहावें, काय छापावें व कशाचा प्रचार करावा, याचा विचार केला पाहिजे.

## प्रचाराचें साधन.

मनुष्याजवळ वाणी फार प्राचीन काळापासून होती; पण सध्या जसें प्रचाराचें साधन त्याच्याजवळ आलेलें आहे, तसें तें यापूर्वी नव्हतें; म्हणून सध्या लहान बेसावध लेखापासून जसा जनतेचा नाश होऊं शकतो, तसा नाश होण्याचा पूर्वी संभवच नव्हता.

जेव्हा कित्येक लोक म्हणतात की, ' पूर्वीच्या संस्कृत कवींनीहि भाण-प्रहसनादि अश्लील रचना केलेल्या आहेत; मग आम्हांसच तशा रचना करण्यास कां प्रतिबंध करण्यांत येतो ? ' असा प्रश्न करणारे शांत डोक्याने थोडासा विचार करतील, तर त्यांस तेव्हाच कळून येईल की, पूर्वीच्या अश्लील काव्याने सध्याप्रमाणे नुकसान होणें शक्य नव्हतें. समजा, एखाद्या संस्कृत कवीने एखादें अश्लील काव्य केलें, तर त्याच्या हजार पांचशे वर्षांत पांच चार प्रती निघत व फक्त संस्कृत जाणणाऱ्या शेपन्नास माणसांनाच त्याचा दुष्परिणाम सोसावा लागे. मध्यकालीं तर संस्कृत भाषा ही जनतेची दैनिक

व्यवहाराची भाषा मुळीच नव्हती व ग्रंथांच्या पुष्कळ प्रती निघण्याची युक्तिहि तेव्हा नसल्यामुळे कवीचे बरेवाईट विचार कवीमध्येच रहात, किंवा फार तर त्याच्या दहापाच इष्टमित्रांपर्यंत ते पोचत; यापेक्षा त्यांचा जास्त प्रसार होत नसे.

## हीन वृत्तीला प्रोत्साहन.

पण आजची स्थिति किती भयंकर आहे पहा. ज्याला लिहितां वाचतां येतें, त्याने हवें तें अचकट विचकट लिहावें, छापण्याच्या खर्चाची व्यवस्था करतां आली की, हव्या तितक्या प्रती छापाव्या; आणा, दोन आणे, तीन आणे, चार आणे–माला काढाव्या; अधिक प्रसार व्हावा म्हणून जनतेस आवडतील त्याच वैषयिक गोष्टी लिहाव्या; विशेषतः स्त्रीविषयक सुखसंबंधाचीं भडक कल्पनाचित्रें रेखाटावीं; चित्रकारांकडून सुंदर स्त्रियांचे रंगीत मुखवटे काढवून ते पुस्तकावर उठावदार छापवावे व आंतहि तशींच सूचक चित्रें द्यावीं; शक्य तें करून सर्वसाधारण जनतेमध्ये स्वाभाविक असणाऱ्या भोग-वासनेस व विलासप्रवृत्तीस चालना देतां येईल तितकी द्यावी; जनतेचें यांतच हित आहे, असें दाखवणाऱ्या शब्दयोजना करून भडक जाहिराती द्याव्या; स्वदेशी मालाचा किंवा ग्राहकांच्या हिताहिताचा विचार न करतां जे पैसे देतील त्यांच्या हव्या त्या जाहिराती छापाव्या व त्याही वाचनाच्या मजकुरांत छापाव्या; प्रथमतः उत्तेजक दिसणारीं पण शेवटीं निर्वीर्य करून सोडणारीं औषधें, राकेलांत तयार केलेलीं केशभंजक तेलें,···पुडींत···गुण दाखवणारीं विलासचूर्णें, संततिनियमनाचीं पण विषयप्रवृत्ति वाढवणारीं साधनें, या प्रकारच्या हव्या त्या नाशक व घातक पदार्थांच्या जाहिराती पैसे कमाविण्यासाठी छापून त्या ग्राहकांच्या घरीं अगदी बायकांमध्ये व मुलांमुलींमध्ये पसरवाव्या व आपण स्वतः त्यांच्या आरोग्यावर आणि नीतिमत्तेवर अग्नि ठेवून आपली पोळी पिकवीत असतांहि, आपणच या सर्व स्त्रीपुरुषांचें व तरुणांचें हित करीत आहों;

अशी द्दाही फिरवावी !!! हा प्रकार जो सध्या राजरोस चालू आहे, तो असा पूर्वी केव्हाही चालू नव्हता. संस्कृतमध्ये एखादें अश्लील नाटक असलें तरी तें याच्या पासंगालाहि लागणार नाही. सध्या जशी ही आरोग्याचा संहार करणारी अवदसा संहार करण्यासाठी थैमान घालीत आहे, तशी ती कोणत्या-ही कालामध्ये पूर्वी घालीत नव्हती !

संस्कृतांतील कांही अश्लील नाटकांच्या अस्तित्वाने सध्याची कृति कधीहि समर्थनीय होऊं शकणार नाही. सध्याची नवीन संस्कृति येण्यापूर्वी साधुसंत, कवि, हरिदास, पुराणिक व प्रवचनकार हे सर्व जनतेमध्ये एकच आध्यात्मिक वायुमंडल उत्पन्न करण्यामध्ये दंग झालेले आपणांस दिसतात व त्यांच्या त्या पवित्र कृतीचा सर्व जनतेवर एक फारच गंभीर असा परिणाम झालेला आहे, ही गोष्ट आजही आपल्या अनुभवास येत आहे. इतर कोणत्याही देशांतील सर्वसाधारण जनतेमधील शेपन्नास लोक घेतले व त्यांच्यांत जी 'खावें प्यावें व काय वाटेल तें करून गंमत करावी' एवढीच पाशवी वृत्ति दिसते, ती पाहिली व त्याच पायरीवरील आपल्या देशांतील लोक पाहिले म्हणजे वरील साधुसंतांनी येथे जें कार्य केलें, तें अजूनहि लोपलेलें नाही व त्यायोगानेच आपल्या लोकांमध्ये माणुसकी शिल्लक राहिलेली आहे, या गोष्टीचा प्रत्यय येतो.

वाणीचा उपयोग करून श्रोत्यांच्या किंवा वाचकांच्या मनांतील पाशवी भाव कमी केला पाहिजे व सात्त्विक दैवी भाव वाढवला पाहिजे. तो तसा सध्याच्या लिखाणाने होत आहे कीं काय, याचा विचार करण्याची वेळ सध्या आलेली आहे. नराचा नारायण व पुरुषाचा पुरुषोत्तम बनला पाहिजे; प्रत्येक जीवाचा शिव बनला पाहिजे; प्रत्येक स्त्री महालक्ष्मी बनली पाहिजे; यासाठी साधुसंतांनी प्रयत्न केले, आपल्या वाणीचा सदुपयोग केला व अंशतः तरी कार्य करून दाखवलें. त्यांच्या वेळेस छापखाने, वृत्तपत्रें, मासिक पत्रें;

टपालाची सोय वगैरे कांही नव्हतें, तरी त्यांनी लाखो लोकांस राक्षस-मार्गा-वरून काढून दैवी सन्मार्गावर आणलें, हें आपण आजही पहात आहों. त्यांच्या काळीं वाङ्मयप्रसाराच्या ज्या सोई नव्हत्या, त्या आज आपल्या-जवळ आहेत. दैनिकें काढून, साप्ताहिकें छापून, मासिकें प्रसृत करून नियमित-पणें लाखो लोकांशीं आज आपणांस बोलतां येतें व त्यांस माहीत नसलेली गोष्ट समजाऊन देतां येते. या साधनांचा योग्य उपयोग वाङ्मयसेवक आज करीत आहेत काय ? सध्या ज्या रीतीचें वाङ्मय-लेखन चालू आहे, त्यापैकी कितीसें वाङ्मय जनतेस राक्षस बनण्यापासून निवृत्त करून देव बनण्यास प्रवृत्त करणारें आहे ?

नियतकालिकांमध्ये अर्ध्या अधिक जाहिराती असतात. त्या देशी धंद्यांस उत्तेजन देणाऱ्या, लोकांचें स्वास्थ्यसुख वाढवणाऱ्या, लोकांस सत्प्रवृत्त करणाऱ्या किती असतात ? मजकुरामध्येहि अशीच छाननी केली, तर नरा ( Man ) चा नारायण ( Superman ) बनेल, अशा प्रकारचें लिखाण किती असतें, हें एक वेळ पाहिलें पाहिजे; म्हणजे सध्याच्या लोकांकडे एवढीं योग्य साधनें आलीं असतांहि लोक त्यांचा दुरुपयोग करून आपली हानि कशी करून घेत आहेत, हें ध्यानीं येईल.

## मुद्रणकलेचें सहाय्य.

वक्तृत्व, लेखन, काव्य आदि प्रकारांनीच केवळ आपण शिक्षणाचें कार्य करीत नसून नियतकालिकें हींही शिक्षणाचीं उत्तम अंगेंच आहेत. छापण्याची कला ही त्यांस मिळाल्यामुळे पराकाष्ठेचें उत्तम साधन आज लोकांच्या हातीं आलेलें आहे. ऋषिकालीं किंवा संतांच्या कालीं जें काम करण्यासाठी ५०० वर्षें लागत, तें कार्य आज वर्षसहामहिन्यांत घडवून आणतां येईल; पण लेखकांनी व मुद्रकांनी नराचा नारायण बनवण्याचें ध्येय आपल्या दृष्टीसमोर ठेऊन लेखनास प्रवृत्त झालें पाहिजे, तरच तें साध्य होईल;

पण सध्या प्रवृत्ति कशी आहे ? जो काम मनुष्यांमध्ये स्वभावतःच प्रबल आहे, तोच शक्य तितका अधिक वाढावा, अशाकडे कांही लेखकांचा कल आहे व त्याच लेखकांस थोडी धनप्राप्ति अधिक होते, असें पाहून इतरहि तिकडेच झुकत आहेत ! कित्येक मासिककारांनी आम्हांस असें स्पष्ट सांगितलें की, अमूक प्रकारचें शृंगारिक चित्र मुखपृष्ठावर असलें तरच आपलें मासिक खपतें, नाही तर त्याकडे कोणीसुद्धा पहात नाही. यामुळे जीं मासिकें निघतांना राष्ट्रीय ब्रीद पुढे ठेऊन निर्विकार वाङ्मय छापावें म्हणून निघालीं, तींच आता आंतबाहेर शृंगारिक बनलेलीं आहेत !!

'बोलपट' हेंहि एक शिक्षणाचें नवें साधन आपणाकडे आलें आहे. प्रारंभीं चित्रपट पाहून तरुण लोक चोऱ्या करूं लागले व अशाच तऱ्हेचीं अनिष्ट कारस्थानें करूं लागले, असा विलायतेंत व येथेहि बराच बोभाटा झाला. स्त्रैण वृत्ति बळावली, अशीहि गुणगुण बरीच झालेली आहे. कांही अश्लील दृश्यांना बंदी करावी, अशा प्रकारची चळवळ झाली व शेवटीं सरकारी रीत्या चित्रपटांचें नियंत्रण करणारें मंडळ स्थापित झालें. तें आपलें काम नीट करतें आहे कीं नाही, हा प्रश्न स्वतंत्र आहे; पण एवढी गोष्ट खरी की जें जें साधन भौतिक शोधांनी माणसाकडे येत आहे, त्याचा त्याचा दुरुपयोग होत आहे. जसा लेखनाचा, मुद्रणाचा त्याचप्रमाणे पटांचा व बोलपटांचाहि दुरुपयोग होत आहे. याचें कारण काय बरें असेल? आमच्या दृष्टीने याचें कारण हेंच आहे की, विदेशांत व स्वदेशांत जें शिक्षण दिलें जातें, त्यांतून सामान्य धर्मभावनेला उच्चाटण मिळालें आहे.

यावरून वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल की, वाङ्मयप्रसाराचीं इतकीं उत्तमोत्तम साधनें मनुष्याकडे आलीं असतांहि त्यांपासून मानवी समाजाची खरी उन्नति होण्याच्या दृष्टीने फारशी प्रगति झालेली नाही; इतकेंच नव्हे तर प्रवृत्ति दुसऱ्याच बाजूला वहात चाललेली आहे ! यावरून प्राप्त झालेल्या

साधनांचा दुरुपयोग होत आहे, असें कष्टाने म्हणावें लागत आहे. याच कारणाने एकंदरींत मनुष्याची शक्ति, दीर्घायुष्य, निरोगीपणा व मानसिक शांति या बाबतींत प्रत्यहीं हानि होत चालली आहे. वस्तुतः ज्ञानाने यांत प्रगति झाली पाहिजे; पण तसें होत नाही.

अहिंसा–सत्य–अस्तेय–ब्रह्मचर्य–अपरिग्रह
पावित्र्य–संतोष–तप–स्वाध्याय–ईश्वरप्रणिधान

हीं दहा लक्षणें मानवी धर्माचीं सामान्यतः आहेत. या धर्माकडे शिक्षितांची प्रवृत्ति होईल, असा शिक्षणक्रम नाही. याच्या उलट प्रवृत्ति वाढावी, अशा प्रकारचें साक्षरतेचें शिक्षण वाढत आहे; यामुळे मनुष्याजवळ आलेलें प्रत्येक साधन मानवी हिताच्या कामीं न लागतां तें घातपाताच्या कार्याकडे लावलें जातें. नाही तर हीं सर्व साधनें मनुष्याचें हित करण्यास समर्थ आहेत; पण त्यांचा उपयोग संहार करण्याकडे होत आहे ! म्हणूनच वाईट वाटतें.

जो अश्लीलपणा वाङ्मयांत आहे, तोच चित्रपटांत व बोलपटांतही दिसत आहे. सर्वत्र मन एकाच दिशेने कार्य करीत आहे. सर्व साधनांचा उपयोग एकाच मार्गाने केला जात आहे; यामुळे अमृतही विषासमान होऊं लागलें आहे. वास्तविक पाहतां मनुष्यामध्ये असलेली बुद्धि अशी सामर्थ्यवान् आहे की, तिच्या योगाने विष अमृतासारखें हितकर बनवतां येईल; पण येथे प्रत्यक्ष अमृतासारखी प्रचंड शक्तिशालिनी वाणी आपणाकडे असतां, तिचा उपयोग करून कांही लोक आपलाच घात करून घेत आहेत !

लेखकांनी आपणावरील ही जबाबदारी ओळखावी. आज क्षणभर फायदा दिसत आहे, म्हणून हीन वाङ्मय निर्माण करण्यामध्ये आपल्या शक्तीचा अपव्यय करूं नये. यापेक्षा लिखाण न लिहिलें तरी त्यापासून कोणाचें अहित होणार नाही. ज्या लेखकांच्या लेखणीमध्ये कांही शक्ति आहे,

त्यांनी तर आपल्या देशाची स्थिति पाहून व विचार करून विशिष्ट उच्च वातावरण निर्माण करण्यासाठींच तिचा उपयोग केला पाहिजे. आपला देश जर आज पारतंत्र्यांत असेल, तर त्याची जबाबदारी वक्ते व लेखक यांवरच सर्वस्वीं आहे, हें त्यांनी विसरून चालावयाचें नाही.

ज्या वाङ्‌मयाने नीति स्थिर रहात नाही, वाचकांची व्यभिचाराकडे प्रवृत्ति होते व विकारी मनोभावना उत्तेजित होऊन आरोग्यही नाश पावतें, त्या वाङ्‌मयाचा सर्वत्र निषेध झाला पाहिजे. सर्व समाजाची स्थिरता स्त्रीपुरुष-विषयक व्यवहाराच्या नीतीवर अवलंबून आहे, हें लेखकांनी विसरतां नये. नीतीचा पाया ढासळला की, समाज विस्कळित झालाच म्हणून समजावें व एकदा का अशी घसरगुंडी लागली, म्हणजे पुढे ती सुधारणें कठीण होणार आहे; म्हणून वक्ते, लेखक व इतर वाङ्मय-सेवक यांनी या गोष्टीकडे विशेष लक्ष्य द्यावें, अशी त्यांस विनंती आहे.



# आर्य-संस्कृति

आर्यांची जी संस्कृति ती ' आर्यसंस्कृति ' होय. हिलाच आज ' हिंदु-संस्कृति ' असें म्हटलें जात आहे. एक वेळ 'वैदिक संस्कृति' असें हिला म्हणत होते. कित्येक लोक याच संस्कृतीला 'ऋषि-संस्कृति' किंवा ' ब्राह्मणी संस्कृति ' असेंहि म्हणत असतात. या संस्कृतीचें स्वरूप काय, तें आज आपणांस पहावयाचें आहे.

'त्याग' म्हणजे आत्मसर्वस्वाचें समर्पण, हें या संस्कृतीचें पहिलें मुख्य लक्षण आहे. याविषयी लक्ष्यांत ठेवण्यासारखा मंत्र हा आहे-

ईशा वास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत् ।
तेन त्यक्तेन भुञ्जीथाः मा गृधः कस्य स्विद्धनम् ॥ १ ॥
कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः ॥
एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे ॥२॥ (यजु० अ० ४०)

(१) "जगामध्ये, सर्व स्थिरचरांमध्ये परमेश्वर आहे, (२) म्हणून

त्यागाने भोग करा, (३) लोभ धरूं नका. (४) धन निश्चयाने ( कस्य ) प्रजा-पति-पालकाचें आहे. (५) याप्रमाणे शंभर वर्षे प्रशस्त कर्मे करीत जगावें. (६) अशा रीतीने कर्मे करणारास दोष लागत नाही. (७) याशिवाय उन्नतीचा दुसरा मार्ग नाही. " हें या संस्कृतीचें ध्येयवाक्य आहे.

यांतील पहिला उपदेश असा आहे की, ( ईशा इदं सर्वं जगत् आवास्यं ) ईश बनून हें जगत् व्यापण्यास योग्य आहे. ईश बनल्यानंतरच त्यास सर्व जग व्यापतां येतें. ईश बनणें म्हणजे आपला स्वामी बनणें किंवा संयमी बनणें होय. आपल्या सर्व शक्ति पूर्णपणें आपल्या ताब्यांत जो ठेवतो, तो ईश बनतो; तोच जीवाचा शिव, पुरुषाचा पुरुषोत्तम किंवा नराचा नारायण होतो. मनोवृत्तींच्या ताब्यांत प्रायः सर्व मनुष्यें असतात. हीच त्यांची गुलाम-स्थिति असते. ही बंधनाची स्थिति दूर करून त्या ठिकाणीं आपल्या आधीन आपल्या सर्व वृत्ति ठेवणें, ही बंधनाच्या पलीकडची स्थिति होय. ही स्थिति मनुष्यास प्रयत्नसाध्य असते, म्हणूनच 'प्रयत्नान्तीं परमेश्वर' ही म्हण प्रचारांत आली आहे. आपण नर असलों तरी आपणांस नारायण बनणें शक्य आहे; ही पहिली महत्त्वाची गोष्ट आपल्या धर्माने सर्वांत प्रथम आपणांस सांगितली व हें सांगत असतांनाच ज्या दोन अवस्था आहेत, असें वरील ध्येयवाक्यांत सुचविलें, त्या अवस्था ह्या आहेत—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ( १ ) ईश | अनीश | | ( २ ) नारायण | नर |
| ( ३ ) पुरुषोत्तम | पुरुष | | ( ४ ) शिव | जीव |
| ( ५ ) मुक्त | बद्ध | | ( ६ ) स्वातंत्र्य | पारतंत्र्य |

साधारण मनुष्य ' अनीश ' अवस्थेंत असतो, त्यास ' ईश ' अवस्थेला पोचवणारी आपली संस्कृति आहे. ही ईश-अवस्था कशी प्राप्त करून घ्यावी, याचा विचार आता आपण करूं.

पारतंत्र्याच्या कष्टमय अवस्थेमधून जर तुम्हांस स्वातंत्र्याच्या आनन्दमय अवस्थेला खरोखर पोचावयाचें असेल, तर ( त्यक्तेन भुञ्जीथाः, मा गृधः ) त्यागाने भोग करा व लोभ सोडा. वरील ध्येयवाक्यांतील हा दुसरा उपदेश नेहमी लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. त्याग म्हणजे दान, दान म्हणजे आत्मसमर्पण व आत्मसमर्पण म्हणजे आपणाजवळ असलेल्या सर्व शक्ति जनताजनार्दनाच्या प्रीतीसाठी अर्पण करणें व त्या शक्ति आपणाजवळ केवळ आपणासाठीच राखून न ठेवणें.

येथे त्यागाने भोग करावयाचा आहे, भोगाने भोग करावयाचा नाही. समजा, आपल्याजवळ धन व धान्य आहे. तर तें सर्व आपणच स्वतः भोगावयाचें नाही. त्याचा आपण स्वतः भोग घेणें, हा त्याचा खरा भोग नव्हे, तर त्याचा जनतेच्या उद्धारासाठी सद्व्यय करणें, हाच त्याचा खरा भोग आहे. आपल्याजवळचें धन अज्ञान्यांना सज्ञान करण्यासाठी, दुर्बळांचें संरक्षण करण्यासाठी, मागसलेल्यांची उन्नति करण्यासाठी, रोगी लोकांच्या औषधोपचारासाठी योग्य रीतीने खर्च करणें, हा त्याच्या त्यागाने भोग करणें होय व आपले विलास वाढवणें हें भोगाने भोग घेणें होय. पण भोगाने भोग घेणें आपल्या संस्कृतीचें ध्येय नाही. आपल्या आर्यसंस्कृतीचें ध्येय त्यागाने– दानाने – आत्मसमर्पणाने भोगणें, हें आहे.

त्यागाने भोग करा, दान करून भोग घ्या, असें सांगितल्यानंतर कोणाला कांही शंका राहील म्हणून पुनः त्याचेंच अधिक स्पष्टीकरण करण्याच्या हेतूने ( मा गृधः ) लोभवृत्ति सोडा, असें स्पष्ट शब्दांनी पुनः सांगितलें आहे. यावरून त्यागाने भोग करणें म्हणजे काय, तें स्पष्ट होत आहे.

## " लोभमूलानि पापानि "

सर्व वैयक्तिक, सामाजिक व राजकीय पापें लोभ वाढल्यामुळे होत

आहेत. या जगांत लढाया, घातपात, चोऱ्या, मारामाऱ्या, लुटालूट, फसवेगिरी, या सर्व गोष्टी लोभामुळे होत आहेत. कोर्टांत खटले लढवण्याला जो ऊत येत आहे, त्याच्या मुळाशीं लोभच आहे, असें आपणांस दिसेल. दुर्बळांची गांजणूक, दीन लोकांचा छळ, शेतकऱ्यांची दैना, राष्ट्रीय पारतंत्र्य व सामाजिक जुलूम, हें सर्व होण्याचें कारण फक्त लोभवृत्ति बळावत चालली आहे, हें एकच आहे; म्हणून आपल्या संस्कृतीच्या ध्येय-वाक्यामध्ये सांगितलें आहे की, ( मा गृधः ) लोभ सोडा, लोभवृत्ति सोडा व त्यागवृत्तीने जीवनांतील भोग भोगण्यास शिका. हाच अभ्यास आहे. मनुष्याला आयुष्यामध्ये जें काय शिकावयाचें आहे, तें हेंच होय. लोभवृत्ति सोडणें व त्यागवृत्ति वाढवणें, हें आपणास करावयाचें आहे. ही गोष्ट ज्या योगाने साधेल, त्या योगाचें आचरण करणें, याचें नांव अभ्यास; यालाच धर्माचरण असें नांव आहे. खरें म्हटलें तर धर्म हा लोभवृत्तीला आळा घालीत असतो व त्यागवृत्तीला वाढवीत असतो. जो धर्म लोभवृत्ति वाढवील व त्यागवृत्ति कमी करील, तो धर्मच नव्हे. ही धर्माची मुख्य कसोटी आहे. याप्रमाणे आपला धर्मही त्यागभाव वाढवून लोभाला कमी करणारा आहे, म्हणूनच तो श्रेष्ठ आहे.

लोभ सोडावा व त्यागभाव वाढवावा, असें आपण आपल्या संस्कृतीचें एक ध्येय आहे असें पाहिलें. हें ध्येय कां असावें, असें आपण कां करावें, हेंहि येथे पाहणें अत्यंत आवश्यक आहे. वरील ध्येय-वाक्यामध्ये याचें कारण दिलें आहे तें " ( कस्य = प्रजापतेः धनं ) धन प्रजापतीचें आहे " हें आहे. जगामध्ये जें कांही धन म्हणून आहे, तें सर्व प्रजापालकाचें आहे. सर्व प्रजाजनांचें पालन करण्याच्या कामीं खर्च करतां यावें, म्हणून सर्व धन त्याच्या अधिकारांत असलें पाहिजे. वास्तविक पाहतां जगांतील सर्व धन हें सर्व प्रजाजनांचेंच आहे. सर्वांच्या कल्याणासाठीच तें उत्पन्न झालेलें असल्यामुळे त्यावर सर्वांचा सारखा अधिकार आहे.

सूर्याचा प्रकाश, वायु, पाणी यांवर जसा सर्व प्राण्यांचा सारखा हक्क आहे, त्याचप्रमाणे अन्न व इतर धन यांवरही सर्वांचा सारखा अधिकार आहे. सर्वांचें कल्याण व्हावें म्हणून अन्न व धन बनलें असल्यामुळे तें सर्वांस मिळणें व त्यायोगाने सर्वांचें कल्याण होईल असें करणें, हें अत्यंत इष्ट आहे. याचेंच नांव प्रजांचें पालन. हें प्रजापालन जो उत्तम रीतीने करतो, त्याची मालकी सर्व धनावर असली पाहिजे; म्हणजे प्रजापालकाला प्रजापालनाच्या कामीं उपयोगी पडावें, म्हणून सर्व धन प्राप्त झालें पाहिजे. त्यावर इतर व्यक्तींचा अधिकार मुळीच नाही. जर खरोखर व्यक्तीचा अधिकार कोणत्याही धनावर नाही व सर्व समाजाचाच त्यावर अधिकार आहे, तर मग कोणीही त्या धनाचा लोभ धरतां नये व सर्व धनाचा त्याग सर्व समाजासाठी सर्वांनी केला पाहिजे, हें उघड आहे.

एवढ्यासाठी वरील ध्येयवाक्यामध्ये "त्यागाने भोग करा व लोभ धरूं नका" असें सांगितलें आहे. सर्व धन हें सर्व समाजाचें असल्याने व तें एका व्यक्तीचें मुळीच नसल्याने एका व्यक्तीने तें प्रमाणाबाहेर आपणाकडे साठवून आपल्या घरीं बंद करून ठेवणें व सर्व समाजास तें मिळूं न देणें, हा व्यक्तीचा स्वार्थ आहे; यालाच लोभ म्हणतात. अशा प्रकारचा लोभ जितक्या व्यक्ति जितक्या प्रमाणांत धारण करतील, तितकें दुःख राष्ट्रामध्ये वाढेल व त्या प्रमाणांत लोकांची दीनताहि वाढेल. एका व्यक्तीने आपल्या बुद्धिवैभवाने व पौरुषप्रयत्नाने हवें तेवढें धन आणि वैभव कमवावें, त्यास कोणाची हरकत नाही; पण तें द्रव्य मिळालें आहे, म्हणून तें आपल्याच ताब्यांत ठेवणें व इतरांस मिळूं न देणें, हें पाप आहे. एका व्यक्तीमध्ये शौर्य वाढलें तर तें जनतेच्या हितासाठी व प्रजेच्या रक्षणासाठी खर्च केलें पाहिजे; एखाद्याजवळ धन पुष्कळ साठलें, तर तें त्याने सर्व राष्ट्रांतील लोकांच्या उन्नतीसाठी योग्य रीतीने खर्च केलें पाहिजे; कोणाजवळ कारागिरीची कुशलता वाढली, तर तसे

कारागीर जनतेमध्ये जास्त कसे होतील, अशा रीतीचें कारागिरीचें शिक्षण देऊन त्याने आपल्या जवळची कुशलता अधिक फैलावली पाहिजे. तात्पर्य, जें जें धन व सामर्थ्य आपणाकडे असेल, तें तें जनतेसाठी आहे, व्यक्तीसाठी नाही, असें समजून प्रत्येकाने जनहित कसें होईल, याचा विचार केला पाहिजे. यालाच ' त्यागाने भोग व निर्लोभवृत्ति ' असें म्हणतात.

लोभाने पाप कसें वाढतें, तें एक दोन उदाहरणें घेऊन आपण पाहूं. परमेश्वराने सर्व प्राण्यांसाठी किंवा सर्व मनुष्यांसाठी ही सर्व भूमि उत्पन्न केली आहे. असें असतां कित्येक ज्ञानवान् व धनवान् लोक आपलें ज्ञान, बल व धन यांच्या योगाने असे व्यूह रचतात की, त्यामुळे ज्ञानाने, बळाने व धनाने कमी असणारांची जमीन ते आपल्या ताब्यांत घेतात. यामुळेच सध्या भूमीची विषम वाटणी झालेली आहे. एका गावामध्ये एक चतुर मनुष्य असला, तर तो आपल्या चातुर्याने असे व्यूह रचतो की, साधेभोळे लोक त्याच्या त्या कपटव्यूहामध्ये गुंतून फसतात व आपल्या मालमत्तेस पारखे होतात. एखादा अधिकारी आपल्या अधिकाराच्या बळाने गरीब प्रजेस इतकें छळतो की, त्याच्या अधिकारक्षेत्रांतील कोणाचीही मालमत्ता सुरक्षित रहात नाही. याचप्रमाणे एखादा धनवान् शेटसावकार देवघेवीचा असा व्यवहार करतो व गरीब रयतेस लुबाडीत आपली इस्टेट वाढवून अगदी गबर होत राहतो. या सर्वांच्या मुळाशी आपण एकच गोष्ट पाहतों, ती ही की, ज्ञानी, बली व धनी या लोकांचा लोभ अज्ञानी, निर्बल व गरीब लोकांच्या दुःखास कारणीभूत होत असतो व हा लोभ जसजसा वाढत जातो, तसतसे गरिबांचे क्लेश वाढतच जातात. आपण आपल्या राष्ट्रांत व इतर राष्ट्रांत पहातच आहों की, जमिनीचे तंटे चालू आहेत, जमिनी गहाण पडून सावकारांच्या ताब्यांत चालल्या आहेत, दरिद्री लोक दिवसानुदिवस अधिक दरिद्री बनत आहेत व सावकार त्याच प्रमाणाने गबर होत आहेत. या सर्वांचें एकच कारण आहे व तें हें की, लोभाला आळा बसलेला नाही. जर लोकांस-

विशेषतः अधिकारसंपन्न लोकांस – त्यागाने भोग भोगतां आले व लोभ सोडतां आला, तरच सर्व जनतेचें हें दुःख दूर होणार आहे, त्यास दुसरा उपाय नाही.

आपणाकडे असलेलें किंवा वाढलेलें ज्ञान, बल व धन हें सर्व लोकांसाठी आहे, म्हणून तें त्यांस समर्पण केलें पाहिजे, अशी भावना जेवढया प्रमाणाने लोकांत जागृत होईल, तेवढया प्रमाणाने जगांतील विषमता दूर होईल व त्या प्रमाणाने लोक सुखी होतील.

ज्याप्रमाणे मनुष्य आपला ताबा भूमीवर स्थापन करूं शकतो, त्याचप्रमाणे जल, वायु, सूर्यप्रकाश, चन्द्रप्रकाश यांवर चालवीत नाही, किंवा चालवूं शकत नाही, हें खरें; पण मानवी स्वार्थाने उद्भवलेली विषमता सध्या इतकी वाढली आहे की, दिवसानुदिवस अशी स्थिति बनत आहे की, त्या परिस्थितीमुळे गरिबांस या गोष्टी हव्या तितक्या मिळत नाहीत व त्यामुळे त्यांस अनंत क्लेश भोगावे लागत आहेत. तथापि परमेश्वर अत्यंत दयाळू असल्यामुळे तो श्रीमंतांवर व गरिबांवर सारखाच पाऊस पाडतो, सर्वांस सारखीच हवा देतो. सूर्य जसा श्रीमंतांवर प्रकाशतो, तसाच तो गरिबांवरही प्रकाशतो. त्यामुळेच गरीब जगत आहेत. जर का या सर्व गोष्टींवर लोभी लोकांचा पूर्ण ताबा बसत चालला असता तर त्यांनी इतर लोकांस जगूंहि दिलें नसतें. यामुळे लोभी लोक विषमता उत्पन्न करीत असूनही या आवश्यक गोष्टींमध्ये देवाच्या दयेने अमर्याद विषमता होऊं शकली नाही. पण हा गुण त्या प्रजापालक परमेश्वराचा आहे व यांत लोभी मानवांकडे यशाचा भाग मुळीच येऊं शकत नाही.

परमेश्वराने आपल्या शक्तीने जें हें जग निर्माण केलें आहे, तें सर्व प्राणिमात्रांचें सुख वाढावें, म्हणूनच होय; म्हणजे हा त्याचा फारच मोठा त्याग आहे व ही त्याची अमर्याद निर्लोभी वृत्ति आहे. पहा—

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।**
**नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ (भ० गी० ३।२२)**

"तीनही लोकांमध्ये मला कांहीही अप्राप्य नाही, मिळवावयाचें नाही व केलें पाहिजे असेंहि कांही शिल्लक राहिलेलें नाही; तथापि मी कर्म करीतच असतों." असें भगवंतांनी अर्जुनास सांगितलें आहे. त्यांतील तत्त्व हेंच आहे की, कांही एक स्वार्थ साधावयाचा नसतांना ईश्वराचें कर्म केवळ परोपकारासाठी चालू आहे. त्या त्याग-भावनेने व निर्लोभ-भावनेनेच त्याला ईश्वरत्व प्राप्त झालेलें आहे. त्याचा त्याग सर्वांत अधिक असल्यामुळे सर्वांनी त्याला आपला ईश असें मानलें; सर्वांपेक्षा त्यानेच परोपकार अधिक केल्यामुळे त्याला सर्वांनी आपला अधिपति म्हणून कल्पिलें. अर्थात् जो अधिक त्याग करतो, अधिक परोपकार करतो व अधिक निर्लोभवृत्तीने वागतो, तोच सर्वांचा अध्यक्ष, पुढारी, चालक, नियंता किंवा ईश बनतो. असा ईशच आपल्या शक्तीने या सर्व जगांत व्यापण्यास म्हणजे सर्वांपेक्षा थोर होण्यास योग्य आहे व जो त्याप्रमाणे आचरण करील, तोही सर्वांत थोर होईल.

थोरपण उगीच मिळत नसतें. तें त्याग व निर्लोभवृत्ति यांमुळेच मिळतें. आजही ज्यांना विशेष थोरपण मिळालेलें आहे, त्यांच्यांत त्यागभाव व निर्लोभवृत्ति अधिक होती, असेंच आपणांस आढळेल. स्वार्थाने लोकांस मान मिळतो, नाही असें नाही; पण तो क्षणभंगुर असतो, तो कधीहि चिरस्थायी असूं शकत नाही.

याप्रमाणे आपण पाहिलें की, या संस्कृतीच्या ध्येयवाक्यामधील उपदेश अत्यंत बहुमोल आहे व खरें जगाचें कल्याण याप्रमाणे वागण्यानेच होऊं शकेल; म्हणूनच पुढील ध्येयवाक्यांत सांगितलें आहे की, ( **कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः** ) अशा रीतीने कामें करीत मनुष्याने १००

वर्षे जगण्याची इच्छा करावी, किंवा मनुष्याने १०० वर्षांच्या आपल्या आयुष्यामध्ये अशा प्रकारेंच कर्में करावीं. ( १ ) परमेश्वर सर्वत्र आहे असें मानणें, ( २ ) आपल्या शक्तींचें समर्पण करून परोपकार करणें, ( ३ ) लोभ न धरणें, ( ४ ) सर्व धन सर्व जनतेच्या कल्याणासाठी आहे असें मानणें, या रीतीने जीं कर्में होतात, तींच कर्में मनुष्याचा उद्धार करूं शकतात. मनुष्याला जर आपली उन्नति करून घेण्याची खरी इच्छा असेल तर त्याने अशा वृत्तीनेच कर्में करीत राहिलें पाहिजे. याशिवाय ( इतः अन्यथा न अस्ति ) दुसरा उपाय नाही. अशा वृत्तीने केलेलीं कर्में मनुष्याला बंधन ( न कर्म लिप्यते नरे ) करूं शकत नाहीत; इतकेंच नव्हे तर तीं मनुष्याला बंधनांतून सोडवतात, दुःखांतून पार करतात व अत्युच्च अवस्थेला पोचवूं शकतात.

आपल्या संस्कृतीचें हें ध्येयवाक्य आहे व आपल्या सर्व धर्मांचा पाया यावर रचला आहे. आपला सर्व वर्णाश्रमधर्म या पायावर रचल्यामुळेच तो अनंत आपत्तींतून टिकून राहिला आहे व यामध्ये जे दोष घुसले असतील ते जर आपण आज या कसोटीने पारखून दूर केले, तर तो आज सुद्धा आपणास उन्नतीच्या शिखरावर नेऊं शकेल, यांत शंका नाही.

आपल्या संस्कृतीचें हें ध्येय आपल्या धर्मांमध्ये कसें साधलें आहे, तें आपण आता पाहूं. वर्णधर्म व आश्रमधर्म असे दोन विभाग आपल्या धर्माचे आहेत. एका व्यक्तीच्या चार विभागांतील कर्में आश्रमधर्माने दाखविलीं आहेत व समाजाच्या चार विभागांचीं कर्में चार वर्णांमध्ये दाखविलीं आहेत. आपण प्रथमतः आश्रमधर्माचा विचार करूं.

ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास हे चार आश्रम आहेत व ते एका व्यक्तीचें १०० वर्षे आयुष्य आहे, असें मानून प्रत्येक पंचविशीमध्ये एक याप्रमाणे चार विभागांत चार आचरावयाचे असतात. सर्वांत प्रथमतः

पहिल्या पंचविशीमध्ये ब्रह्मचर्याश्रम आचरावयाचा असतो. हा प्रत्येकास आवश्यक असतो. पुढचे आश्रम स्वीकारावे किंवा न स्वीकारावे, ही गोष्ट ऐच्छिक आहे, तशी गोष्ट या आश्रमाची नाही. सर्वांना हा आश्रम आवश्यक आहे. जे अनाथ व बेवारशी असतील, त्यांनाही ब्रह्मचर्य आश्रम स्वीकारणें आवश्यकच आहे. ब्रह्मचर्याश्रमामध्ये जे विद्यार्थी गुरुकुलामध्ये राहून शिकत असतील, त्यांच्या घरीं त्यांची मालमत्ता संभाळण्यास जर कोणी मागे नसेल तर राजाने पंचांच्या द्वारें त्यांच्या धनदौलतीचें संरक्षण करावें व स्नातक होऊन आल्यावर त्यांची मिळकत त्यांस द्यावी, असा हा स्मृतिकारांचा नियम असें स्पष्ट दाखवीत आहे की, घरीं कोणी नसलेल्या पोरक्या पोरांचीसुद्धा गुरुकुलांमध्ये सोय व्हावी. इतक्या महत्त्वाचा व सर्वांस अत्यंत आवश्यक असा हा ब्रह्मचर्याश्रम आहे.

या ब्रह्मचर्याश्रमामध्ये श्रीमंत व दरिद्री, राव व रंक, सगळे सारखे एका शिस्तीमध्ये वागवले जात असत. श्रीकृष्ण भगवान् व सुदामा, द्रुपद व द्रोण या सर्वांना एका शिस्तीने वागवण्यांत येई. हा श्रीमंत व हा दरिद्री, हा भेद या ब्रह्मचर्याश्रमांत कोणीही पाळीत नसे. श्रीमंताच्या मुलाने आपली श्रीमंती विसरावी व गरिबाच्या मुलाने आपली गरिबी विसरावी व दोघांनी शुद्ध सात्त्विक वातावरणांत आनंदाने रहावें, असा हा ब्रह्मचर्याश्रम असे.

गरीब आपली गरिबी विसरेल, पण श्रीमंताने आपली श्रीमंतीची मिजास विसरून गुरुगृहीं भिक्षावृत्तीने रहावयाचें काम किती कठीण आहे, याचा विचार वाचकांनीच करावा. स्वेच्छेने गरिबी स्वीकारण्यास लावणारा हा ब्रह्मचर्याश्रम आहे. मुलगा घरचा कितीहि श्रीमंत असो, गुरुगृहीं गेल्यानंतर त्याने 'भवति भिक्षां देहि' हा मंत्र उच्चारलाच पाहिजे, आपलें जेवण आपण काबाडकष्ट करून कमावलें पाहिजे, याशिवाय गत्यंतर नसे. गरिबींतील हालअपेष्टा याप्रमाणे २५–३० वर्षे सोसल्यानंतर त्याला जरी गृहस्थाश्रमा-

मध्ये धनदौलत मिळाली, तरी तो सहसा अरेराव बनणार नाही; कारण दरिद्री लोक कसे दुःखांत असतात, हें त्याने प्रत्यक्ष पाहिलेलें असतें. स्वेच्छेने कष्टाचें जीवन स्वीकारणें, ही गोष्ट येथे फार महत्त्वाची आहे. मनुष्याचें १०० वर्षांचें आयुष्य असतें, असें मानलें तर त्यांपैकी पहिलीं तीस वर्षे या ब्रह्मचर्यामध्ये गरिबींत गेलेलीं असतात. वानप्रस्थ व संन्यास या आश्रमांमध्येही धनसंचय करावयाचा नसतो. यावरून १०० वर्षांच्या आयुष्यापैकीं ७५ किंवा ८० वर्षे हीं त्यागवृत्तीमध्येच घालवावयाचीं असतात. या तीन आश्रमांमध्ये धनसंग्रह, उपभोग, चैन, विलास, डामडौल यांचा त्याग करावयाचा असतो. सर्व लोक या आश्रमांमध्ये समतेनेच रहावयाचे असतात. संन्यासी झाल्यानंतर पूर्वाश्रमींचें नांवगाव सुद्धा विसरावयाचें असतें. श्रीमंत कुलांतील संन्यासी व गरीब कुलांतील संन्यासी यांत कांही एक अन्तर नसतें. सर्व संन्यासी सारखे, सर्व वानप्रस्थी सारखे व सर्व ब्रह्मचारी सारखे. हा सारखेपणा श्रीमंतीच्या भोगांनी व्यक्त करावयाचा नसून ऐच्छिक दारिद्र्याने व्यक्त व्हावयाचा असतो. याप्रमाणे चार आश्रमांपैकी तीन आश्रम त्याग व निर्लोभ-वृत्ति यांचा पाठ आचरणांत आणण्यासाठीच आहेत, हें येथे पहावें, म्हणजे आपला धर्म स्वार्थत्यागाचा धडा लोकांस कसा देत आहे, तें सर्वांस तेव्हाच समजून येईल.

विषमता नको व समता पाहिजे, असें जें लोक प्रतिपादन करीत असतात, ती समता आयुष्यांतील तीन-चतुर्थांश भागामध्ये आपल्या धर्माने कोणत्या शिस्तीने दिली आहे, हें यावरून वाचकांस सहज समजून येणार आहे. या शिस्तीच्या वागणुकीने जनतेमध्ये विषमता नांदणेंच शक्य नाही. समाजांतील तीन-चतुर्थांश लोक या तीन आश्रमांमध्ये रहात असतां, ते अकिंचन वृत्तीने राहतात व सर्व सारख्या शिस्तीने वागतात, अशा लोकांमध्ये सध्या दिसून येणारी विषमता दिसेल, हें संभवनीयच नाही.

आता एक गृहस्थाश्रम राहिला. त्या गृहस्थाश्रमामध्ये राहणाऱ्या मनुष्यावर धन कमावून त्या धनाचा विनियोग ब्रह्मचर्य, वानप्रस्थ व संन्यास या आश्रमांत राहणाऱ्यांच्या पोषणाकडे करण्याचा भार असतो. यावरून गृहस्थाश्रमामध्येहि परोपकाराचा धडाच गिरवावयाचा असतो, ही गोष्ट व्यक्त होते. सर्व दानधर्म गृहस्थाश्रमी मनुष्याला करावे लागत असल्यामुळे त्याचें जीवनही त्यागाचेंच जीवन असतें. याप्रमाणे चारही आश्रम मनुष्याला स्वार्थत्यागाचा पाठ शिकवीत असतात. " त्यागाने भोग कर, लोभ धरूं नको " हा उपदेश या आश्रमांतील शिस्तीने मनुष्यास मिळत असतो.

याप्रमाणे चारही आश्रमांच्या धर्मांमध्ये 'त्याग' हें एक तत्त्व ओतप्रोत भरलें आहे, ही गोष्ट विसरून चालावयाचें नाही. आपल्या धर्मामध्ये इतका त्यागभाव भरलेला असतांही आज आपल्यामध्ये दिसावी तशी त्यागवृत्ति कां दिसत नाही, याचें कारण शोधावयास फार लांब जाण्याचें कारण नाही. जेथे आश्रमधर्म पाळलेच जात नाहीत, तेथे आश्रमधर्मापासून बिंबणारा त्याग कसा दिसेल ? ब्रह्मचर्याश्रम जवळ जवळ नामशेष झालेला आहे. उपनयन किंवा मौंजीबंधन म्हणून एक नांवाचा संस्कार राहिलेला आहे. उपनयन झाल्या नंतर एक दोन दिवसांतच सोडमुंज केली जाते व मामा पुढे येऊन मुलीचें प्रलोभन दाखवतो ! ज्या ब्रह्मचर्याश्रमांत कडक शिस्त पाळावयाची असते, त्याच आश्रमासाठी करावयाच्या उपनयनसंस्कारामध्ये वारयोषितांचा नाचही कित्येक शोकी गृहस्थ करीत असतात; पण यामुळे पुढे शोक करण्याचा प्रसंग जेव्हा त्यांच्यावर येतो, त्या वेळीं मात्र ते रडतात !

ब्रह्मचर्य, वानप्रस्थ व संन्यास हे आश्रम जवळ जवळ नामशेष झाले आहेत. गृहस्थाश्रम हा इकडे ब्रह्मचर्यामध्ये जसा घुसला आहे, तसाच तो वानप्रस्थ व संन्यास यांमध्येही घुसला आहे. त्यामुळे त्याग-जीवनाच्या ठिकाणीं भोगजीवनच वाढलें आहे. जसें केलें जातें, तसेंच फल मिळतें.

हा नियम असल्यामुळे आपण आश्रमधर्म सोडल्यामुळेच आपली ही अशी दशा झालेली आहे, हें निश्चित आहे. ब्रह्मचर्याचा उत्तम पाया जर बळकट झाला, तर पुढील इमारत कधीही लेचीपेची होणार नाही; पण जर ब्रह्मचर्य पाळावयाच्या कालामध्येच विवाह होऊं लागले, उपनयनाच्या वेळींच जर नाच चालूं लागले व व्रतपालन करण्याच्या प्रसंगींच जर मामा आपल्या मुलीस पुढे करूं लागले, तर त्या लोकांची अवस्था कशी होईल, हें सांगावयास नकोच. तेव्हा हा धर्मव्यवस्थेचा दोष नसून तो दोष या व्यवस्थेप्रमाणे न चालण्याचा आहे, हें येथे वाचकांनी विसरूं नये.

आता आपण ब्रह्मचर्याश्रमामध्ये काय साधावयाचें असतें, तें पाहूं. ‘ब्रह्म-चर्य’ म्हणजे ‘ब्रह्म बनण्यासाठी जें आचरण करावें लागतें तें.’ ब्रह्म हें अगदी स्वतंत्र ज्ञानशक्तीचें नांव आहे. ब्रह्म बनणें म्हणजे आपल्या आंतील शक्तीचा पूर्ण विकास करून पराधीनता दूर करून स्वतंत्र बनणें होय. आज मनुष्य चारही बाजूंनी परतंत्र आहे. या पारतंत्र्याने त्याचा चहूकडून कोंडमारा होत आहे. हें याचें पारतंत्र्य नाहीसें करणें, हें आज याचें ध्येय आहे. पारतंत्र्य नाहीसें करण्यासाठी आज याला ब्रह्म बनावयाचें आहे. ब्रह्म बनणें म्हणजे ‘मोठें बनणें, विकसित होणें, स्वतंत्र होणें, आपल्या शक्तीनेच राहणें, दुसऱ्यावर अवलंबून न राहणें, सर्व शक्तींवर आपला ताबा ठेवणें, आपल्या कह्यांत सर्व शक्ति ठेवणें’ होय. या सर्वांचा एकच अर्थ हा आहे की, मनुष्य जो आज ( अनीश ) गुलाम आहे, तो ‘ईश’ बनावा अशी खटपट करणें. (ईशा वास्यं इदं सर्वं ) ईश बनून याला या जगांत वावरावयाचें आहे. ईश बनणें व ब्रह्म बनणें यांचा अर्थ एकच.

प्रत्येक मनुष्य आपण अपूर्ण आहे, असा अनुभव करीत आहे. ही अपूर्णता दूर व्हावी व त्याने पूर्ण बनावें, यासाठी हा ब्रह्मचर्याश्रम आहे. अपूर्णाची पूर्णता केवळ ज्ञान प्राप्त झाल्यानेच होऊं शकेल, ज्ञानाशिवाय दुसरा कांही

एक तरणोपाय नाही; यासाठीच या ब्रह्मचर्याश्रमामध्ये ज्ञान प्राप्त केलें जातें. जें ज्ञान या वेळीं मिळवावयाचें, तें कसें असावें, यासंबंधी कांही ध्येयवाक्यें आहेत, त्यांपैकी एक दोन आपण येथे पाहूं—

**अप्यायन्तु ममाङ्गानि वाक्प्राणश्चक्षुः श्रोत्रमथो बलमिन्द्रियाणि च सर्वाणि सर्वं ब्रह्मोपनिषदं माहं ब्रह्म निराकुर्यां मा मा ब्रह्म निराकरोद् निराकारणमस्तु ॥** ( उपनिषच्छान्ति )

“ माझे अवयव हृष्टपुष्ट होवोत; माझी वाणी, प्राण, चक्षु, कान हीं इंद्रियें व माझें बल, हीं सर्व या ज्ञानानें वाढोत, पूर्ण होवोत, हें ज्ञान माझी पूर्णता करो, माझ्याकडून या ज्ञानप्रसारामध्ये विघ्न न होवो, अशा रीतीने आम्हां सर्वांची उत्क्रान्ति होवो. ” ज्ञान प्राप्त करून प्रथम काय साधावयाचें असतें, तें येथे सांगितलें आहे. शरीर सुदृढ व्हावें, इंद्रियें कार्यक्षम व्हावींत, तीं आपल्या ताब्यांत रहावीं व त्यांच्या योगाने उन्नतीच्या मार्गांत विघ्नें येऊं नयेत, ही गोष्ट प्रथम साधली पाहिजे. यास आपण वैयक्तिक उन्नति असें म्हणूं. ब्रह्मचर्याश्रमामध्ये याप्रमाणे वैयक्तिक उन्नति साधावयाची असते. यमनियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान-धारणा व समाधि, हें अष्टांगयोग-साधन वैयक्तिक उन्नतीचें साधन करण्यास सहाय्यक आहे व तें याच कारणासाठी गुरुकुलांत प्रविष्ट झालेल्या ब्रह्मचाऱ्यास प्रथमतः शिकविलें जातें. या रीतीनें वैयक्तिक उन्नति साधणें, हें या ब्रह्मचर्याश्रमामधील पहिलें कर्तव्य आहे.

यानंतर या ब्रह्मचाऱ्यापुढे– किंवा गुरुकुलांतील विद्यार्थ्यापुढे –सामाजिक व राष्ट्रीय प्रश्न उभे राहतात. त्यांचेंहि उत्तर त्यास देणें भाग असतें. कोणत्याही व्यक्तीची पूर्णता वैयक्तिक उन्नति साधल्यानेच केवळ होणें शक्य नसतें. वैयक्तिक उन्नति साधून व्यक्तीचें सामर्थ्य एवढ्यासाठीच वाढवावयाचें असतें की, ती व्यक्ति सामाजिक व राष्ट्रीय कार्य करावयास अधिक समर्थ व्हावी. शिक्षणाचें हेंच ध्येय आहे. पहिलें वैयक्तिक साध्य साधल्यावर

सामुदायिक साध्य विद्यार्थ्यांपुढे ठेवलें जातें, हें पुढील ध्येयवाक्यांवरून वाचकांच्या लक्ष्यांत येईल–

सह नाववतु सह नौ भुवक्तु सह वीर्यं करवावहै ।
तेजस्वी नावधीतमस्तु मा विद्विषावहै ॥ (शान्तिमन्त्र)

" प्राप्त केलें जाणारें ज्ञान आम्हां दोघांचें रक्षण करो, आम्हां दोघांना अन्न देवो; या ज्ञानाच्या योगाने आम्ही दोघे मिळून पराक्रम करूंया; हें ज्ञान आम्हां दोघांचें तेज वाढवणारें होवो व हें ज्ञान प्राप्त केल्यानंतर आमचा आपसांत द्वेष न वाढो. "

हें सामाजिक, राष्ट्रीय किंवा सामुदायिक ध्येय विद्यार्थ्यांच्या समोर ठेवलें जातें. दोनही प्रकारच्या मनुष्यांचें कल्याण किंवा संरक्षण व्हावें, त्यांचें पोषण व्हावें, त्यांना विविध कार्यक्षेत्रांत पराक्रम करतां यावे, ते तेजस्वी बनावे व त्यांमध्ये आपसांत द्वेष वाढूं नये, असें करणें हें ध्येय त्यांनी आपल्यापुढे ठेवलें पाहिजे. आपण जें ज्ञान मिळवीत आहों, त्यायोगाने जगामध्ये या गोष्टी घडवून आणूं, अशी महत्त्वाकांक्षा सर्व तरुणांनी मनांत धरली पाहिजे.

दोन प्रकारचे लोक म्हणजे कोणते लोक ? असा एक प्रश्न येथे वाचक विचारतील. त्यांस उत्तर देण्याची फारशी आवश्यकता नाहीं; कारण आपण प्रत्येक समाजामध्ये पाहिलें तर त्यांत मागसलेले व पुढारलेले, शिक्षित व अशिक्षित, श्रीमंत व दरिद्री, अधिकारी व अधिकार नसलेले, कारखानदार व मजूर, राजपुरुष व प्रजापुरुष, उच्च व नीच, विजयी व पराजित, जित व जेते, मालक व नोकर, शिक्षक व विद्यार्थी, पिता व पुत्र, स्त्री व पुरुष, असे दोन दोन वर्ग असलेले दिसतात. यांपैकी कित्येकांना स्वभावतः अनुकूल परिस्थितीमुळे कांही सवलती असतात व कित्येकांना त्यांच्या प्रतिकूल परि-

स्थितीमुळे कांही सवलती नसतात. या कारणामुळे त्यांच्यांत विषमता उत्पन्न होत असते. ही विषमता दूर व्हावी व या दोनही प्रकारच्या लोकांस समानतेने आपली उन्नति करतां यावी, अशी परिस्थिति आणून देणें, हें ध्येय राष्ट्रांतील तरुणांच्या पुढे नेहमी असलें पाहिजे व तसें तें वरील ध्येयवाक्याने तरुणांपुढे ठेवलें आहे.

१. ( अधीतं नौ सह अवतु ) अध्ययन केलेलें आमचें ज्ञान आम्हां दोघांचें समतेने रक्षण करो.
२. ( अधीतं नौ सह भुनक्तु ) अध्ययन केलेल्या ज्ञानाने आम्हां दोघांना समानतेने अन्नपान प्राप्त होवो.
३. ( अधीतेन नौ सह वीर्यं करवावहै ) अध्ययन केलेल्या ज्ञानानें आम्ही दोघे मिळून खांद्यास खांदा लाऊन पराक्रम करूं.
४. ( नौ अधीतं तेजस्वि अस्तु ) आम्ही अध्ययन केलेलें ज्ञान तेजस्वी असो, तें आम्हां दोघांमध्येही तेजस्विता उत्पन्न करो आणि शेवटीं-
५. ( नौ मा विद्विषावहै ) हें ज्ञान प्राप्त केल्यावर आम्हां दोघांचेंहि परस्पर भांडण होऊं नये.

ही पांच ध्येयें या ब्रह्मचर्याश्रमांतील विद्यार्थ्यांच्या पुढे ठेवलीं जात असत. सर्व शिक्षणाने हें साधावयाचें आहे, असें समजलें जात असे. यावरून वाचकांच्या लक्ष्यांत येईल की, जी समता स्थापावी, असें सध्याचे लोक अट्टाहासाने म्हणत आहेत, ती समता या गुरुकुलीय शिक्षणपद्धतीने सहजासहजीं स्थापली जात होती; यामुळे सर्व समाज एकजीव असल्याप्रमाणे जोमदार व सजीव होता, आपसांत भांडणें नव्हतीं व त्यामुळे त्या आर्यांच्या समाजाकडे पाहून शत्रूचें धाबें दणाणत असे. पण हें समतेचें शिक्षण दूर झाल्यामुळे—

( १ ) आत्मसंरक्षण करण्याची धमक नाहीशी झाली,

( २ ) शिक्षितांमध्ये बेकारी वाढली व त्यांस खावयास मिळेनासें झालें,

( ३ ) पराक्रम करण्याची धमक नाहीशी झाली,

( ४ ) तेजस्वीपणा दूर झाला व

( ५ ) आपसांत अनेक प्रकारचा द्वेष वाढला.

या सर्वांचा परिणाम असा झाला की, जे आपण स्वतंत्र होतों, तेच आज परतंत्र झालों आहों !

या ठिकाणीं कोणी असें म्हणतील की, चार आश्रमांमध्ये कर्तव्यांची विषमता आहे व चार वर्णांमध्येही प्रत्येकाचीं भिन्न भिन्न कर्तव्यें आहेत, असें असतां त्यांमध्ये ' समता ' होती, असें कसें म्हणतां येईल ? हा प्रश्न आता विचारांत घेऊं. कर्तव्यें भिन्न असलीं म्हणून विषमता होत नाही. त्यांचा त्याग सारखा असला म्हणजे झालें. सर्व मनुष्यांमध्ये समता पाहिजे, म्हणजे सर्वांची उंची सारखी असावी, सर्वांचा रंग सारखा असावा, असें कोणी म्हणणार नाही. ही स्वाभाविक विषमता राहणारच, ती कधीही काढून टाकतां यावयाची नाही. समाजासाठी कार्य करण्याची व समाजासाठी त्याग करण्याची समता मनुष्यास पाहिजे असते.

आपल्या शरिरामध्येच पहा. येथे डोळे, नाक, तोंड, कान, हात, पाय, हे भिन्न अवयव भिन्न भिन्न कार्ये करीत असतात; इतकेंच नव्हे तर त्यांपैकी एकाचें कार्य दुसऱ्यास करतांही येत नाही, म्हणून त्यांच्यांत विषमता आहे, असें कोणी म्हणत नाही. जोंपर्यंत हे सर्व अवयव शरिराच्या हितासाठी आपल्या शक्ति समर्पण करीत आहेत, शरिराच्या कल्याणासाठी आपल्या कर्तव्याची पराकाष्ठा करीत आहेत, तोंपर्यंत त्यांचीं कर्तव्यकर्में जरी भिन्न असलीं, तरी त्यांत विषमता किंवा द्वेष आहे, असें होत नाही.

याचप्रमाणे राष्ट्रामध्ये ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र तसेंच ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यासी यांचीं कर्तव्यें कितीही भिन्न असोत, ते सर्व

मिळून जोंपर्यंत राष्ट्रासाठी पूर्णपणें आत्मसमर्पण करण्यास तयार आहेत, तोंपर्यंत त्यांच्यांत विषमता आहे, असें कोणासही म्हणतां येणार नाही. ज्याच्या त्याच्या शक्तीप्रमाणे ज्याचें त्याचें कार्यक्षेत्र भिन्न असेल, तर त्यामुळे झालेला भेद कधीहि हानिकारक होत नाही. जो भेद हानिकारक होतो, तो त्यागाचा अभाव व लोभाचा प्रादुर्भाव यांमुळे उत्पन्न होणारा भेद होय.

चारहि वर्णांमध्ये ब्राह्मणांचा दर्जा सर्वांत अधिक कां? तर तो वर्ण सर्वांत अधिक त्याग करतो म्हणून. जर तो अधिक त्याग करणार नाही, तर तो ब्राह्मण कुलांत जन्मला, एवढ्याच सबबीवर त्यास श्रेष्ठत्वाचा मान मिळेल असें नाही. त्याचप्रमाणे क्षत्रियादिकांविषयीही समजावें. तसेंच आश्रमांमध्ये संन्यास-आश्रम सर्वांत श्रेष्ठ मानतात, याचें कारण तो अधिकांत अधिक त्याग करतो हें आहे. जो संन्यासी होऊन त्याग न करतां भोग व ऐश्वर्य यांत दंग होईल, त्याचा मान कोणीहि करणार नाही. याचप्रमाणे इतर आश्रमवासीयांविषयीही समजावें. यावरून लक्ष्यांत येईल की, त्याग व निर्लोभ-वृत्ति यांमुळे मनुष्याची किंवा समाजाची योग्यता मोठी किंवा लहान समजली जाते. श्रेष्ठतेची हीच कसोटी आहे. आजपर्यंत जे जे थोर लोक होऊन गेले, त्यांनी थोर त्याग केला होता, म्हणून त्यांना सर्वांनी मोठा मान दिला. अर्थात् त्यागाशिवाय मान मिळणें शक्य नाही.

चार आश्रमांपैकी पहिल्या ब्रह्मचर्याश्रमामध्ये धनसंपत्ति जवळ बाळगा-वयाची नाही. वानप्रस्थ व संन्यास आश्रमांत असलेल्या लोकांनीही संपत्तीचा संग्रह आपणाजवळ करावयाचा नाही व गृहस्थाश्रमांतील लोकांनी धनसंपत्ति जवळ बाळगावयाची ती फक्त इतर तीन आश्रमांतील लोकांना पोसण्यासाठीच बाळगावयाची असल्यामुळे या चारहि आश्रमांमध्ये राहणाऱ्या माणसांपैकी धन-संपत्तीवर कोणाचाही ताबा नसे, धनाचें केंद्रीकरण होत नसे व संपत्ति एके ठिकाणीं साठत नसल्यामुळे ती अनिष्ट परिणाम घडून जनतेच्या त्रासास

कारणीभूत होत नसे. यावरून आश्रमव्यवस्था ही उच्च प्रकारच्या समाजसत्ते-( Socialism ) चा नमुना म्हणून आजही लोकांपुढे ठेवण्यासारखी आहे, हें लक्ष्यांत येईलच.

चार वर्णांमध्ये पाहिलें तर ब्राह्मणाने व शूद्राने धनसंग्रह करावयाचा नाही, असा नियम असल्यामुळे क्षत्रिय-वैश्यांजवळच काय तो धनसंग्रह होत असे; पण वयास ५० वर्षें झाल्यावर ' सर्वमेध ' यज्ञ करून आपलें सर्व धन जनताजनार्दनासाठी अर्पणें, हें एक त्यांचें कर्तव्यच समजलें जात असल्यामुळे या वर्णव्यवस्थेमध्येही एके ठिकाणीं धन साठत नसे. त्यामुळे ही व्यवस्थाही समाजसत्ते ( Socialism ) चा उत्कृष्ट नमुना म्हणून पुढे ठेवण्यासारखी आहे.

सध्या ' सोशिआलिझम्, कम्युनिझम्, बोल्शेविझम् ' असे मतप्रचारक संघ युरोपमध्ये निघाले आहेत व ते प्रतिपादन करीत आहेत की, धन व सत्ता एका व्यक्तीकडे केंद्रित होऊं नये. रशियामध्ये या बाबतींत पुष्कळ मोठ्या प्रमाणामध्ये फार प्रशंसनीय कार्य चालू आहे. युरोपच्या या समाजसत्तावादा-मध्ये पुष्कळ दोष आहेत व त्यांतले बरेच दोष रशियामधील चालकांनी कमी केलेहि आहेत; तथापि अगदी निर्दोष समाजसत्तेचा तेथेहि प्रादुर्भाव अजून झालेला नाही.

आपल्या वर्णाश्रमधर्माची रचना पाहिली म्हणजे वर दिलेल्या विवेचना-वरून वाचकांच्या हें लक्ष्यांत येईल की, निर्दोष समाजसत्ता अस्तित्वांत आणण्याचा प्रयत्न त्या वेळच्या ऋषींनी केलेला होता. या वर्णाश्रमामध्ये वैयक्तिक उत्कर्षास पूर्ण वाव आहे, हें यांतील वैशिष्ट्य आहे. युरोपच्या समाज-सत्तेंत व्यक्ति मरत आहे व प्रत्येक व्यक्ति मारून त्यांचा समाज मात्र जिवंत ठेवण्याचा प्रयत्न ते करीत असल्यामुळे तीं मतें शेवटीं समाजाच्या उन्नतीस कारणीभूत होणार नाहीत. आपल्या वर्णाश्रमधर्मांत व्यक्ति मरत नाही; तिच्या

विकासास पूर्ण वाव आहे. अशी उन्नत व्यक्ति समाजाची घटक बनावी व असा समाज समाजसत्तेने संयुक्त व्हावा, अशी यांत योजना आहे. वैयक्तिक उन्नति व सामाजिक उन्नति या दोन वादांचें हें अत्यंत गोड असें मीलन आहे. हें येथे हिंदी तरुणांनी लक्ष्यांत ठेवावें.

सध्या आपल्या या हिंदराष्ट्रामध्ये युरोपचे समाजसत्तावाद विविध रूपाने घुसत आहेत. कम्युनिस्ट म्हणून कांही तरुण काम करीत असलेले वर्तमान-पत्रांमध्ये दिसत आहेत. या लोकांस जर वर्णाश्रम-धर्मांतील 'मर्यादित समाज-सत्तावाद' समजून येईल, तर आपल्या प्राचीन थोर ऋषींनी निर्दोष समाज-सत्ते ( कम्युनिझम् ) चा कसा उत्कर्ष केलेला होता, हें त्यांस दिसून येईल व युरोपचीं उष्टीं इकडे आणण्याचा मोह त्यांस होणार नाही. युरोपमध्येच ज्या मतांनी हाहाकार चालवला आहे, तीं उष्टीं मतें येथे आणलीं तर येथे तरी सुख कसें होईल ? यासाठी उष्टीं मतें उचलण्याचें लोकांनी सोडून द्यावें व आपल्या वर्णाश्रमव्यवस्थेने आपलें राष्ट्र पुनः तेजस्वी करण्याचा प्रयत्न करावा, हें सध्याच्या कार्यकर्त्यांस योग्य होय.



# आर्य-संस्कृतीचें संरक्षण

संस्कृतीचा संबंध मानवप्राण्याशीं आहे. मनुष्यसमाज नाश पावला तर संस्कृतीचें अस्तित्व मानणें शक्य नाही. म्हणून संस्कृतीचा विचार करतेवेळीं मानवी समाजाचा विचार करणें अगदी अपरिहार्य आहे.

मनुष्य जे काय आचारव्यवहार करतो, त्यांमुळे त्यावर व त्याच्या समाजावर बरे वाईट परिणाम होत असतात. हे परिणामच संस्कार होत. संस्कार, विशेष काळजी न घेतली तर, बरेहि होऊं शकतात व वाईटही होऊं शकतात. ते जसे हितपरिणामी होतात, तसेच ते अहितपरिणामीहि होऊं शकतात. हे संस्कार वस्तुतः चांगलेच झाले पाहिजेत; कारण 'संस्कार' शब्दाचा मूळ अर्थ ( सं ) चांगलें ( कार ) करणें, चांगलें बनवणें असा आहे; पण एकाचा दुसऱ्यावर जो परिणाम घडतो, त्यास संस्कार म्हणण्याचा परिपाठ असल्यामुळे हा परिणाम बरावाईट असा दोनही तऱ्हेने होऊं शकतो. ज्याचा परिणाम ज्या दुसऱ्यावर घडतो, त्या दोघांचेहि दृष्टिकोन भिन्न

असल्यामुळे व या दृष्टिकोनांतील भेदामुळे परिणामाचा बरेवाईटपणा ठरणार असल्यामुळे होत असलेला परिणाम केव्हा चांगला, तर केव्हा वाईट होतो, असें समजलें जातें.

उदाहरणार्थ, दुधामध्ये भाकरी किंवा पोळी घातली तर ती मृदु होते. यामुळे हा पोळीवरील संस्कार दांत नसलेल्या वृद्धास आनंद देणारा होतो; पण उत्तम दांत असलेल्या मनुष्यास कडकडीत भाकरीच आनंददायक होत असते. या एकाच संस्काराकडे पाहणाऱ्याचा दृष्टिकोन भिन्न असल्यामुळे एकास आनंद झाला, तर दुसऱ्यास तो तसा तो होत नाही.

संस्कार हितपरिणामी कसे होतील, याचा विचार रसायन, वैद्यक आदि शास्त्रें करीत असतात. रसायनशास्त्राप्रमाणे योग्य ती दक्षता घेऊन संस्कार केले, तर जें रसायन सिद्ध होतें, त्याचा परिणाम उत्तम झाल्याशिवाय राहणार नाही. संस्कारांतील अनिष्ट परिणाम होण्याची शक्यता सर्व शास्त्रें दूर करीत असतात. सर्व शास्त्रकारांनी अनेक अनुभव घेऊन हितपरिणामी संस्कार कसे करावे, तें ठरवण्यासाठी आपली शक्ति खर्च केली आहे व याच कारणासाठी शास्त्रांचें प्रामाण्य नेहमी मानलें जात आहे.

जशीं अनेक शास्त्रें निरनिराळया सिद्धीसाठी उत्पन्न झालीं आहेत, त्याचप्रमाणे धर्मशास्त्र हें मानवी समाजाचे सर्व व्यवहार हितपरिणामी कसे होतील, तें दाखवण्यासाठी निर्माण झालें आहे. मनुष्यांचे सर्व व्यवहार पूर्णपणाने निर्दोष व्हावे, त्या व्यवहारांपासून उत्पन्न होणारे सर्व संस्कार मनुष्यांवर सर्व प्रकारें दोषरहित व्हावे व एकंदरीत सर्व मनुष्यांचें मनुष्यपण विकसित होऊन त्या '**पुरुषाचा पूर्ण पुरुष**' बनावा, हा उद्देश धर्मशास्त्राचा आहे. म्हणून धर्मशास्त्राने ठरवलेले सर्व संस्कार मनुष्याचें पूर्ण कल्याण व्हावें, एवढ्याचसाठी असतात; कारण मनुष्याला '**पूर्ण पुरुष**' बनवणें याशिवाय दुसरा कोणताच धर्मशास्त्राचा उद्देश असणें शक्य नाही.

धर्मशास्त्र हें सर्व शास्त्रांचें शास्त्र आहे, म्हणजे सर्व अन्य शास्त्रांनी जे सिद्धान्त अनंत अनुभवांनंतर अटल सिद्धान्त म्हणून ठरवले, तेच सिद्धान्त धर्मशास्त्रांत पुण्यकारक म्हणून मानले गेले आहेत. धर्मशास्त्राचे 'पुण्य' व 'पाप' हे दोन शब्द 'पवित्रता करणारा' व 'पतन करणारा' या अर्थांनी वापरण्यांत येतात. उदाहरणार्थ, स्नान हें पुण्यकारक आहे, याचा अर्थ तें पवित्रता करणारें आहे, मल दूर करणारें आहे, असा समजावयाचा असतो. तसेंच मद्यप्राशन हें पाप आहे, याचा अर्थ त्याच्या योगाने मनुष्य पतित होतो, असा समजावा. सर्व अन्य शास्त्रांनी ज्या गोष्टी मनुष्याला हितकारक अशा निश्चितपणाने ठरवल्या, त्या 'पुण्य' या प्रकरणांत धर्मशास्त्राने घातल्या व ज्या गोष्टी मनुष्याच्या जीविताला हानिकारक आहेत असें पाहिलें, त्यांचा समावेश 'पाप' या विभागांत धर्मशास्त्राने केला. यावरून लक्ष्यांत येईल की, पापपुण्य हे विभाग अंधविश्वासाने बनलेले नाहीत, तर ते डोळसपणाने केलेल्या अखण्ड संशोधनाने सिद्ध झालेल्या स्थिर सिद्धांतांचे निदर्शक आहेत. खऱ्या धर्मशास्त्रांत येणाऱ्या बहुतेक सर्व विधींचें अशा रीतीने समर्थन होणें शक्य आहे; तथापि आजचा आपला विषय हा नव्हे. असो.

धर्मशास्त्राने पाप व पुण्य या विभागानुसंधानाने जे विधिनियम मनुष्यांच्या उत्कर्षासाठी सांगितले व विविध संस्कार, अनुष्ठानें व कृत्यें आदेशिलीं, त्या सर्वांमुळे जे इष्ट संस्कार होत असतात व त्यांमुळे जी 'सुसंस्कारसंपन्नता' मनुष्यास प्राप्त होत असते, त्यास 'संस्कृति' असें म्हणतात.

धर्माचा संस्कृतीशीं असा हा निकट संबंध आहे; म्हणूनच प्रत्येक धर्माची संस्कृति निराळी आहे. हिंदुसंस्कृतीमधील मनुष्य व मुसलमानी संस्कृतीमधील मनुष्य यांच्या जीवनामध्ये जो भेद दिसतो, तो यामुळेच होय. संस्कृतीशीं धर्माचा संबंध अगदी निकट आहे. तथापि धर्मनियमाला सोडूनहि जे आचारविचार मनुष्यें करूं लागतात, त्यांमुळेहि त्यांवर इष्टानिष्ट परिणाम

होऊं लागतात व त्या त्या जातीची संस्कृति निराळीच बनत जाते. सध्या अशी धर्माला समूळ सोडून एक नवी संस्कृति रशियामध्ये बनवली जात आहे. त्यांनी जरी धर्म न मानण्याचें आपलें वैशिष्ट्य आहे, असें उद्घोषित केलें असलें, तरी ज्या चालीरीतींचा ते पुरस्कार करीत आहेत, तोच त्यांचा धर्म झालेला आहे. ईश्वर मानणारा हिंदुधर्म आहे व न मानणारा बुद्धधर्म आहे. हे दोन्ही धर्मच. त्याचप्रमाणे सध्याच्या रशियाचा ' धर्म न मानण्याचा धर्म ' आहे. या तिघांच्या धर्मपद्धति निरनिराळया असल्यामुळे तिघांच्या संस्कृतीहि निरनिराळया आहेत. याचप्रमाणे ख्रिस्ती, मोहमदीय, पारसीक आदि निरनिराळया धर्मांच्या निरनिराळया संस्कृति आहेत.

मनुष्य धर्माशिवाय राहूंच शकत नाही. आपण मुळीच धर्म मानीत नाही, असें म्हणणारेहि जें काय मानून व्यवहार करतात, तो त्यांचा धर्म असतो; म्हणून या पृथ्वीवर ईश्वर मानणारे व न मानणारे, धर्म मानणारे व न मानणारे, परम गति मानणारे व न मानणारे, असे अनेक धर्मपंथ आहेत व यांच्या विचारसरणी विभिन्न असल्यामुळे त्यांच्या संस्कृतीहि विभिन्न झालेल्या आहेत.

संस्कृतीचा असा मानवसमाजाशीं संबंध असल्यामुळे 'संस्कृति' असें नुसतें न म्हणतां 'अमूक संस्कृति' असें म्हटलें पाहिजे. अमूक संस्कृति असें म्हटलें, म्हणजे तिची अन्य संस्कृतीशीं तुलना करतां येणें शक्य असतें.

' **संस्कृति-संरक्षण** ' हें ज्या संस्थेचें कार्य असेल, त्या संस्थेने आपण अमूक संस्कृतीचें संरक्षण करणार, असें उद्घोषित केलें पाहिजे, तरच ती संस्था संस्कृतीचें संरक्षण करणारी आहे, असें निश्चितपणाने लोकांस समजेल व त्या संस्थेवर जी जबाबदारी येते, ती त्या संस्थेच्या सदस्यांस निश्चितपणाने समजूं शकेल व त्या अनुरोधाने आपलें कर्तव्य त्यांस करतां येईल.

नुसता ' **संस्कृति-संरक्षण** ' हा शब्द सामान्यार्थक आहे. जर एखादी

**'संस्कृतिसंरक्षक संस्था'** असेल व तिचा सदस्य बनण्यासाठी **'संस्कृतिसंरक्षण'** एवढेंच ध्येय पुरें असेल, तर तिचा सदस्य प्रत्येक मनुष्य बनूं शकेल; म्हणजे सनातनी व साम्यवादी असे दोघेहि त्या **'संस्कृतिसंरक्षक संस्थे'** चे सदस्य होऊं शकतील; कारण दोघेहि कांही तरी संस्कृति इच्छीत असतातच. हा अनर्थ टाळावा, असें जर मनांत असेल तर **'आर्य-संस्कृति-संरक्षक मंडळ'** किंवा **'सनातनधर्मसंस्कृति-संरक्षक मंडळ'** अशासारखें कांहीतरी निश्चितार्थ-प्रतिपादक नांव अशा संस्थेस दिलें पाहिजे. म्हणजे आपण या संस्थेंत येऊन कोणतें कर्तव्य केलें पाहिजे, तें सदस्यांस समजेल व हवा तो मनुष्य सभासद होऊं शकणार नाही.

आता कोणतीहि संस्कृति असो, ती पाळली जावी, तिचा फैलाव व्हावा, तिचें संरक्षण व्हावें, असें त्या त्या संस्कृतींत वाढलेल्या लोकांस वाटणें स्वाभाविक आहे. सर्व संस्कृतींत वाढलेल्या लोकांस असेंच वाटत असतें व असें वाटणेंहि योग्य आहे.

धर्म हा संस्कृति बनवीत असल्यामुळे धर्मापेक्षा संस्कृतीचें आयुष्य कमी मानणें उचित आहे. कालमर्यादेप्रमाणे पाहिलें तर-

( १ ) सनातन वैदिक धर्म. ( २ ) जरदुष्ट्रीय पारसी धर्म.
( ३ ) जिनांचा जैन धर्म. ( ४ ) गौतम बुद्धाचा बौद्ध धर्म.
( ५ ) यहुदी धर्म. ( ६ ) येशू ख्रिस्ताचा ख्रिस्ती धर्म.
( ७ ) मोहमदाचा मोहमदीय धर्म.

अशी परंपरा लागते. इतर धर्म यांतच मागे पुढे बसूं शकतील. जैन-बौद्धांच्या पौर्वापर्याबद्दल वाद असले तरी ते वैदिक धर्माच्या अलीकडचे आहेत, यांत शंका नाही व जरदुष्ट्री धर्महि वैदिकांशीं भांडण झाल्यानंतर अस्तित्वांत आला असल्याने सनातन वैदिक आर्य धर्माइतका जुना धर्म कोणताही नाही, हें निर्विवाद होय.

वेदांचा कालनिर्णय ८००० वर्षांपासून २००००० पर्यंत निरनिराळे गणितज्ञ करीत आहेत. आपणांस फार खोलांत जाण्याचें कारण नाही. आपण हा सनातन वैदिक आर्यधर्माचा काल १०००० वर्षांचा धरूं व इतर धर्म त्याच्या अलीकडचे आहेत, असें समजूं.

या प्रत्येक धर्मानें आपली विशिष्ट अशी एक एक संस्कृति बनवलेली आहे व ती आजपर्यंत चालतहि आलेली आहे. मोठ्या कालखंडांतून यावें लागल्यामुळे या संस्कृतींत कांही भेसळ झाली असली व कांही भाग ठिकठिकाणीं राहून गेला असला, तर त्यांत कांही नवल नाही. तेवढ्याने त्या त्या संस्कृतीचें वैशिष्ट्य नामशेष झालें, असें म्हणतां येणार नाही.

या जुन्या धर्मांनी घडवलेल्या संस्कृति, सध्या जग जवळ जवळ येऊं पहात असल्यामुळे, विशेषच संघर्षामध्ये येऊं लागल्या आहेत. वाहनांच्या गतीने माणसांची गति वाढली व त्यामुळे जगाचा विस्तार कमी झाल्यासारखें भासूं लागलें. पूर्वी मनुष्य अहोरात्रामध्ये १०० मैल जाऊं शकत होता, तो आता ३००० मैल जाऊं शकतो. यामुळे मनुष्याची व्याप्ति ३०० पट वाढली व त्या मानानें जग लहान झालें. यामुळे या सर्व संस्कृति एकमेकींशीं भिडल्या आहेत व त्या शाश्वत टिकण्यासाठी विशेषच स्पर्धा करूं लागल्या आहेत.

प्राचीन संस्कृतींचा असा संघर्ष चालू असतांच या सर्वांस खाऊन टाकण्यासाठीच कीं काय, ( Communistic civilisation ) साम्य संस्कृति, ( Socialistic civilisation) समाज-संस्कृति, (Fascistic civilisation ) बलोपासक संस्कृति, ( Nazi civilisation) राष्ट्रीय सामाजिक संस्कृति, अशा झोटिंगशाही संस्कृति या पंचवीस वर्षांत उत्पन्न झाल्या आहेत. या दुसऱ्यांस हाणून मारून ठोकून स्वतः काय तें समर्थ होऊन जगावें, अशा बाण्याने आक्रमण करीत चालल्या आहेत. यांना

इतिहासाचा पाठिंबा नसला तरी मनगटाच्या जोराचा पाठिंबा भरपूर असल्यामुळे यांची प्रगति जोरांत चालू झालेली आहे.

रशियांत साम्यधर्म, जर्मनींत राष्ट्रीय समाजधर्म, इटालींत बलिष्ठांचा धर्म व इतरत्र समाजधर्म उत्पन्न होऊन त्या त्या विचारसरणीने त्या त्या संस्कृति बनत चालल्या आहेत. यांपैकी रशियाचा साम्यधर्म हा धर्माचें व ईश्वराचें अस्तित्व न मानणारा धर्म आहे. तथापि तो एका विशिष्ट तऱ्हेने आपल्या समाजाचें धारणपोषण करण्याची हमी घेण्याचें धाष्टर्य करीत असल्यामुळे ( धारणात् धर्मः ) त्यास आम्ही धर्म असें येथे म्हटलें आहे. ईश्वर मानणें न मानणें याशीं धर्माचा संबंध नाही; म्हणूनच बौद्धपंथाला धर्म मानतां येतें. समाजाचें धारण होत असलें म्हणजे त्या व्यवहारपद्धतीस धर्म असें म्हणावयास प्रत्यवाय नाही.

हिंदुस्थानांतील तरुणांना रशियाचा साम्यधर्म आवडूं लागला आहे, असें दिसतें. ज्याला तो प्रिय वाटेल त्याने तो स्वीकारावा व त्याचा प्रसार करावा. त्यास प्रतिबंध करण्याची आमची इच्छा नाही. फक्त आम्ही इतकेंच म्हणणार की, "काल उत्पन्न झालेल्या तुमच्या मताच्या रक्षणासाठी व प्रसारासाठी जर वक्तृत्व, लेखन व प्रसंगविशेषीं रक्तपात करावा लागत आहे; इतकेंच नव्हे तर हें करणें हें आपलें कर्तव्यच आहे असें वाटत आहे, तर मग तेच उपाय आम्ही निदान दहा हजार वर्षें टिकून राहिलेल्या आमच्या संस्कृतीच्या संरक्षणासाठी उपयोगांत आणले, तर त्यांत अयोग्य तें काय झालें ?"

रशियाच्या साम्यवादी संस्कृतीस आपल्याच देशांत १०–२० वर्षें टिकण्यासाठीसुद्धा हजारो माणसांचें रक्त सांडावें लागलें. तेथे उलट बोलणारास जिवंत राहणें किंवा सन्मानाने जिवंत राहणें सध्या अशक्य झालें आहे. उलट बाजू वर्तमानपत्रांत छापली जाणें तेथे अशक्य आहे, उलट मताचा प्रसार करणाराचें तेथे वास्तव्य होऊं शकत नाही, उलट बाजूने इतर देशांत

कांही छापलें तर तें तेथे प्रविष्टहि होऊं शकत नाही. उलट मताच्या लोकांस हद्दपार व्हावें लागतें अथवा प्राणांस मुकावें लागतें. वरिष्ठांच्या हुकुमाप्रमाणे कनिष्ठांनी निमूटपणाने राबावें, नाहीतर देशत्याग करावा, यासच साम्यवाद व समता म्हटलें पाहिजे; नाही म्हटलें तर प्राणास मुकलें पाहिजे. हीच अवस्था जर्मनी व इटली या देशांत आहे. ही निरनिराळया तऱ्हेची झोटिंगशाही आहे. या लोकांनी त्या त्या देशांत आस्थेने लोककल्याण करण्याचा हव्यास चालविला आहे. याचा परिणाम काय होईल, तो भविष्यकाळीं दिसेलच. तूर्त आम्ही हें सर्व मानवांच्या हितासाठी होत आहे, असें समजून चालूं व ते काय करीत आहेत तें पाहूं व त्याप्रमाणे आपणांस काय करतां येईल, याचा विचार करूं. आज ज्याचा बोलबाला होत आहे, त्या साम्यवादी नियमांप्रमाणेच इतरांनीहि आपापल्या संस्कृतिसंरक्षणासाठी वागण्यास कोणतीच हरकत नाही.

१. साम्यपंथ रशियांत उद्भवला व तो सर्व जगभर पसरवण्यासाठी त्यांनी सर्व देशांत आपले दूत पाठवले आहेत व सर्वत्र मतप्रसार चालवला आहे. त्याचप्रमाणे 'कृण्वन्तो विश्वं आर्यं' या वेदवचनाप्रमाणे आम्ही आर्य संस्कृतीचें संरक्षण आपल्या देशांत केलें पाहिजे व इतर देशांत त्या संस्कृतीचा प्रसार करण्यासाठी शक्य ते प्रयत्नहि केलेच पाहिजेत.

२. ज्याप्रमाणे रशियांतील सध्याचे कार्यकर्ते आपल्या देशांत साम्यमताविरुद्ध लेख लिहूं देत नाहीत, ग्रंथ छापूं व विकूं देत नाहीत, अथवा उपदेश करूं देत नाहीत, त्याचप्रमाणे आम्ही आर्य-संस्कृतीच्या लोकांनी या आपल्या आर्यभूमीमध्ये आपल्या आर्य-संस्कृतीच्या विरुद्ध कोणी कांही लिहूं नये, कोणी कांही छापूं व विकूं नये व बोलूं नये, असें म्हटलें तर त्यांस या साम्यवादी लोकांनी कांही व्यत्यय आणूं नये.

३. साम्यवादी शासक आपलें तत्त्वज्ञान रक्तपाताच्या धाकाने सुरक्षित ठेवीत आहेत; तसेंच कोणी आर्यराजाने केलें तर या उदारमतवादी साम्यवाद्यांना त्या आर्य-राजाविरुद्ध कांही बोलतां येणार नाही. आर्यांनी प्राचीन काळीं आपल्या संस्कृतीच्या संरक्षणासाठी आपलें रक्त सांडलें व शत्रूंस पराजित करून आपलें आर्यशासन प्रस्थापित केलें; तसेंच आपणांस भविष्य कालांतहि करावें लागेल.

४. सध्याचे साम्यवादी जें काय आपल्या देशांत करीत आहेत, तें सर्व त्यांस प्रमाण आहे; तेव्हा त्या मर्यादेपर्यंत इतरांनी जाणें अयोग्य आहे, असें ते म्हणणार नाहीत.

साम्यवादी लोक समतेचा डंका वाजवीत असतांहि विषमतेचा भयंकर अत्याचार करीत सुटले आहेत. तसा अत्याचार आम्हां वैदिक धर्मी आर्यांस आपल्या संस्कृतीच्या संरक्षणासाठी करण्याची आवश्यकता आहे, असें आम्हांस वाटत नाही. आजपर्यंत आम्ही अत्याचार केले नाहीत व अत्याचारांशिवाय आमच्या संस्कृतीने हजारो वर्षें सन्मानाने उच्च जीवन धारण केलेलें आहे.

साम्यवाद व समता जर कोणी अत्याचारांशिवाय व्यवहारांत आणली असेल, तर ती आपल्या आर्यधर्मानेच आणलेली आहे. आपल्या आर्यधर्मातूनच अहिंसेचें जीवन घेतलेल्या बौद्ध धर्मानेहि प्रेमाच्या व सेवेच्या बलाने जग जिंकलें होतें. ख्रिस्ती व मोहमदी धर्मांनी रक्तपाताच्या आश्रयाने आपल्या मताचा प्रसार केला, हें इतिहासांत स्पष्ट लिहिलेलें आपण पहात आहों. यावरून प्रेमाने सत्य धर्माचा व उच्च संस्कृतीचा प्रसार करण्याचें सर्व श्रेय आपणां आर्यधर्मीयांसच आहे, हें निर्विवाद होय.

हिंसेचा आश्रय करणारे व अहिंसेचा आश्रय करणारे असे जर आम्ही पंथांचें विभाग केले, तर हिंसेचा आश्रय करणारांमध्ये ख्रिस्ती, मोहमदी,

साम्यवादी, नाझी, फॅसिस्ट यांचा समावेश होईल व अहिंसेचा आश्रय करणाऱ्यांमध्ये सनातन वैदिक आर्य, बौद्ध, जैन यांचा समावेश होईल. संस्कृतीची उच्चता जर कशाने ठरणें शक्य असेल, तर ती अहिंसेच्या कसोटीनेच ठरणें शक्य आहे; म्हणून आपली संस्कृति या कसोटीनेहि उच्चच ठरते, हें उघड आहे.

आम्ही आतापर्यंत व्यर्थ अत्याचार न करतां व प्रतिपक्षाशीं युक्तिवाद करून आपल्या संस्कृतीचें संरक्षण केलें आहे व त्याचप्रमाणे भविष्यकाळींहि आम्ही करूं शकतों; आमची संस्कृति ज्ञानविज्ञानाच्या भक्कम पायावर उभारलेली असल्यामुळे आम्हास शंकासमाधान करण्याचा प्रसंग आला तर भय न वाटतां आनंदच वाटत असतो. जे लोक अत्याचार करूनच आपलें संरक्षण करूं शकतात, त्या साम्यवादी व इतर मतवाद्यांपेक्षा आम्ही अनत्याचारी राहून आपलें स्वतःचें संरक्षण करूं शकत आहों; म्हणूनच आपल्या आर्य मतामध्ये विशेषच सामर्थ्य आहे, ही गोष्ट निःसंदेह व्यक्त होत आहे व यांत आमच्या यशाचें बीज आहे.

आमच्या संस्कृतीचें आयुष्य सर्व इतर संस्कृतींपेक्षा अधिक आहे, यावरूनच तिचें जीवनसामर्थ्य विशेष आहे, हें निःसंशय ठरलेलें आहे. साम्यवादाची संस्कृति वीस वर्षांत तीन वेळ बदलावी लागली व पुढे हजार वर्षांपर्यंत ती टिकून राहणार कीं तिच्यांतूनच दुसरा एखादा झोटिंग निर्माण होणार आहे, हें कांही आजच सांगतां येणार नाही. मी या नवसंस्कृतींविषयी इतकेंच म्हणतों की, त्यांची जीवनक्षमता सिद्ध व्हावयाची आहे.

अशा प्रकारें अनेक दृष्टींनी आमची संस्कृति आजपर्यंत अनेक कसोट्यांवर घासून ताऊन सुलाखून निघाली आहे. या सर्व परीक्षांमध्ये ती उच्च दर्जाची आहे, असें ठरत आलें आहे. यासाठीच आम्हांस आमच्या आर्यसंस्कृतीचा सकारण अभिमान आहे.

हा अभिमान सकारण आहे, हें खरें असलें, तरी भविष्य काळीं तो टिकावा, यासाठी आम्हांस तो लोकांस समजाऊन देणें आज आवश्यक झालेलें आहे. परकीय राज्य, नवी विचारपरंपरा, समाजांत एकसूत्रीपणाचा अभाव, परकीयांस आमच्यांत फूट पाडण्याची आवश्यकता, परकीय राज्यांतील परकीय वळणाचें शिक्षण, इत्यादि विरुद्ध परिस्थितींत पुढील पिढी वाढत असल्यामुळे ती आमच्या उच्च संस्कृतीस पारखी होत चालली आहे.

आमच्या श्रेष्ठ ग्रंथांचें अध्ययन लोपत चाललें आहे, आमचे आचार पाळले जात नाहीत, आमच्या परंपरेंत वाढलेले वृद्ध जात चालले आहेत, परकीयांस हिंदूसंस्कृति नष्ट झाली तर आपला मार्ग निष्कंटक झाला असें वाटतें, इत्यादि कारणांनी पुढील पिढींत आर्यसंस्कृतीचा अभाव वाढत चालला आहे. त्यांतच सार्वत्रिक शिक्षण झाल्यामुळे लेखकवर्ग वाढला आहे. आपल्या संस्कृतीचें ज्ञान नसलेला लेखकवर्ग वाढल्यामुळे त्याचें लिखाणही आपल्या संस्कृतीशीं विरुद्ध असें होत आहे. या कारणांनी सध्या आमच्या संस्कृतीवर आंतून व बाहेरून हल्ले होत आहेत.

ज्यांस आर्यसंस्कृतीचा सकारण अभिमान वाटत आहे व ज्यांनी आर्यधर्माच्या ग्रंथांचें अध्ययन केलेलें आहे, अशा लोकांवरील उत्तरदायित्व वरील कारणांसाठी प्रतिदिवशीं वाढत आहे. या परिस्थितीशीं तोंड देण्यासाठी, आपण सर्वांनी मिळून एकजुटीने व संघशक्तीने तयार झालें पाहिजे. हें कार्य आपोआप होणारें नाही. संघटना करून आपण या बिकट परिस्थितींतून आपला मार्ग काढला पाहिजे.

बाकीचे सर्व जनसंघ सुसंघटित होत आहेत, अशा वेळीं आम्ही असंघटित राहिलों, तर आपली भूमि आपल्या हातीं राहणार नाही, हें कोणीहि विसरतां नये.



# संस्कार व त्यांची आवश्यकता

एका वस्तूचा दुसऱ्या वस्तूशीं संबंध आला की, त्यांचे परस्परांवर संस्कार होऊं लागतात. वस्तु जड असो किंवा चेतन असो, संबंध आला की, परस्परांवर संस्कार हे होणारच, ते टाळतां येणें अशक्य आहे; पण ते शुभ करतां येणें व त्यांचा अनिष्ट परिणाम टाळतां येणें, मात्र शक्य आहे. हे संस्कार त्या त्या वस्तु अगदी जवळ आल्यानेच होऊं शकतात, असें म्हणतां येत नाही. पृथ्वीपासून सूर्य–चंद्र पुष्कळच दूर आहेत; पण त्यांचे संस्कार पृथ्वीवरील प्रत्येक पदार्थावर होतच असतात व तसे ते मानवांवरहि होतात. इतकेंच नव्हे, पण जे प्रकाशगोल पृथ्वीपासून हजारो प्रकाशवर्षांच्या अन्तरावर आहेत, त्यांचेही संस्कार या पृथ्वीवरील वस्तुमात्रावर व मानवांवरही होतच असतात. याचा विचार केला असतां, हें स्पष्ट लक्ष्यांत येतें की, संस्कार होत राहणें, हा सृष्टीचा अबाधित नियमच आहे. जर संस्कार होणारच व जर ते टाळतां येणारच नाहीत, तर त्यांना टाळण्यासाठी आपली शक्ति व्यर्थ खर्च

न करतां, त्यांतील मारकता दूर करण्याकरिता व त्यांची सहायकता वाढवण्यासाठीच मनुष्याने प्रयत्न करणें श्रेयस्कर आहे, हें उघड आहे.

चंदनाच्या वनामध्ये चंदनाशिवाय दुसरीं झाडें असलीं, तरी त्यांना चन्दनासारखा सुवास येतो. फुलांच्या संगतीमध्ये तेल किंवा स्पिरीट राहिलें, तर फुलांचा सुगंध त्या दुसऱ्या पदार्थांत उतरतो. फुलांच्या माळेंतील दोर फुलांच्या संगतीमध्ये राहिल्यामुळे देवाच्या किंवा राजाच्या गळयांत किंवा छातीवर जाऊन बसण्यास योग्य समजला जातो. सुसंगतीच्या शुभ संस्कारांनी हीन वस्तूचीही योग्यता वाढते, त्याचप्रमाणे अशुभ संगतीमुळे होणाऱ्या कुसंस्कारांनी अधोगति झाल्याचींहि उदाहरणें देतां येणें शक्य आहे.

## जन्मापासून संस्कार सुरू झाले आहेत.

मनुष्य जन्मास आल्यापासून त्याच्यावर शुभाशुभ संस्कार हे होतच असतात; त्यांपैकी अशुभ संस्कारांचा दुष्परिणाम टाळतां यावा व शुभ संस्कारांचा सुपरिणाम वाढून तो स्थिर व्हावा, यासाठी धर्माने अनेक प्रयोग करून, अनेक पिढ्यांच्या अनुभवाने जे विधि निश्चित केले आहेत, त्यांस " संस्कार " असें शास्त्रांमध्ये सांकेतिक नांव आहे. हे विधि योग्य वेळीं केले असतां त्या वयापर्यंत त्या मनुष्यावर झालेले कुसंस्कार दूर होऊन, शक्य तितक्या अधिक शुभ संस्कारांची दृढता मनुष्यामध्ये होऊं शकते. यासाठी संस्कार हा धर्मामध्ये फारच महत्त्वाचा भाग आहे, असें समजलें जातें व तें योग्यच आहे.

## मानवी मनाची संस्कारक्षमता.

मानवी मन ही एक विलक्षण वस्तु आहे. या मनाचें सामर्थ्य इतकें प्रचंड आहे की, त्या सामर्थ्याचें पूर्णपणें आकलन अजूनपर्यंत मनुष्यांना झालेलें नाही.

" मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयोः । "

म्हणजे मानवी मन हें मनुष्यांचा बंध व मोक्ष होण्यास कारणीभूत होऊं शकतें. ज्याच्यामुळे मनुष्यांना बंधन व ज्याच्यामुळे त्यांची बंधनांतून सुटका होणें शक्य आहे, त्या मनाचा या संस्कारांशीं निकट संबंध आहे, हें विसरून चालणें शक्य नाही. या मनासंबंधाने यजुर्वेदामध्ये म्हटलें आहे की—

## शिवसंकल्प.

यत्प्रज्ञानमुत चेतो धृतिश्च यज्जोतिरन्तरमृतं प्रजासु ।
यस्मान्न ऋते किंचन कर्म क्रियते तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥
सुषारथिरश्वानिव यन्मनुष्यान्नेनीयतेऽभीशुभिर्वाजिन इव ।
हृत्प्रतिष्ठं यदजिरं जविष्ठं तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥

( यजु० वा० सं० ३४।३–६ )

" जें मन ज्ञानविज्ञान, चित्त, धैर्य, प्रकाश व अमर भावाने प्रजाजनांमध्ये निवास करीत आहे व ज्याच्याशिवाय कांही एक कर्म केलें जात नाही, तें माझें मन शुभसंकल्पयुक्त होवो ! ज्याप्रमाणे उत्तम सारथी आपल्या रथाच्या घोड्यांना उत्तम प्रकारें शिक्षण देऊन नीट रस्त्याने चालवितो, त्याचप्रमाणे हें मन सर्व इंद्रियांना सुशिक्षित करून मनुष्यांना नीट धर्म-मार्गावर चालवूं शकतें. हें हृदयांत वसत असून फारच वेगवान् आहे; म्हणून तें माझें मन शुभ संकल्पाने युक्त होवो ! "

' हें मन शुभसंकल्पयुक्त होवो ' असें कां म्हटलें आहे ? याचें कारण असें आहे की, जर त्यावर अशुभ संस्कार होतील, तर त्याची सर्व शक्ति आपल्याच नाशाला कारणीभूत होईल. असा अनिष्ट परिणाम होऊं नये, म्हणूनच मन शुभसंस्कारसंपन्न ठेवणें अत्यंत इष्ट आहे.

## मन हा कल्पवृक्ष आहे.

कल्पनेप्रमाणे फल देणारा जो वृक्ष असतो, त्याला कल्पवृक्ष असें म्हणतात.

मनुष्याचें मन विविध कल्पना करतें व त्याप्रमाणे बरेवाईट परिणामही घडून येतात. मनाने बंधनाची कल्पना केली तर मनुष्य बंधनांत पडतो व तो जेव्हा म्हणतो की, " मी मुक्त आहें, " तेव्हा तो स्वतंत्र होऊन मुक्तही होतो. अशी ही मनाची विलक्षण शक्ति आहे.

एखाद्या माणसाला जर असें सांगितलें की, ' या खोलींत कालच महामारीने एक मृत्यु झाला आहे. सांभाळून नीज. ' तर हा विचार त्याच्या मनांत रात्रभर त्या रोगाचे संस्कार करीत राहतो व त्यास रोगाचीं लक्षणें दुसरे दिवशीं होऊं लागतात. सर्प चावलेल्या माणसांपैकी शेकडा नव्वद इसम केवळ सर्पविषाच्या कल्पनेच्या भीतीनेच शरिरांत विष न जातांसुद्धा मरून जातात ! असा हा " मनरूपी कल्पवृक्ष आपल्या अन्तःकरणांत आहे. " कल्पना करावी ती येथे सिद्ध होते, म्हणूनच फार जपलें पाहिजे.

या मनाला—

दूरं गमं ज्योतिषां ज्योतिरेकं तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ।"

(यजु० ३४।१)

हें दूरवर पोचणारें आहे, असें म्हटलें आहे व हा सर्वांचा अनुभवहि आहे. पांचपांचशे व हजार हजार मैलांवरील आजारी मुलांचे संदेश आईला व वडिलांना बिनहरकत पोचूं शकतात. हें मनाचें सामर्थ्य संस्कारांचा विचार करतांना लक्ष्यांत घेणें आवश्यक आहे.

## संस्कारांचें स्थिरीकरण.

बाहेरील वस्तुमात्रामुळे उत्पन्न झालेले व उच्चनीच विचार-आचारांपासून झालेले सर्व संस्कार मनावर येऊन आदळतात व त्यावर आपला ठसा कमी-अधिक प्रमाणाने उमटवितात. जे संस्कार वारंवार होतील व जे मनामध्ये कांही कारणाने स्थिर होतील, ते मनाच्या आंतील स्तरांमध्ये जाऊन

( Sub-conscious mind ) अन्तर्मनामध्ये स्थिर होऊन राहतात. भक्ति, प्रेम, आनंद इत्यादि शुभ भावनांमुळे उत्पन्न झालेले संस्कार मनांत स्थिर झाले, तर 'नराचा नारायण' होण्यास सहाय्य होतें. याच्या उलट भीति, क्रूरता, कामविषयक उन्माद इत्यादि हीन विकारांमुळे उत्पन्न झालेले संस्कार जर मनामध्ये शिरले, तर मनुष्य केव्हा केव्हा वेडा बनतो, अथवा त्याची मरण्यापर्यंतहि पाळी येते. यावरून लक्ष्यांत येईल की, घातक संस्कारांपासून मानवांचा बचाव झाला पाहिजे व शुभ संस्कार स्थिर होतील व त्यांचा परिणाम मानवी मनावर अधिक काल टिकेल, असें करणें अत्यंत आवश्यक आहे. धर्मामध्ये जे संस्कार सांगितलेले आहेत, त्यांमुळे हेंच कार्य साधलें जातें. म्हणून धार्मिक संस्कारांकडे दुर्लक्ष्य होतां कामा नये.

## मनाचा मनावर परिणाम.

संस्कारांचा विचार करावयाचा असतांना मनाच्या आणखी एका गुण-धर्माचाहि विचार केला पाहिजे. तो गुणधर्म म्हणजे एकाच्या मनाच्या प्रेरणेचा दुसऱ्याच्या मनावर, मधल्या आवरणांचा प्रतिबंध न होतां, परिणाम होत असतो. संस्कारांच्या परिणामांचा विचार करतांना या मनोधर्माचा विशेष विचार झाला पाहिजे.

कै० सर जगदीश चंद्र बोस यांनी झाडांवर व वनस्पतींवर प्रयोग करून असें ठरवलें आहे की, मनुष्याने आपल्या इच्छाशक्तीने प्रेरणा केली, तर त्या प्रेरणेचा परिणाम झाडांवर होतो. कांही फळझाडांना फळें येत नव्हतीं, त्यांना दररोज असें सांगण्यांत आलें की, 'झाडांनो ! संभाळा. जर तुम्हांला पुढील वर्षी फळें न आलीं, तर तोडून टाकण्यांत येईल.' या सूचनेप्रमाणे झाडांना फळें येऊं लागलीं, असें वनस्पतिशास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. वृक्षाला मन असावें, ही गोष्ट आपल्या धर्मग्रंथांनी मानलेली आहे. मनुष्याची भाषा पशूंना किंवा वृक्षांना समजत नसली, तरी मनुष्याच्या मनाची मानसिक प्रेरणा जशी

वृक्षांना समजते, तशीच ती पशूंनाहि समजते; मग ती मनुष्याला समजेल यांत आश्चर्य काय आहे ?

## मानसिक संदेश.

आजारी मनुष्यास झोप लागली असतां त्या वेळीं त्याच्या हितचिंतक नातलगाने किंवा स्नेह्याने "तूं बरा होत आहेस, भिऊं नकोस, बरा होशील" अशा शुभ विचारांची सूचना, त्याला पोचावी अशा उद्देशाने वारंवार केली, तर ती त्याला पोचते व त्या सूचनेचा परिमाण त्याच्यावर झालेला दिसतो, हा मानसशास्त्रज्ञांचा अनुभव आहे. स्थलाचें केवढेंहि अंतर मध्ये असलें तरी-सुद्धा ही सूचना किंवा ह्व्या त्या विचारांचे संदेश दूरवर पोचूं शकतात, ही गोष्ट आज मानसशास्त्रज्ञांनी सिद्ध केलेली आहे. अशा रीतीने पाठवलेले शुभ संदेश शुभ परिणाम करूं शकतील व अशुभ संदेश अशुभ परिणाम करूं शकतील; पण दोन्ही स्थितींमध्ये एका मनाचा संदेश दुसऱ्याच्या मनावर परिणाम करतो, यांत मात्र कांही संदेह नाही. जर असे मानसिक संदेश अनेकांनी मिळून पाठवले, तर त्यांचें बल अधिक वाढत असल्यामुळे परि-णामाच्या दृष्टीने त्यांचें महत्त्व अधिक आहे.

हा मानसिक संदेशाचा परिणाम जसा समवयस्क मनुष्यांवर होतो, त्याचप्रमाणे तो लहान मुलांवरसुद्धा होऊं शकतो व भाषा समजत नसली तरी-सुद्धा तो होऊं शकतो, हें मुळीच विसरतां नये.

मुलगा आजारी असतांना त्याच्या अंगावरून प्रेमाने व हित व्हावें या हेतूने आईने हात फिरवला असतां त्या मुलास बरें वाटतें; यांतील मूळ कारण आईचा हस्तस्पर्श नसून 'आईच्या मनांतील मुलाचें हित व्हावें, या उद्देशाने निघालेल्या मानसिक लहरी' त्या मुलाच्या मनावर इष्ट परिणाम करीत असतात, हेंच आहे. धार्मिक संस्कार कसे करावे, त्या वेळीं जमलेल्या

लोकांच्या मनामध्ये कसे विचार असावेत, याचा विचार करावयाचा असतांना मनाच्या ह्या गुणाचा आपणांस फार उपयोग होणार आहे.

मनुष्य जें कर्म करतो, त्याचा संस्कार त्यावर दररोज होत जातो. २५-३० वर्षे सतत मनुष्य जें कार्य करीत असेल, त्याच्यावर ते संस्कार स्थिर रूपानें झालेले दिसतात.

आतापर्यंत जो आपण विचार केला, त्यावरून आपण हें पाहिलें की—

( १ ) एकाच्या मनाचा दुसऱ्याच्या मनावर साक्षात् परिणाम होतो; भाषाज्ञानाची अथवा त्याच्या सान्निध्याची गरज नाही.

( २ ) मनुष्याच्या मनोलहरींचे परिणाम पशु-पक्षी-वृक्षांवरहि होतात, तसेच ते लहान मुलांवरही होतात; पण समजूतदार लोकांवर त्यांचीं मनें अनुकूलसंवेदनीय असलीं तरच होऊं शकतात; प्रतिकूलसंवेदनीय असलीं तर होत नाहीत.

( ३ ) विशिष्ट कर्म नित्य करीत गेल्यानेही कांही इष्टानिष्ट संस्कार मनुष्यावर होत असतात.

( ४ ) या सृष्टीमध्ये परस्परांचे संस्कार परस्परांवर घडतच आहेत, ते टाळतां येणें शक्य नाही; म्हणून आपल्या मनाला योग्य वळण लावून, आपण ते होणारे संस्कार आपणांस सहाय्यक कसे होतील, तेवढेंच पहावयाचें आहे.

धार्मिक संस्कारांमध्ये हेंच साधलेलें आहे. तें कसें, हें आता आपणांस पहावयाचें आहे.

## धार्मिक संस्कार किती आहेत ?

**' नराचा नारायण '** होण्यासाठी हे धार्मिक संस्कार केले जातात. गौतम-धर्मसूत्रांत असें म्हटलें आहे—

यस्य ते चत्वारिंशत्संस्कारा अष्टावात्मगुणाश्च
स ब्रह्मणः सायुज्यमाप्नोति ॥ ( गौ० ध० सू० २।८ )

ज्याच्यावर या संस्कारांची संस्कृति होते, तो ब्रह्मसायुज्य प्राप्त करतो, म्हणजे तो नराचा नारायण होतो. हे संस्कार ६४ किंवा ७२ आहेत; पण त्यांत १६ मुख्य आहेत.

याचें कारण इतकेंच की, प्रत्येक संस्कारांतील मुख्य भागावर गौण विधि व खर्चाचे आचार इतके वाढले की, ते करणें लोकांना अशक्य झालें. खर्च फार येऊं लागल्यामुळे व दगदग होईनाशी झाल्यामुळे पुष्कळ संस्कारांना फाटा मिळत गेला. जे १६ संस्कार शिल्लक राहिले आहेत, तेहि सध्या फारसे कोणी करीत नाहीत. त्यांपैकी उपनयन व विवाह हेच दोन संस्कार कांही ठिकाणीं राहिले आहेत. उपनयनामध्येच चौल-संस्कार होतो व समावर्तनही संक्षेपानेच करतात. पण याहि संस्काराला इतकें अतिसंक्षेपरूप देण्यांत आलें आहे की, सध्या एकही संस्कार खऱ्या धर्मपद्धतीप्रमाणे होत नाही, असेंच म्हणावें लागतें.

यावरून लक्ष्यांत येईल की, सध्या अंशतः विवाह-संस्कार राहिलेला आहे; पण तोही, रजिस्टर विवाह करण्याकडे प्रवृत्ति वाढवली जात असल्यामुळे, लवकरच नामशेष होईल कीं काय, अशी साधार भीति वाटूं लागली आहे !

ब्राह्मणांशिवाय इतर जातींत विवाहाशिवाय दुसरा संस्कार राहिलेला नाही. ब्राह्मणांत उपनयन व विवाह व त्यांतच केले जाणारे संक्षिप्त दोन तीन संस्कार, एवढाच काय तो संस्कारांचा अवशेष म्हणून शिल्लक राहिला आहे. ब्राह्मणांप्रमाणेच क्षत्रिय व वैश्य याही प्रमुख जाती, पण त्यांचे संस्कारहि लोपले आहेत व सर्वांनाच शूद्रांच्या पायरीवर आणून बसविण्यांत आलें आहे. ही खरोखर अत्यंत शोचनीय परिस्थिति बनलेली आहे !

## संस्कारांचा विधि.

शुभ दिवशीं इष्टमित्र, हितचिंतक व विद्वान् पुरोहित अशा लोकांस निमंत्रण देऊन, अमूक संस्कार करावयाचा असेल तर त्यास आवश्यक तें सामान जुळवून, योग्य वेळीं संस्कारास प्रारंभ केला जातो. प्रथम स्वस्ति-पुण्याहवाचन, शान्तिमंत्रांचा पाठ, प्रार्थना-मंत्र आदि म्हणून जमलेल्या मंडळींच्या शुभ मंगल कामनेसह तो तो संस्कार दक्ष पुरोहिताकडून करविला जातो. या वेळीं " ज्याचा तो संस्कार करावयाचा त्याचें संस्कारामुळे कल्याण व्हावें, " अशीच शुभ भावना तेथे जमलेल्या सर्व मंडळींच्या मनामध्ये वसत असली पाहिजे. जें कृत्य होत आहे, तें योग्य रीतीने होत आहे व या कृत्याच्या योगाने त्याचें निःसंशय कल्याण होईल, अशी बुद्धि तेथे जमलेल्या सर्व लोकांच्या अंतःकरणांत असली पाहिजे. म्हणजे तेथे जमलेल्या सर्व मनुष्यांच्या सामूहिक व एकवटलेल्या मनःशक्तीचा परिणाम त्या संस्कारित मनुष्याच्या मनावर होऊन संस्काराने इष्ट असें जें घडावयाचें कार्य असेल, तें घडून येईल.

## विरोधी विचारांचा अनिष्ट परिणाम.

जर अशा संस्काराच्या वेळीं कांही लोक म्हणतील की, " अहो ! हें काय थोतांड चालविलें आहे ! हें काय ढोंग माजवलें आहे ! " दुसरे कांही तिसराच विचार करीत असतील व तिसरे कोणी यासंबंधाने उदासीन राहतील व चवथे जर विपरीत भावना मनांत धरतील, तर अशा संस्काराच्या गोंधळापासून कांहीसुद्धा इष्ट फायदा होणें शक्य नाही. उलट कांही विपरीत परिणामही घडणें शक्य आहे; कारण अशा वेळीं एका गटाच्या मनोलहरी दुसऱ्या गटाच्या मनोलहरींनी मारल्या जातात व ज्याच्यावर शुभ संस्कार व्हावयाचे त्याच्या सहाय्यास यापैकी कांही पोचूं शकत नाही. यावरून लक्ष्यांत येईल की, ' **संस्काराच्या वेळीं मारक लहरी उत्पन्न होतां नयेत.** '

जमलेल्या मंडळींच्या मनांत विरोधी भावना असतां नये, उदासीनता असतां नये; तर सर्वांचें मन ' याचें कल्याण होवो, ' याच एका भावनेने भरलेलें असलें पाहिजे. ज्याचा संस्कार व्हावयाचा तो त्या संस्कारांतील तत्त्व समजण्या-इतका प्राज्ञ असो किंवा तो अगदी लहान अज्ञ असो, सामुदायिक शुभ मनोलहरींचा सुपरिणाम त्याच्या मनाला सहाय्यकच होतो, यांत शंका नाही. भाषा न समजली तरी मनांतील प्रेरणांचा परिणाम त्याच्यावर होतोच होतो.

हें मनोधर्माचें तत्त्व जर जनतेस कळेल तर संस्कार करण्याची आवश्य-कताहि लोकांस समजेल व संस्कारांपासून अधिकांत अधिक लाभ कसा करून घ्यावा, हेंहि त्यांस समजेल व तेव्हाच जनता या धार्मिक संस्कारांपासून अधिक लाभ घेऊं शकेल.

आता आपण ३–४ प्रमुख संस्कारांतील मुख्य भावना काय आहेत, तें पाहूं—

## गर्भाधान-संस्कार.

सर्वांत मुख्य संस्कार ' गर्भाधान ' हा आहे. सध्या चांगल्या लोकांचें या संस्काराकडे दुर्लक्ष झालेलें आहे. सध्या हा संस्कार कोणी फारसा करीत नाही. पुष्कळांस हा अनावश्यक आहे, असेंहि वाटतें. पण **मनुष्यजन्माचा पाया या संस्कारामध्ये घातला जात असल्यामुळे याचें महत्त्व फार आहे.** पूर्ण ब्रह्मचर्यपालन झाल्यानंतर, श्रुतिस्मृती व इतर शास्त्रांचें अध्ययन झालें, तत्त्वज्ञान समजलें, हृदयाच्या ग्रंथी उकलल्या, म्हणजे समावर्तन-संस्कार करून, गुरूच्या किंवा गुरुजनांच्या आज्ञेने सुशील, सवर्ण व अनुरूप कन्येचें पाणिग्रहण करून विवाहसंस्कार केल्यानंतर गर्भाधान-संस्कार करण्याचा समय प्राप्त होतो.

बृहदारण्यक उपनिषदामध्ये प्रथम वैदिक तत्त्वज्ञान सांगून झाल्यानंतर,

तें शिष्याला नीट समजलें असें समजून शेवटीं सुप्रजा कशी निर्माण करावी, तें सांगितलें आहे. आईबापांना मुलगा पाहिजे कीं मुलगी पाहिजे ? ती विदुषी पाहिजे कीं शूरवीर पाहिजे ? संतति सभाधीट पाहिजे कीं रणवीर पाहिजे ? दीर्घायु पाहिजे कीं बलवान् पाहिजे ? जशी पाहिजे तशी संतति हटकून उत्पन्न करण्यासाठी काय केलें पाहिजे ? त्यांनी खावें काय, प्यावें काय, त्यांनी विचार कसे मनांत धारण करावे व कसें आचरण करावें, यासंबंधींची संक्षिप्त माहिती तेथे दिलेली आहे.

## प्रजायै गृहमेधिनाम् ।

आपल्या राष्ट्रांतील पुढील पिढी हवी असेल तशी उत्पन्न व्हावी, यासाठीं व जशी हवी असेल तशी ती निर्माण करण्यासाठी गर्भाधान-संस्कारांत आवश्यक त्या सूचना मिळत असतात.

प्रजा ही जशी होईल तशी होऊं द्यावी, असें स्वैर वागावयास धर्म सांगत नाही. ' आपण भावी पिढी जशी जरूर असेल, तशी निर्माण करूं शकतों, ' हें तत्त्व या संस्काराच्या बुडाशी आहे. आपल्या वागणुकीने व प्रार्थनांनी ईश्वराचें व देवतांचें सहाय्य मिळून विशिष्ट प्रकारची सुप्रजाच आपण निर्माण करूं शकतों, ही या संस्कारांतील मुख्य शिकवण आहे.

अदिती व कश्यप यांनी राष्ट्रोद्धारक ' गणेश ' नामक दिग्विजयी पुत्र उत्पन्न केला, शंकरपार्वतींनी गणेशाला असा जन्म दिला व द्रुपद राजाने प्रथम प्रतिज्ञा करून जसा हवा तसा धृष्टद्युम्न नामक महारथी समरजेता पुत्र व राजकारणचतुर विदुषी द्रौपदी यांना जन्म दिला. इतिहास व पुराणांमध्ये अशीं अनेक उदाहरणें आहेत, तीं सर्वांस माहीत आहेत. एकाला जें साध्य झालें, तें शास्त्रीय पद्धतीचा अवलंब करून दुसऱ्यांसहि साध्य होईल. फक्त त्यासाठीं आवश्यक नियमांचें पालन करून गर्भाधानसमयींच्या पावित्र्याकडे दुर्लक्ष करतां कामा नये.

या गर्भाधानाच्या वेळीं व त्याच्या पूर्वी आईबापांच्या मनांत जे विचार उत्कटतेने वास करतील, ते संततीमध्ये उतरतील, यांत शंका नाही. ( पहा, सुश्रुत शारीर २ )

एकाच मनुष्याला रंगेलपणामध्ये झालेला मुलगा व त्यागी जीवन सुरू झाल्यानंतर उत्पन्न झालेला मुलगा, यांमध्ये ते ते गुण कमी-अधिकपणाने उतरले आहेत, असें दिसून येतें. आईबापामध्ये जितकी गुणांची तीव्रता अधिक तितकी मुलामध्ये आली पाहिजे. जर गर्भधारणेच्या समयीं दोघांचीहि आतुरता सारखी असेल, तर हवी असेल तशीच संतति उत्पन्न होईल; पण त्या वेळीं मनुष्य विकारवश झाला तर त्यामुळे सर्व गुण जितके उतरावे तितके उतरत नाहीत.

या विवेचनावरून सर्वांच्या लक्ष्यांत येईल की, गर्भाधान-संस्कार हा फारच महत्त्वाचा संस्कार आहे व या दिशेने उचित प्रयत्न केला तर आपणांस कांहीतरी भावी पिढीच्या उपजत गुणांचें मूल्य खात्रीने वाढवतां येईल.

## उपनयन-संस्कार.

आता आपण उपनयन-संस्काराचा थोडासा विचार करूं. 'उपनयन' म्हणजे 'गुरूच्या जवळ नेणें,' 'ईश्वराच्या किंवा ब्रह्मविद्येच्या सान्निध्यांत नेणें.' हे अर्थ उपनयनाचे प्रसिद्ध आहेत. पण उपनयनाचा खरा अर्थ 'तरुणास उपनेत्र देणें' असा आहे. सर्वसाधारण मनुष्यांस जितकें दिसतें, त्यापेक्षा दुर्बीण लावणारांस नवेंच जग दिसतें. त्याचप्रमाणे गुरूने ज्याला विद्या-दान करून दिव्य दृष्टि दिली, त्यास नवीनच दृष्टि आल्यामुळे जगाचा व विश्वाचा विलक्षण अनुभवहि त्यास येणें शक्य आहे. उपनयन करून तरुणांची दृष्टि अशीच सुधारावयाची असते.

गर्भाधान-संस्काराने पुढील पिढीच्या उपजत बुद्धीचा पाया नीट घातला व उपनयनाने जर तरुणांस दिव्य दृष्टि दिली, किंवा विश्वाकडे पाहण्याची

नवीन दृष्टि दिली, तर एकाच पिढींत राष्ट्राची काया पालटली आहे, असा अनुभव आपणांस पहावयास सापडेल.

या उपनयन-संस्कारांत मेखलाधारण व दण्डधारण हे उपसंस्कार केले जातात. यांकडे फारसें कोणाचें लक्ष्य जात नाही, पण उपनयन-संस्कारांतील प्रत्येक विधि विचार करून पाहण्यासारखा आहे.

उपनयन-संस्कारामध्ये बालकाला गुरूजवळ नेऊन त्यास गुरूच्या स्वाधीन करावयाचा असतो. या वेळीं बालक हा आईबापांचा संबंध तोडून गुरूशीं संबंध जोडीत असतो. 'तच्छ्रेष्ठं जन्म' असें या नव्या जन्मासंबंधानें शास्त्रकारांनी म्हटलेलें आहे. या वेळीं या बटूचा आचार्य हा पिता असून सावित्री-विद्या ही माता होते. या मातेच्या उदरांत हा १२ किंवा २४ वर्षे राहून जेव्हा बाहेर येतो, तेव्हा त्याचें तेज चहूंकडे फाकूं लागतें.

उपनयनाच्या वेळीं त्याला यज्ञोपवीत देण्यांत येतें. यज्ञाचा भार या बटूच्या खांद्यावर या वेळीं ठेवला जातो. तो शेवटपर्यंत टिकणारा भार आहे.

पुढे मेखलाधारणाचा विधि आहे. मेखला-धारण म्हणजे कमरेला विशिष्ट पट्टा बांधणें होय. याचा मंत्र पहा—

## मेखला-धारण.

इयं दुरुक्तात्परिबाधमाना वर्णं पवित्रं पुनती म आगात् ।
प्राणापानाभ्यां बलमादधाना स्वसा देवी सुभगा मेखलेयम् ।
ऋतस्य गोप्त्री तपसः परस्वी घ्नती रक्षः सहमाना अरातीः ।
सा नः समन्तमनुपरेहि भद्रया भर्तारस्ते मेखले मा रिषेम ॥

( गृ० सू० परि० अ० १।२१ )

मेखला ही (१) दुष्ट भाषणाचें निवारण करते, (२) पवित्र वर्णाचें रक्षण करते, (३) बल वाढवते, (४) सत्याचें संरक्षण करते,

( ५ ) दुष्टांचा नाश करते, ( ६ ) शत्रूंना पराभूत करते, अशी ही मेखला आहे. अशी मेखला धारण करणारे कधीहि नाश पावणार नाहीत.

पण सध्या उपनयन-संस्काराच्या वेळीं क्षणभर मेखला बांधतात; पण पुढे सोडून टाकतात. यामुळे ढिलेपणा मात्र वाढला आहे !

## दण्ड-धारण.

यापुढे दण्डधारणाचा विधि असतो. याचा मंत्र पाहण्यासारखा आहे-

अदान्तं दमयित्वा मां मार्गे संस्थापयन्स्त्वयम् ।
दण्डः करे स्थितो यस्मात्तस्माद्रक्ष यतो भयम् ॥

दण्ड हा उन्मत्तांचा उन्माद शमन करून त्यांस नीट मार्गाने चालवयास लावतो व निर्भयता उत्पन्न करतो. असा हा दण्डधारणाचा प्रताप आहे. पण हा ज्या पद्धतीने हातांत धरावयाचा, त्याच पद्धतीने तो धारण केला पाहिजे. मौंजी-बंधनाच्या वेळींच तेवढा दंड धारण करून इष्ट कार्य होणार नाही. दंड हा उपनयनानंतर सतत धारण केला पाहिजे व तो वापरतांहि आला पाहिजे; म्हणजे एक दंडधारी तेजस्वी ब्रह्मचारी शंभर शत्रूंस भारी होईल; पण असा कोण बरें दण्ड धारण करूं शकतो आहे ?

मेखला राक्षसांचा नाश करणारी व दंड हा उन्मत्तांचा उन्माद शमविणारा आहे; पण यांचा आपणास आज उपयोग होत आहे काय ? मेखला एक दिवस कमरेस बांधली व एके दिवशीं दण्ड हातांत धरला म्हणजे शत्रु दूर होतील व उन्मत्त नरम होतील, असें जर कोणी समजत असेल तर ती चूक आहे.

उपनयन, मेखलाधारण, दण्डधारण हे संस्कार राष्ट्रीय स्वयंसेवकदलांत भरती करण्याचे संस्कार आहेत. संघनायकाकडे कुमाराला घेऊन जाणें, त्याला संघवेष देणें व कमर बांधून लाठी चालवण्यास सांगणें, हे प्रकार पूर्वी धर्म-

विधीनें या उपनयन-संस्कारांत होत असत.

## त्रैवर्णिकांचें उपनयन.

उपनयन हें ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्यांचें म्हणजे या तीनही वर्णांच्या मुलांचें धर्मानें विहित आहे. सध्या केवळ ब्राह्मण-कुमारांचेंच उपनयन केलें जातें. क्षत्रिय-वैश्य-कुमारांचें उपनयन शतकानुशतकें बंद झालेलें आहे ! त्यांना दण्ड-धारण व मेखला-धारण म्हणजे काय, हेंसुद्धा माहीत नाही. स्वसंरक्षण करण्यास सज्ज होण्याचे संस्कारच राष्ट्रांतील मुख्य घटकांचे नाहीसे झालेले आहेत !!!

याप्रमाणे संस्कारांचें कार्य धार्मिकांवर आपल्या संस्कृतीचा छाप मारून त्यांची संघटना वाढवणें व त्यांच्यांत आपलेपणा उत्पन्न करून त्यांचा विस्कळीत-पणा नाहीसा करणें, हें आहे. धार्मिकांची एकजूट करण्यासाठी संस्कारांची फारच आवश्यकता आहे. म्हणून धार्मिक लोकांनी संस्कारांकडे दुर्लक्ष्य करतां कामा नये. तसेंच केवळ रूढि म्हणून संस्कार न करतां संस्काराच्या वेळीं संस्कारांतील सर्व विधींमधील शास्त्रीय तत्त्व तेथील जमलेल्या इष्टमित्र-मंडळीस समजेल, अशी कांही तरी व्यवस्था केली पाहिजे.

सध्या ज्या रीतीनें संस्कार केले जातात, ती पद्धति अगदीच अयोग्य आहे. कोणत्या विधीमध्ये कोणतें तत्त्व भरलेलें आहे, हें पुष्कळांस कळेनासें झालेलें आहे; त्यामुळे जिवंत असलेले संस्कारहि मृतवत् झाल्यासारखे झाले आहेत. यासाठी या बाबतींत आवश्यक ती सुधारणा करून संस्कार यथासांग करण्याची पद्धति अंमलांत येईल, असें करणें, हें सर्व धार्मिकांचें कर्तव्य आहे.



# अत्रि ऋषींचा कारागृहवास

कारागृहवास हा फार वाईट आहे हें खरें; पण पुष्कळ वेळां थोरथोर अशा सत्पुरुषांनासुद्धा तो आनंदाने पत्करावा लागल्याचीं उदाहरणें इतिहासांत कांही थोडीं नाहीत. विशिष्ट सुधारणा घडवून आणण्यासाठी जेव्हा थोर महात्मे प्रयत्न करतात, तेव्हा त्यांच्या विरुद्ध जे लोक असतात, ते त्यांचा विरोध करतात व अनेक प्रकारें छळही करतात; व जर का त्या विरोधी लोकांजवळ अधिकार असले, तर सुधारणा घडवून आणणाऱ्या थोर सत्पुरुषांना कारागृहवासासारखीं कठोर दुःखें सहन करावीं लागतात.

तुरुंगामध्ये वर लिहिलेल्या प्रकारचे सत्पुरुषही जातात व दुष्ट दुर्जनही जातात; पण सत्पुरुषांच्या व दुर्जनांच्या बंदिवासामध्ये फारच फरक आहे. शत्रूकडून सज्जनांना प्रतिबंध झाल्याने स्वातंत्र्याचा उदय होतो, उन्नतीचीं बीजें अंकुरित होतात, ज्ञानाचे प्रवाह वाहूं लागतात, नवीन तत्त्वज्ञानाचे स्रोत स्फुरतात व एकंदरीने जनतेचें हितच होतें. तसेंच जर का तेच

सज्जन तुरुंगाच्या बाहेर राहिले, तरीही ते तेंच आपलें जागृतीचें काम चालू ठेवतात. कारण सज्जन हे आपल्या स्वातंत्र्याच्या किंवा पारतंत्र्याच्या कालामध्ये जगदुद्धाराचेंच प्रशंसनीय कार्य करीत राहतात. तात्पर्य, सत्पुरुष हे परोपकार केल्याबद्दल तुरुंगांत जातात व दुर्जन हे स्वार्थासाठी परघात केल्याकारणाने तुरुंगांत जातात. यासाठी पहिल्यांची प्रशंसा व दुसऱ्यांची निंदा होत आली आहे व ती योग्यच आहे.

प्राचीन काळीं वसुदेव व देवकी यांना कंस राजाने तुरुंगांत टाकलें होतें. असें करण्यामध्ये कंस राजाचा जो स्वार्थ होता, तो कांही शेवटीं साधला नाही व तुरुंगामध्येच वसुदेव–देवकीच्या पोटीं भगवान् श्रीकृष्णासारखा लोकोत्तर पुरुषार्थी योगेश्वर जन्माला आला व त्याने केवळ कंस राजाचाच नव्हे तर तत्सम अन्य दुष्ट राजांचा व महाराजांचा नाश करून देशाला सुखी व स्वतंत्र केलें आणि भगवद्गीतेच्या उपदेशाने सर्व जगाला सन्मार्ग दाखवून दिला. भगवान् श्रीकृष्णासारखे लोकोत्तर पुरुष आपल्या जन्मानें ज्या स्थानाला पवित्र करतात, तें तुरुंगाचें स्थान वाईट, असें कोण म्हणेल? सत्पुरुषांना तें कांही वाईट नाही, सत्पुरुषांना तें प्रतिबंधकही होऊं शकत नाही; इतकेंच नव्हे, तर तुरुंगवासाच्या तपाने श्रेष्ठ पुरुषांचें तेज अधिकच वाढतें व ते कसोटीस उतरल्यामुळे त्यांचें यश अधिकच पसरतें. तुरुंग ही एक कसोटी आहे व जे त्या कसोटीस उतरतात ते बहुमूल्य बनतात, असें आजपर्यंतचा इतिहास सांगत आला आहे. आजपर्यंत अनेक ऋषिमुनि, साधुसंत, श्रेष्ठ सज्जन व परोपकारी सत्यव्रत महात्मे या तुरुंगवासामध्ये राहून, सार्वजनिक हिताचीं कामें करून अमर झालेले आहेत. अशा लोकांतील "अत्रि ऋषीच्या कारागृहवासाची कथा" फारच बोधप्रद आहे.

सर्व ग्रंथांमध्ये ऋग्वेद हें अत्यंत प्राचीन पुस्तक आहे. तेव्हा त्यामध्ये ही अत्रि ऋषीच्या कारागृहवासाची कथा आलेली असल्यामुळे ती अत्यंत

प्राचीन आहे, यांत शंका नाही. ऋग्वेदाच्या ज्या मंत्रामध्ये ही कथा किंवा या कथेचा उल्लेख आलेला आहे, त्यामध्ये ही कथा प्राचीन कालीं झाली असल्याचें लिहिलें आहे. तेव्हा ह्या कथेचा प्राचीनपणा अत्यंत आहे, यांत शंका नाही. अशा प्राचीन काळचा इतिहास कित्येक दृष्टींनी अत्यंत बोधप्रद होणें शक्य असल्यामुळे, या कथेकडे ऐतिहासिक लोकांनीही विशेष लक्ष द्यावें, असें येथे सुचवितों.

अत्रि ऋषीला तुरुंगवास भोगावा लागला, त्याची चळवळ कोणत्या कारणासाठी होती, त्याच्याविरुद्ध कोणते लोक काय काम करीत होते, त्याला तुरुंगामध्ये कसें वागवलें जात होतें, पुढे त्याची सुटका कशी व कोणी केली व शेवटीं या चळवळीचा परिणाम जनतेवर काय झाला, हे प्रश्न सांगोपांग सोडवण्याइतका पुरावा अजूनपर्यंत मिळालेला नाही. तथापि जो पुरावा मिळाला आहे, यावरून तत्कालीन परिस्थितीचें बरेंच अनुमान होणें शक्य आहे: यासाठी हा पुरावा वाचकांपुढे ठेवण्याचें योजिलें आहे. करितां याचा विचार सर्वांनी करावा, अशी विनंती करून मी प्रस्तुत विषयाकडे वळतों.

अत्रि ऋषीच्या कारागृहाची कल्पना देणारा जो विशेष महत्त्वाचा मंत्र आहे, तो हा आहे—

**ऋषिं नरावंहसः पाञ्चजन्यमृबीसादत्रिं मुञ्चथो गणेन ॥**
**मिनन्ता दस्योरशिवस्य माया अनुपूर्वं वृषणा चोदयन्ता ॥**
**(ऋ० १।११७।३)**

**सायणभाष्य—** हे नरौ नैतारौ !...पांचजन्यं । निषादपंचमाश्चत्वारो वर्णाः पंचजनाः । तेषु भवं । ... अत्रिः सर्वेषां हिताचरणात्तत्रभव इत्युच्यते । तादृशं ऋषिं अंहसः पापरूपादृबीसात् शतद्वारे यंत्रगृहेऽत्रेः पीडार्थं असुरैः प्रक्षिप्तात्तुषाग्नेः सकाशाद् गणेन ...सह मुञ्चथः ॥

**अर्थ—** हे ( वृषणौ नरौ ) बलवान् नरांनो ! तुम्ही ( अ-शिवस्य दस्योः मायाः मिनंतौ ) अशुभ शत्रूंची कुटिल नीति दूर झुगारून देऊन व त्या अशुभ शत्रूंना ( अनु-पूर्वं चोदयंतौ ) यथाक्रम हाकून घालून ( पांच-जन्यं अत्रिं ऋषिं ) पंचजनाचें हित करणाऱ्या अत्रि ऋषीला ( गणेन ) त्याच्या अनुयायांसहवर्तमान ( अंहसः ऋबीसात् ) कष्टदायक तुरुंगवासांतून ( मुंचथः ) मुक्त केलें !

सायणभाष्याच्या आधाराने कांही शब्दांचा जो भाव व्यक्त होत आहे, त्यावरून पुढील अनुमानें व्यक्त होत आहेत —

( १ ) ( पंचजनेषु भवः पांचजन्यः । सर्वेषां हिताचरणात्तत्रभवः ) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य शूद्र, व निषाद यांना पंचजन म्हणतात. या पंचजनांमध्ये अत्रि ऋषि जन्मास आले होते व ते त्या सर्वांच्या हितासाठी चळवळ करीत होते, म्हणून अत्रीला "पांच-जन्य" असें म्हणतात.

( २ ) या अत्रि ऋषीला बरेच अनुयायी होते व तेही अत्रीला सार्व-जनिक हिताची चळवळ चालविण्यास मदत करीत होते.

( ३ ) यासाठी 'अशिव दस्यू' नी अत्रि ऋषीला सर्व अनुयायांसह कैदेंत टाकलें होतें.

( ४ ) ज्या तुरुंगांत अत्रीला अनुयायांसह ठेवलें होतें, त्याला शंभर दरवाजे ( शतद्वारे पीडायंत्रगृहे ) होते व शंभर कुलुपांत त्याला कोंडलेलें होतें व त्याला अधिक त्रास व्हावा म्हणून त्याच्या कोठडीच्या बाहेर भुसाचा अग्नि पेटविला होता.

( ५ ) ज्या अर्थी अत्रीला "अशुभ शत्रूं"नी तुरुंगांत टाकलें होतें, त्या अर्थी अशुभ शत्रूंचें राज्य होतें किंवा त्यांच्या

अनुरोधाने राज्य-शासन चालत होतें व ऋषींचा प्रवेश राज्यशासनामध्ये झाला नव्हता किंवा ऋषींच्या इच्छेप्रमाणे राज्यशासन चालत नव्हतें, असें स्पष्ट म्हणावें लागतें. तात्पर्य, अत्रि ऋषि हे प्रजापक्षाचे अग्रणी होते व ' अशिव दस्यु ' राजपक्षाचे अंश होते, हें उघड आहे. तसेंच पंचजनांवर अशुभ शत्रूंचें राज्य होतें व तें राज्यशासन पंचजनांच्या हिताला कारणीभूत होत नव्हतें, म्हणूनच अत्रीला चळवळ करणें आवश्यक झालें असावें.

( ६ ) अत्रि ऋषीच्या सर्वजनहितकारक चळवळीने अशुभ दस्यूंचें शासन डळमळूं लागलें असावें व एवढ्यासाठी त्यांनी त्या अत्रीला कैदेंत टाकलें असावें.

( ७ ) अशुभ दस्यु हे कोण होते, हें जरी कळण्यास कांही मार्ग नसला, तरी ते राज्य चालवणारे होते व त्यांची ( माया ) कुटिल राजनीति होती, यांत शंका नाही. कुटिल नीतीने राज्य चालवण्यांत अशुभ दस्यूंचा लाभ असावा व या कुटिल नीतीचा प्रतिकार करण्यांत अत्रि-पक्षाचा लाभ असावा. असें नसतें तर परस्परांचें युद्ध झालेंच नसतें व अत्रीला तुरुंगवासही भोगावा लागला नसता.

( ८ ) नंतर अशिव दस्यूंची कुटिल नीति ओळखून नेत्यांनी दस्यूंना हाकून दिलें व अत्रीला अनुयायांसह बंधमुक्त केलें.

इतका भावार्थ वरील मंत्राच्या शब्दांत आलेला आहे. वरील आठ अनुमानांमध्ये ज्या गोष्टी भाष्याच्या अनुरोधाने घेतल्या आहेत, त्या इतर ठिकाणच्या मंत्रांमध्ये आलेल्या आहेत. तेव्हा त्या जमेस धरल्या असतां वरील अनुमानें निघतात, यांत शंका नाही. राजशासकांचा पक्ष व प्रजापक्ष

यांतील विरोध हा इतका प्राचीन काळींही दिसून येत होता व त्यामुळे अत्रीसारख्याला सुद्धा तुरुंगवासाचीं दुःखें भोगावीं लागत असत, हेंही यावरूनच सिद्ध होत आहे. या ठिकाणीं आपला पुढचा विचार नीट रीतीने होण्यासाठी ऋषींचो चळवळ कोणत्या स्वरूपाची होती, हेंही पाहिलें पाहिजे. त्यासाठी पुढील मंत्र पहा—

भद्रमिच्छन्त ऋषयः स्वर्विदस्तपो दीक्षामुपसेदुरग्रे ।
ततो राष्ट्रं बलमोजश्च जातं तदस्मै देवा उपसंनमन्तु ॥
( अथर्व० १९।४१।१ )

"(भद्रं इच्छन्तः स्वर्विदः ऋषयः ) लोककल्याणाची इच्छा करणाऱ्या आत्मज्ञानी ऋषींनी ( अग्रे ) प्रारंभीं तप केलें व दीक्षा घेतली. त्यामुळे राष्ट्र, बल व ओज यांची उत्पत्ति झाली. म्हणूनच त्यांच्यासमोर देवांनीही नम्र असावें."

" Desiring bliss, at first, light-finding Rishis began religious rite and holy fervour. Thence energy was born and might and kingship. "
( ग्रिफिथ, अथर्व, १९।४१।१)

याचा अर्थ जवळ जवळ वर दिल्याप्रमाणेच आहे. ऋषीच्या तपस्येपासून व दीक्षा घेण्यापासून ' राष्ट्र, बल व ओज ' ही त्रयी उत्पन्न झाली. ज्या तपापासून राष्ट्रीयत्वाची कल्पना जागृत होऊन ती परिपुष्ट होते, अशा प्रकारचें कोणतें तरी तप या ऋषींचें होतें, यांत कांही शंका नाही. सध्या तप म्हणजे धूम्रपान, पंचाग्निसाधन वगैरे समजलें जातें; त्याहून कदाचित् ह्या प्राचीन ऋषींचें तप अगदीच निराळें असूं शकेल; कारण ह्या सध्याच्या तपामुळे राष्ट्रीयतेची भावना जागृत होत असल्याचा अनुभव नाही. असो. याचें तात्पर्य इतकेंच की, त्यांच्या चळवळीमुळे राष्ट्रीयता जागृत होत होती

व तीमुळे दस्युराजे ऋषींनासुद्धा बंदिवासांत कोंडून टाकणें आवश्यक समजत होते, ही गोष्ट कांही खोटी नव्हे.

ऋषींच्या चळवळीची दिशा समजण्यासाठी ' भद्रं इच्छन्तः ' हे शब्द फार महत्त्वाचे आहेत. या शब्दांचें श्री० ग्रिफिथ साहेबांचें Desiring bliss हे भाषांतर ठीक नसून desiring betterment अर्थात् "जनतेची असलेली स्थिति सुधारून अधिक चांगली करणें" हा "भद्र" ( Better ) शब्दामध्ये भाव आहे. यालाच "कल्याण" असें म्हणतात. यासाठीच ऋषींची चळवळ असे. त्याची जी दीक्षा होत असे व ते जें तप करीत असत, तें यासाठीच होय. तात्पर्य, त्यांच्या चळवळीचा मुख्य लक्ष्यबिंदु जनतेची स्थिति सुधारणें हा होता, यांत शंका नाही.

त्यांच्या चळवळीचें सामान्य स्वरूप याप्रमाणे आहे. या ऋषिस्वभावाच्या अनुरूपच अत्री हे जनतेचें हित करण्यासाठी आपली चळवळ करीत होते व त्यामुळे त्यांचा अशुभ दस्यूंबरोबर विरोध होत होता व त्याच कारणासाठी त्यांना तुरुंगांत घातलें गेलें होतें. याप्रमाणे अत्रीच्या तुरुंगवासाचें कारण आपणास समजलें. आता येथे आपणास एक गोष्ट अवश्य पाहिली पाहिजे, ती ही की, आत्मज्ञानी ऋषि असल्या भानगडींत कां पडत असत ? आत्मज्ञानी मनुष्य निरिच्छ होऊन स्वस्वरूपीं लीन व्हावा; पण तें येथे दिसत नसून तोच राष्ट्रीय चळवळीचें युद्ध चालवीत आहे, हें कसें ? याचा येथे विचार केला पाहिजे. पूर्वीच्या आत्मज्ञानाच्या ग्रंथांचा विचार केला असतां असें स्पष्ट दिसून येतें की, आत्मज्ञानानंतर युद्ध झालेलें आहे.

## आत्मज्ञान व युद्ध.

योगीश्वर श्रीकृष्णाने अर्जुनाला श्रीमद्भगवद्गीतारूप आत्मज्ञानाचा उपदेश केला व नंतर त्याच्याकडून युद्ध करविलें. येथे आत्मज्ञानानंतर युद्ध झालेलें आहे. दुसरा प्रसंग, श्रीरामचंद्राला वसिष्ठमहर्षींनी आत्मज्ञानाचा उपदेश केला,

हा आहे व त्यानंतर श्रीरामचंद्राने राक्षसांचा पाडाव करून भारतमातेचें संरक्षण केलें. या वेळींही आत्मज्ञानापूर्वी युद्धापासून पराङ्मुख होण्याची प्रवृत्ति व आत्मज्ञान झाल्यानंतर युद्ध करण्याची प्रवृत्ति स्पष्ट दिसत आहे.

अथर्ववेदामध्ये जो सूक्तांचा क्रम आहे, तोही हीच गोष्ट दाखवीत आहे. अथर्ववेद कांड ११, सूक्त ४ ते ८ पर्यंत क्रमाने प्राण, ब्रह्मचर्य, काल, ब्रह्म व आत्मा यांचें वर्णन आहे; तत्पश्चात् सूक्त ९ व १० मध्ये युद्धनीतीचा उपदेश आहे. तात्पर्य, प्रथमतः आत्मज्ञान देणारीं सूक्तें सांगून नंतर युद्धाचा उपदेश सांगितला आहे. हा क्रमही पूर्वीच्या प्रसंगाला अनुरूपच आहे. यावरून उघड दिसते की, प्रथम "आत्म-ज्ञान" व नंतर "आत्मसंरक्षणासाठीं किंवा सत्पक्षवर्धनासाठीं युद्ध" होणे, हाच निसर्गाचा नियम आहे. आपल्या शक्तीची ओळख झाल्यावाचून स्वसंरक्षणासाठी युद्ध होणेंच शक्य नाही. असो. या नियमाप्रमाणे आत्मज्ञानी ऋषि आत्मज्ञान झाल्यामुळेच सर्व जनतेची उन्नति करण्यासाठी विरोधी पक्षावरोबर "तपोमय युद्ध" करीत असत, हें "ब्राह्म-युद्ध" होय. हे तपोमय युद्ध करणारे घातपात करणारे नसत, तर ते शांतिपूर्ण युद्ध करीत. स्वतः दुःख भोगावें, आपण परपक्षाचा घात करूं नये; शत्रूंनी आपला घात केला तर आपण मरेपर्यंत सहन करावा व कांही झालें तरी आपल्या पक्षाकडून घातपात होऊं देऊं नये, हें या तपोमय ब्राह्मयुद्धाचें मुख्य लक्षण होतें. याशिवाय दुसरें "क्षात्रयुद्ध" असे. यामध्ये दोनही बाजूंचे वीर एकमेकांचा घात करण्यास प्रवृत्त होत. असलें क्षात्रयुद्ध ब्राह्मण किंवा ऋषि स्वतः करीत नसत; पण वेळ प्रसंग आला तर दुसऱ्याकडून करवीत, पण ते स्वतः जें युद्ध करीत तें तपोमय ब्राह्मयुद्ध होतें.

विश्वामित्राने आपल्या सर्व सेनासमुद्रासह वसिष्ठाच्या आश्रमावर स्वारी केली असतां वसिष्ठ ऋषींनी क्षमा व शांति याच दोन ब्रह्मास्त्रांनी त्याचा प्रतिकार केला व त्यायोगाने क्षात्रबलापेक्षा ब्राह्मबल अधिक श्रेष्ठ

आहे, असें विश्वामित्राच्या नजरेस आणून दिलें ! तेव्हा विश्वामित्र म्हणाला की "धिग्बलं क्षत्रबलं ब्रह्मतेजोबलं बलं !" यापुढे जेव्हा विश्वामित्र क्षात्रधर्म सोडून ब्राह्मधर्मामध्ये प्रविष्ट झाला, तेव्हा राक्षसांचा उपद्रव झाला असतांही, त्याने केव्हाही क्षात्रधर्माचा स्वतः आश्रय केला नाही. याप्रमाणे हें ब्राह्मयुद्ध ऋषींकडून होत असे. हें शस्त्रहीन युद्ध असून तें आत्मशक्तीचें पाशवी शक्तीबरोबर होत आलेलें आहे. अशाच प्रकारचें ब्राह्मयुद्ध अत्रीकडून चालवलें जात होतें व ज्या दस्युराजाबरोबर त्यांचें युद्ध होतें, तो अत्याचार करणारा होता व त्या स्वभावाला अनुसरूनच त्याने सर्वजनहितकर्त्या अत्रीला तुरुंगामध्ये घातलें होतें. या कारागृहामध्ये अत्रीला कसें वागवलें जात होतें, याची कल्पना पुढील मंत्रावरून होण्यासारखी आहे, म्हणून तो मंत्र आता पाहूं—

हिमेनाग्निं घ्रंसमवारयेथां पितुमतीमूर्जमस्मा अधत्तम् ।
ऋबीसे अत्रिमश्विनावनीतमुन्निन्यथुः सर्वगणं स्वस्ति ॥
(ऋ० १।११६।८)

सायण-भाष्य- "अत्रेयमाख्यायिका । अत्रिं ऋषिं असुराः शतद्वारे पीडायंत्रगृहे प्रवेश्य तुषाग्निनाऽबाधिषत ... अश्विनौ अग्निं उदकेन उपशमय्य तस्मात्पीडागृहाद् अविकलेंद्रियवर्गं संतं निरगमयतामिति ...हिमेन...उदकेन घ्रंसं दीप्यमानं अत्रेर्बाधनार्थं असुरैः प्रक्षिप्तं तुषाग्निमवारयेथाम् । अपि च अस्मै असुरपीडया कार्श्यं प्राप्ताय अत्रये पितुमतीं अन्नयुक्तं ऊर्जं बलप्रदं रसात्मकं क्षीरादिकमधत्तं । पुष्ट्यर्थं प्रायच्छन्तं। ऋबीसे अपगतप्रकाशे पीडायंत्रगृहेऽवनीतं अवाङ्मुखतया असुरैः प्रापितं अत्रिं सर्वगणं ... स्वस्ति अविनाशो यथा भवति तथा उन्निन्यतुः । तस्माद् गृहादुद्गमय्य युवां स्वगृहं प्रापितवंतौ ॥ "

या मंत्राविषयी अशी आख्यायिका आहे की "असुरांनी अत्रीला शंभर दरवाजे असलेल्या तुरुंगांत घालून त्याभोवती भुसाचा विस्तव पेटवून

दिला होता. अश्विदेवांनी पाण्याच्या योगाने त्या अग्नीला शांत केलें व त्या तुरुंगांतून अत्रीला सुरक्षितपणाने बाहेर काढलें." ही गोष्ट या मंत्रांत आहे. आता या कथेच्या अनुरोधाने याचा अर्थ पहा—

"( **हिमेन घ्रंसं अग्निं अवारयेथां** ) पाण्याने त्या प्रदीप्त अग्नीला शांत केलें व ( **अस्मै** ) या अत्रि ऋषीला, असुरांनी दिलेल्या पीडेने अत्यंत कृश झालेल्या या ऋषीला ( **पितु-मतीं ऊर्जं अधत्तं** ) अन्नयुक्त बलवर्धक रस दिले. ( **ऋबीसे अवनीतं अत्रिं** ) तुरुंगांत खाली तोंड करून ठेवलेल्या अत्रि ऋषीला ( **अश्विनौ सर्वगणं स्वस्ति उन्निन्यतुः** ) अश्विदेवांनी सर्व अनुयायां-सहवर्तमान उत्तम प्रकारें वर काढलें व बंधमुक्त केलें."

या मंत्राचा विचार केला असतां पुढील गोष्टी स्पष्टपणाने दिसतात—

( १ ) असुरांनी ज्या रीतीने अत्रि ऋषिला तुरुंगांत वागविलें होतें, त्या रीतीमुळे अत्री अत्यंत कृश झालेले होते. पुढे त्यांना बंध-मुक्त केल्यानंतर अश्विनीकुमारांनी किंवा वैद्यांनी अत्रीला उचित उपचार व योग्य अन्न देऊन त्यांचें शरीर सुधारलें. अर्थात् त्यांची तुरुंगामध्ये बरीच हालअपेष्टा झाली असली पाहिजे.

( २ ) सायणाचार्य म्हणतात की, ( **अव-नीतं** ) अत्रीला तुरुंगामध्ये अवाङ्मुख ठेविलें होतें, किंवा निदान त्यांना इतक्या संकुचित जागेंत ठेवलें असावें की, त्यांना तेथे सरळ होतां येत नसावें.

( ३ ) ज्या जागेंत अत्रीला कोंडलें होतें, तेथे अंधेर होता; प्रकाश येण्याची कांही एक सोय नव्हती. प्रकाश हा जीवनाचा आधार असून तो नसल्यामुळे त्यांना बराच त्रास झाला असला पाहिजे.

(४) ज्या अर्थी अत्रि ऋषीसारख्या चळवळीच्या मुख्य पुरस्कर्त्यांचे असे हाल होत होते, त्या अर्थी त्याच्या अनुयायांची काय अवस्था होत होती, याची सहजच कल्पना करतां येण्यासारखी आहे. अत्रीबरोबर त्याचे अनेक अनुयायी तुरुंगांत खिचपत पडले होते, याविषयी वरील मंत्रांत स्पष्ट सांगितलें आहे.

हें तुरुंगाचें वर्णन पाहिलें म्हणजे दस्यु अधिकारी अत्रीला किती कष्ट देत होते, याची कल्पना सहजच होईल. परंतु लोक कल्याण करण्याची इच्छा धारण करणाऱ्या अत्रीने व त्याच्या अनुयायांनी ते कष्ट सहन केले व असल्या त्रासांना भिऊन त्यांनी आपली चळवळ बंद ठेविली नाही, ही गोष्ट येथे लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. तुरुंगवासाच्या कष्टाचें स्वरूप दाखवणारे जे मंत्र आहेत, त्यांपैकी आणखी कांही आपण येथे पाहूं; म्हणजे आपल्याला त्या काळाची बरीच कल्पना होईल—

तप्तं घर्ममोम्यावंतमत्रये ॥ (ऋ० १।११२।७)
युवमत्रयेऽवनीताय तप्तमूर्जमोमानमश्विनावधत्तम् ॥ (ऋ० १।११८।७)
हिमेन घर्मं परितप्तमत्रये ॥ (ऋ० १।११९।६)
युवं हि घर्मं मधुमंतमत्रयेऽपो न क्षोदोऽवृणीतमेषे ॥ (ऋ० १।१८०।४)

या सर्व मंत्रांचें तात्पर्य हेंच आहे की— "अत्रीला अग्नीमुळे होणारा त्रास पाण्याच्या योगाने अश्विदेवांनी दूर केला." अर्थात् ज्या तुरुंगांत अत्रीला ठेवलें होतें, त्या तुरुंगाभोवती आग पेटवल्यामुळे आंतील लोकांना अत्यंत त्रास होत होता. एक अंधार-कोठडीचा त्रास व दुसरा आगीच्या उष्णतेमुळे होणारा भडका, यामुळे सर्व जण अगदी दुःखी झालेले होते. त्यांचें दुःख वृष्टीच्या योगाने किंवा दुसऱ्या कोणत्या तरी उपायाने अश्विदेवांनी दूर केलें.

येथे आपण कल्पना करावी की, आपल्या खोलीच्या चारही बाजूंना आग पेटविली आहे व तीमुळे खोलींतील हवा तापली आहे. अशा स्थितींत जर कोणाला थोडा वेळ तेथे राहण्याची पाळी येईल, तर त्याला कळेल की, असले भयंकर कष्ट सहन करून किती धीराने ऋषिलोक आपली चळवळ चालवीत होते. कितीही शारीरिक दुःखें आलीं, तथापि प्रारंभ केलेलें जन-हिताचें कार्य तडीस नेल्याशिवाय सोडावयाचें नाही, असा दृढ संकल्प असल्या-वाचून असली चळवळ चालणेंच शक्य नाही. वरील त्रासामुळे अत्रीचें शरीर अत्यंत कृश झालेलें असलें पाहिजे, ही गोष्ट अश्विनीकुमारांनी आपल्या उपाययोजनांनी त्यांना पुनः आरोग्य दिलें, या वर्णनावरून उघड होत आहे. पहा—

पितुमतीमूर्जमस्मा अधत्तम् ॥ (ऋ० १।११६।८)
ऊर्जमोमानमश्विनावधत्तम् ॥ (ऋ०१।११८।७)

"आरोग्यवर्धक व पुष्टिदायक अन्न व रस अश्विदेवांनी अत्रीला दिले" व त्यायोगें अत्रीच्या स्वास्थ्याचें रक्षण केलें. हें वर्णन अत्रीच्या शरिराची काय अवस्था झाली होती, त्याची स्पष्ट कल्पना व्यक्त करीत आहे. यापेक्षाही एक मंत्र उत्तम आहे. तो हा—

चित्रं ह यद्वां भोजनं न्वस्ति न्यत्रये महिष्वंतं युयोतं ॥
यो वामोमानं दधते प्रियः सन् ॥ (ऋ. ७।६८।५)

"हे अश्विदेवांनो ! तुम्ही जें अन्न अत्रीला दिलें, तें खरोखरच विलक्षण होतें; कारण त्यायोगाने अत्रि पुनः बलवान् झाला. तो तुमच्या प्रेमांतीलच असल्यामुळे आपलें संरक्षण त्यास वारंवार मिळत असे." या मंत्रांत जरी वैद्यबुवांनी तयार केलेल्या पौष्टिक अन्नाचें वर्णन असलें, तथापि असलें अन्न खाणें आवश्यक झाल्यामुळे अत्रीच्या शरिराचीहि यावरून कल्पना होणें शक्य आहे व ती कल्पना एकदा झाली, म्हणजे हे कारागृहाचे कष्ट

कसल्या प्रकारचे होते, हेंही सहज समजण्यासारखें आहे. याविषयी आणखी एक मंत्र पाहण्यासारखा आहे—

> अत्रिर्यद्वामवरोहन्नृबीसमजोहवीन्नाधमानेव योषा ।
> श्येनस्य चिज्जवसा नूतनेनागच्छतमश्विना शंतमेन ॥
>
> (ऋ० ५।७८।४)

" जेव्हा अत्रीला तुरुंगांत घातलें, तेव्हा त्याने आपलाच धावा केला—ज्याप्रमाणे एखाद्या स्त्रीने आपल्या नाथाला हाक मारावी. ती हाक ऐकून आपण वेगाने तेथे पोचलां व त्याचीं दुःखें दूर केलीं. "

अत्रीला तुरुंगांत घातल्यावर आपल्या इष्ट देवतेची भक्ति करण्याशिवाय आणखी त्याला दुसरें तिसरें कांहीच उरलें नव्हतें, कोणा माणसाकडून सहाय्य होण्याची आशा मुळीच उरली नव्हती; दस्यु अधिकाऱ्यांकडून माणुसकी दाखवली जाण्याची शक्यता नव्हती; दररोजचे शारीरिक कष्ट पूर्वी दाखवल्याप्रमाणे अत्यंत दुःख देत होते. अशा स्थितीमध्ये इष्ट देवतेची त्याने भक्ति करूं नये, तर आणखी काय करावें ?

असल्या भयंकर आपत्ति सोसून ऋषिलोक चळवळ करीत होते, या एका गोष्टीवरून पुष्कळच बोध मिळण्यासारखा आहे. वर लिहिलें आहे की, अत्रीला अंधेऱ्या खोलींत कोंडलें होतें. ही गोष्ट पुढील मंत्रांवरून स्पष्ट होत आहे—

> अत्रिं न महसस्तमसो मुमुक्तं तूर्वतं नरा दुरितादभीके ॥
>
> ( ऋ० ६।५०।१० )
>
> निरंहसस्तमसः स्पर्तमत्रिं ॥ (ऋ० ७।७१।५)

"हे ( नरौ ) नायक हो ! ( महसः तमसः अत्रिं मुमुक्तं न ) ज्याप्रमाणे गाढ अन्धकारांतून तुम्ही अत्रीस सोडविलें, त्याप्रमाणे ( अभीके ) या स्पर्धेमध्ये ( दुरितात् ) दुर्गतींतून ( तूर्वतं ) आमचें तारण करा ! "

कष्टदायक अंधारमय तुरुंगवासांतून तुम्ही अत्रीला मुक्त केलेंत, यावरून अत्रि बंदिवासांत होता, हें जसें उघड होतें, तसेंच त्याला अंधार-कोठडींत कोंडलें होतें, हेंही त्यावरूनच ठरत आहे. असुरांच्या राज्यांतील बंदिवासाची चांगली कल्पना या वर्णनावरून सहजच होण्यासारखी आहे. ज्या खोलींत शुद्ध हवा येत नाही व प्रकाशही नाही, अशा खोलींत अत्रीसारख्या महात्म्याला कोंडून ठेवावयाचें व त्याला आणखी त्रास व्हावा म्हणून खोलीच्या बाहेर आग पेटवावयाची व हें सर्व कशासाठी, तर अत्रि सार्वजनिक हिताची चळवळ करतात व सर्व लोक त्यांनाच मान देतात म्हणून!! ऋषिलोक अगदी प्राचीन काळीं अशा प्रकारची सार्वजनिक हिताची चळवळ करीत असत व इतके अमानुष कष्ट भोगावे लागले, तरीही ते आपल्या चळवळीपासून पराङ्मुख होत नसत. अशा प्रकारचा नेट ज्या चळवळीच्या बुडाशी असेल ती चळवळ अवश्य यशस्वी झालीच पाहिजे. अनेक विघ्नें आलीं तरी त्यांना न जुमानतां प्रारंभ केलेलें श्रेष्ठ काम सत्पुरुष सोडून देत नाहीत; म्हणूनच त्यांना थोर पुरुष असें म्हणतात. ऋषींची जी थोरवी आहे, ती याच चिकाटीमध्ये आहे. आतापर्यंत दिलेल्या मंत्रामध्ये अश्विदेवांनी अत्रीला सहाय्य केलें हें दाखवलें. त्याचप्रमाणे इंद्राचेंही सहाय्य त्या अत्रीला झालें होतें, त्याविषयीही एक मंत्र येथे पाहण्यासारखा आहे—

उतात्रये शतदुरेषु गातुवित् ॥ (ऋ० १।१५।३)

“ ( शतदुरेषु ) शंभर दरवाजे असलेल्या तुरुंगामध्ये आपणच अत्रीला ( गातु-वित् ) मार्गदर्शक झालांत. ” तात्पर्य, या तुरुंगांतून सुटण्याचा मार्ग अत्रीला इंद्राने दाखवला व पुढे त्या मार्गाने अश्विदेवांनी त्या ऋषीची सुटका केली.

याप्रमाणे अत्रीच्या कारागृहवासाचें वर्णन वेदांमध्ये आहे. हें वर्णन पाहिल्यावर साहजिकच पुढील प्रश्न मनामध्ये येतात— असुरांनी

अत्रीला तुरुंगामध्ये कां घातलें होतें ? असुरांच्या विरुद्ध अत्रींनी कां चळवळ चालविली होती ? असुर काय करीत होते व ऋषि काय करावें असें म्हणत होते ? या दोन पक्षांमध्ये मतभेद कोणता कोणता होता व त्याचें स्वरूप कसें काय होतें ? याचा आता विचार केला पाहिजे. यासाठी पुढील मंत्र पहा—

**आदग्ने अपृणतोऽत्रिः सासह्याद्दस्यूनिषः सासह्यान्नॄन् ॥**

**(ऋ० ५।७।१०)**

" हे अग्ने ! ( अ-पृणतः दस्यून् ) स्वार्थी शत्रूंना ( अत्रिः सासह्यात् ) अत्रीने सहन करावें व ( इषः नॄन् ) विलासी माणसांनाही त्याने सहन करावें. " या मंत्रांतील पदांचा विचार केला असतां अत्रीची दिशा काय होती व दस्यु काय करीत होते, याचा अंदाज लागेल. याचा थोडासा विस्ताराने आपण विचार करूं—

( १ ) अपृणतः दस्यून् अत्रिः सासह्यात् । (ऋ० ५।७।१०)

वरील मंत्रांत हें पहिलें वाक्य आहे. यांत " अपृणन् दस्युः " हे शब्द आहेत.(A stingy oppressor) स्वार्थी, लोभी, कृपण, दयाहीन, अत्याचारी जो असतो, त्याला " अपृणन् दस्युः " म्हणतात. दुसऱ्यांना सहाय्य न करणें, मागसलेल्यांस मदत न देणें, दुसऱ्यांचा योग्य वाटाही त्यास न देणें, हा भाव " अ-पृणत् " या शब्दांत आहे. स्वार्थाची परमावधि या शब्दाने दाखवली जाते व क्रूरतेची परमावधि दस्यु शब्दाने दाखवली जाते. हें असल्या स्वभावाचे दस्यु अत्रीच्या वेळचे राज्याधिकारी होते. याच्याच पूर्वीच्या मंत्रामध्ये—

**( २ ) अशिवस्य दस्योः माया । (ऋ० १।११७।३)**

**असें वर्णन आलेलें आहे. " दस्यु " शब्दाचा अर्थ आताच आपण पाहिला आहे. दयाहीन अत्याचारी दस्यु होय. याचींच लक्षणें दाखवणारे**

" अशिव, माया " हे दोन शब्द वरील मंत्रांत आहेत. पहिला " अशिव " शब्द त्या दस्यूचा स्वभाव दाखवतो व दुसरा " माया " शब्द त्याचा व्यवहार दाखवीत आहे. " अशिव " शब्दाचा कोशांतील अर्थ असा आहे– ( Causing or threatening mischief, unkind, envious, pernicious, dangerous ) नुकसान करण्याची धमकी देणारा, निर्दय, द्वेष्टा, घातपात करणारा, असा भयंकर जो शत्रु असतो, त्याला " अशिव " असें म्हणतात. या लक्षणांमध्येच "अपृणन् दस्यु" या शब्दांनी दाखवलीं जाणारीं लक्षणें मिळवलीं, म्हणजे अत्रीच्या शत्रूंना ओळखण्यास बरें पडेल. स्वार्थी, लोभी, कृपण, अत्याचारी, घातपात करण्याची धमकी देणारा, निर्दय, द्वेष्टा, क्रूर, भयंकर जो असतो तो " अपृणन् अशिव दस्यु " होय. हेच अत्रीचे शत्रु. त्यांनी अत्रीला तुरुंगांत ठेवलें होतें. " दस्यु " शब्दाचा कोशांतील अर्थ ( a thief, robber, oppressor ) चोर, डाकू, अत्याचारी हे आहेत. या अत्याचारी लोकांचा व्यवहार कसा काय होता, याची कल्पना " माया " शब्दाने चांगली होण्यासारखी आहे.

" माया " शब्दाचे कोशांतून जे अर्थ मिळतात, ते पुढे दिले आहेत– ( Deceit, fraud, trick, trickery, illusion, political trick or artifice, diplomatic feat, wickedness ) फसवेगिरी, धोकेबाजी, कपट, हातचलाखी, भ्रम, भ्रांतीची फसवणूक, राजनीतीची फसवणूक किंवा हातचलाखी व कावेबाजीची फसवणूक.

" अपृणन्, अशिव, दस्यूंची माया " या शब्दांचे अर्थ आपण जे पाहिले, त्यांवरून ऋषींच्या शत्रूंचा कावेबाजपणा कसा होता, याची थोडीशी तरी सहज कल्पना होण्यासारखी आहे. ऋषींचे शत्रु जसे अधिकारसंपन्न होते, तसेच ते क्रूर, निर्दय, अत्याचारी व घातक होते व त्यांचें आचरणही फसवेगिरीचें, कपटाचें व घातक कावेबाजपणाचें होतें. ही गोष्ट वरील शब्दांच्या

अर्थामध्येच आहे. असल्या कावेबाज अधिकारसंपन्न शत्रूंबरोबर युद्ध करण्याचें बिकट काम हे ऋषि करीत असत, हें येथे अवश्य लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. या शत्रूंशिवायही आणखी कांही शत्रु होते, त्यांचें वर्णन "इषः नॄन्" ( इषः – Luxurious, fond of comfort. ) या पदांनी वरील मंत्रांत केलेलें आहे. "आपमतलबी विलासी बडे लोक" असा या पदांचा भावार्थ आहे. हे लोकही ऋषींच्या चळवळीचा द्वेष करीत; कारण की, ऋषींच्या चळवळीमुळे यांची चैन कमी होई व यांच्या ऐषआरामांत कमी पडे. तात्पर्य हें की, पूर्वी सांगितलेले अत्याचारी दस्यु व ऐषआरामी बडे लोक यांच्याविरुद्ध ही या ऋषींची चळवळ होती. या शत्रूंच्या स्वभावाची एकदा ओळख पटली म्हणजे मग ऋषींच्या चळवळीचें स्वरूप समजण्यास मुळीच उशीर लागणार नाही.

## ऋषींचें ध्येय.

फार चैन करूं नये; निव्वळ भोगविलासांमध्ये उधळपट्टी करूं नये; केवळ बडे बापके बेटे बनून अरेरावी चालवूं नये; दुसऱ्याला मदत करावी; कावेबाजपणा, कपट, हातचलाखी वगैरे करूं नये; जुलूम, अत्याचार वगैरे कोणी कोणावर कधीही करूं नये; वगैरे बाबी ऋषींच्या चळवळीमध्ये असाव्या, असें साधारणपणें वाटतें. जर असें नसेल तर दस्यु व ऋषि यांमधील द्वेष वाढण्याचें कारणच नाही व सर्वहितकर्त्या ऋषीला तुरुंगांत जाण्याची पाळीही येण्याचें कारण नाही. वर काढलेल्या अनुमानांपैकी कांही जरी चुकीचीं असलीं, तरी साधारण रूपरेखा समजण्यासारखेच मंत्राचे शब्द असल्यामुळे त्यांत बराच सत्याचा अंश आहे, यांत शंका नाही.

या विवेचनावरून दस्यूंच्या पक्षाचें म्हणणें काय होतें व अत्रिपक्षाचें म्हणणें काय होतें, याची बरीच कल्पना आपणांस झाली. दस्यूंचा पक्ष अत्याचाराचा होता, हेंही वरील लक्षणांवरूनच ठरलेलें आहे. तेव्हा आता आपणास ही गोष्ट पाहणें आहे की, दस्यूंच्या अत्याचाराच्या प्रतिकारासाठी

ऋषिलोक स्वतः अत्याचार करीत होते, किंवा आपल्या अनुयायांकडून अत्याचार करवीत, कीं दुसऱ्या कोणत्या तरी शांततेच्या मार्गानें आपली चळवळ चालवीत ? या ऋषींच्या मार्गाचा विचार करावयाचा असतांना वरील मंत्रांतील " सासह्यात् " हें पद आपणास फारच उपयोगी पडण्यासारखें आहे.

( १ ) अपृणतः दस्यून् अत्रिः सासह्यात् ।

( २ ) इषः नॄन् अत्रिः सासह्यात् । ( ऋ० ५।७।१० )

" सह्=मर्षणे, तृप्तौ च " या धातूचें " सासह्यात् " हें रूप आहे. या धातूचे अर्थ—( to bear, endure, suffer, tolerate, forgive, be patient, conquer, defeat, oppose, be able to resist) सहन करणें, कष्ट भोगणें, दुःख सहन करणें, शांति ठेवणें, क्षमा करणें, धैर्य धरणें, विजय मिळवणें, शत्रूचा पराजय करणें, दुष्टांचा प्रतिकार करणें, शत्रूचा प्रतिकार करण्यास समर्थ होणें, हे आहेत. हे अर्थ ऋषींच्या चळवळीचा मार्ग व त्याचें स्वरूप दाखवीत आहेत. अत्रि आपल्या शत्रूबरोबर कोणत्या प्रकारचें युद्ध करीत होते, याची कल्पना या शब्दार्थावरून सहजच होण्यासारखी आहे.

स्वकार्य करीत असतांना जे कष्ट भोगावे लागतील, ते आनंदाने सहन करणें, शत्रूने जरी दुःख दिलें तरी तें सोसून शांतीने व धैर्यानें आपली चळवळ चालू ठेवणें, दंगाधोपा न होऊं देतां क्षमा व शांति यांचें अवलंबन करून सूड उगवण्याची बुद्धि न धरतां आपला मार्ग आक्रमण करणें, शत्रूचा विरोध करावयाचा असला तरी त्याचा घात न करणें, अशा प्रकारें शत्रूचा घात न करतां त्याची गति कुंठित करणें, हें या ऋषींच्या चळवळीचें मर्म आहे. अनत्याचार, शांति, सहनशक्ति व क्षमा हे ऋषींच्या चळवळीचे मुख्य भाव होते व अत्याचार, जुलूम, कावेबाजपणा व फसवेगिरी ही दस्यूंची वागणूक

होती, या गोष्टी वरील शब्दांवरून स्पष्ट होत आहेत.

तात्पर्य, ऋषींचा मार्ग " तपोमय ब्राह्म नीतीचा " होता व दस्यूंचा मार्ग " अत्याचारपूर्ण जुलमाचा " होता, यांत शंका नाही व असे हे दोघांचे मार्ग भिन्न असल्यामुळेच दोघांचें सख्य होत नव्हतें व त्यामुळे ऋषींची चळवळ कायम रहात असे. ऋषींच्या मनांतून कोणती इष्ट गोष्ट घडवून आणावयाची होती व असुरांना काय पाहिजे होतें, हें यावरून सहजच समजण्यासारखें आहे. दस्यूंच्या राज्यशासनापासून पंचजनांचें अकल्याण होत होतें. एवढ्याचसाठी त्या राज्यशासनामध्ये इष्ट फेरबदल घडवून आणावा, यासाठी ऋषींची चळवळ होती, ही गोष्ट सिद्ध करण्यासाठी आपणांस आता आणखी पुरावा शोधण्याची गरज नाही.

" ऋषींच्या तपामुळे राष्ट्र, बल व ओज यांची उत्पत्ति झाली " असें पूर्वीं अथर्ववेदाच्या ( कां० १९।४१।१ ) मंत्रावरून सांगितलेंच आहे. त्यावरून उघड होत आहे की, ऋषींच्या चळवळीचा कांही तरी संबंध पंचजनांच्या हिताशीं व राष्ट्रीय संघटनेशीं होता. यज्ञयागादिकांचासुद्धा याच संघटनेशीं कांही अंशीं संबंध असे. अश्वमेधासंबंधाने लिहितांना शतपथ-ब्राह्मणामध्ये पुढील विधान आढळतें—

राष्ट्रं वा अश्वमेधः ।। (श० ब्रा० १३।१।७)

" अश्वमेध म्हणजे राज्यशासनाचा अधिकार ( Royal sway ) होय. " ऋषींच्या धार्मिक चळवळीचा राष्ट्रीयतेशीं कसा संबंध होता, ही गोष्ट अनेक रीतींनी पाहतां येण्यासारखी आहे. या ठिकाणीं एकच मंत्र आपण पाहूं—

अत्रिमनु स्वराज्यमग्निमुक्थानि वावृधुः ।।
विश्वा अधि श्रियो दधे ।। (ऋ० २।८।५)

**सायणभाष्य**– अत्रिं शत्रूणां ... अत्तारं स्वराज्यं ... अनु अभिलक्ष्य ... अग्निं उक्थानि ... वावृधुः । ... स विश्वाः श्रियः अधिदधे धारयति ॥

" ( **स्वराज्यं अनु** ) स्वराज्याला अनुलक्षून कार्य करणाऱ्या ( **अग्निं अत्रिं** ) अग्नीप्रमाणे तेजस्वी अत्रीचें संवर्धन ( **उक्थानि वावृधुः** ) स्तोत्रें करीत आहेत; कारण तो ( **विश्वाः श्रियः** ) संपूर्ण संपत्तीचें ( **अधि दधे** ) धारण करतो. "

"**अत्रि**" म्हणजे शत्रूंचें भक्षण करणारा ऋषि. ज्याच्या चळवळीमुळे शत्रु दूर होतात किंवा नाहीसे होतात, असा हा अत्रि जणू काय अग्नीच आहे. जसा अग्नि पेटवला असतां अंधकार नाहीसा होतो, त्याचप्रमाणे अत्रीची चळवळ सुरू झाली म्हणजे दस्यु नाहीसे होतात. असा हा अग्नीप्रमाणे तेजस्वी अत्रि आहे. हा मूर्तिमान् अग्नीच आहे, असेंही म्हणतां येईल. स्वराज्याला अनुलक्षून याची चळवळ होत असते, म्हणून अग्नि हा जसा देवांमध्ये स्वराज्याच्या सेनेचा सेनानी असतो, त्याचप्रमाणे पंचजनांमध्ये अत्रि हाच स्वराज्याच्या चळवळीला आपल्या तपोबलाने चालवणारा माननीय नेता होय. याच्या चळवळीमुळे सर्व संपत्ति व सर्व धनें जनतेमध्ये स्थिर राहूं शकतात– ( १ ) स्वराज्याला अनुलक्षून प्रयत्न करणें, ( २ ) शांतीच्या मार्गानें शत्रूंचा पराभव करणें व ( ३ ) आपल्या सगळ्या संपत्तीचें धारण करणें, हे तीन प्रशंसनीय भाव या चळवळीच्या बुडाशी आहेत, हें येथे पाहण्यासारखें आहे. आता हें स्वराज्य कोणत्या स्वरूपाचें होतें, हें समजण्यासाठी अत्रीचेंच एक वचन या ठिकाणीं दिलें असतां पुरें होईल. तो मंत्र हा आहे–

**आ यद्वामीयचक्षसा मित्र वयं च सूरयः ॥**
**व्यचिष्टे बहूपाय्ये यतेमहि स्वराज्ये ॥** ( ऋ० ५।६६।६ )

हा मंत्र जरी अत्रीचा नसला तरी अत्रिकुलोत्पन्न रातहव्याने पाहिलेला आहे. याचा अर्थ असा- " हे व्यापक दृष्टिचे हे मित्र हो ! तुम्ही व आम्ही विद्वान् मिळून विस्तृत ( बहूपाय्ये स्वराज्ये आ यतेमहि ) बहू-पाय्य स्वराज्यामध्ये प्रयत्न करूं या."

बहूपाय्य स्वराज्याची अत्रिदृष्ट मंत्रामध्ये अशी स्पष्ट कल्पना आहे. हा मंत्र जरी स्वतः अत्रीने पाहिलेला नसला, तरी त्याच्या मुलाने पाहिलेला- अर्थात् अत्रिगोत्रांतील ऋषींनी पाहिलेला-आहे. त्यावरून अत्रीची शिकवण अशी असावी, किंवा अत्रीच्या चळवळीचा हा दृश्य बिंदु असावा, असें मानलें तर तें अवास्तविक होणार नाही.

तात्पर्य, अत्रि हे अशा प्रकारची स्वराज्याला अनुलक्षून चळवळ करीत होते व त्यांची चळवळ अत्यंत शांततेच्या मार्गाची होती. ज्या दस्यूंच्या विरुद्ध त्यांची चळवळ होती, ते दस्यु राजे या चळवळ्या ऋषींना कैदेची वगैरे शिक्षा देत असत व त्यांचा अमानुष छळ करीत असत; तथापि पंचजनांचें हित करण्याचें तप करणारे ऋषि या कष्टांची व हालअपेष्टांची पर्वा न करतां आपलें कार्य शांति, क्षमा व धैर्य यांच्या सहाय्याने चालवीत व शेवटीं यशस्वी होत असत !!

या ऋषींच्या चळवळीच्या इतिहासापासून सध्याहि आपणास बराच बोध मिळण्यासारखा आहे. त्याचा सर्वांनी योग्य विचार करावा.



# वेदकालीं लेखनकला होती

वेदांच्या कालीं लेखनकला नव्हती, अशी पुष्कळांची कल्पना आहे. याविषयी पुढील विधानें केलीं जातात—

(अ) लेखनकलेचा उदय होईपर्यंत आर्यांनी वेद पाठ करून राखले.

(आ) लिहिण्याची कला अवगतच नाही, तर ते तरी काय करणार ?

(इ) ब्राह्मणवाङ्मय तयार होईपर्यंत लिहिण्याची कला अवगत नसावी.

(ई) लिपीचें ज्ञान सूत्रकालापेक्षा अलीकडचें ठरतें. इ०

वरील विधानांचा विचार करावयाच्या वेळीं पुढील पुराव्याचा अवश्य विचार झाला पाहिजे, एवढ्यासाठीच तो खाली देतों—

(१) पाणिनीच्या कालीं लिपि होती, ही गोष्ट यांना कबूलच आहे; कारण तसें न मानून चालणारच नाही. पाणिनीच्या सूत्रांमध्ये " अदर्शनं लोपः।"(अष्टा. सू० १।१।६०) असें एक सूत्र आहे. त्यामध्ये त्याने "लोप" संज्ञेची व्याख्या " प्राप्त अक्षराचें दर्शन न होणें " अशी केली असल्यामुळे

"**अक्षरांचें दर्शन**" पाणिनीला होत होतें, ही गोष्ट निर्विवाद सिद्ध होते. अक्षरांचें दर्शन फक्त डोळ्यांनीच होणें संभवनीय असल्यामुळे वरील सूत्रावरून पाणिनीच्या काळीं अक्षरें डोळ्यांनी वाचतां येणें शक्य होतें, अर्थात् लिपि होती, असें सहजच ठरतें. कांही युरोपियन पंडित पूर्वी असें म्हणत होते की, पाणिनीच्या वेळीं लिपि नव्हती; पण वरील सूत्राने त्यांचें तें मत असें खोडून काढलें आहे की, पाणिनीय कालीं लिपीचें अस्तित्व मानल्याशिवाय त्यांना गत्यंतरच राहिलें नाही. याशिवाय इतर पुरावे आता उपलब्ध झाले आहेत; पण त्यांचा येथे उल्लेख करण्याची गरज नाही. तात्पर्य, वरील पुराव्यावरून पाणिनीच्या कालीं व स्वतः पाणिनीला लिहितां वाचतां येत होतें, हें सिद्ध आहे. एवढ्या मोठ्या नामांकित वैय्याकरणाला अक्षरओळख होती कीं नाही, हा वाद करण्याची वेळ सध्या आलेली आहे, हें खरोखर आश्चर्यच आहे !! पण एकदा वाद उत्पन्न झाल्यानंतर अशीच भाषा वापरणें आवश्यक होतें, तेथे इलाज नाही.

(२) वरील पुराव्यामध्ये "**अक्षरांचें दर्शन व अक्षरांचें अदर्शन**" या दोन कल्पना आहेत. अक्षरांचें दर्शन होत असेल तर लिपि होती व होत नसेल तर लिपि नव्हती, असें ठरणें स्वाभाविक आहे. हाच दृष्टिकोण आता आपण वेदांना लावून पाहूं. वेदांमध्ये पुढील मंत्र आलेला आहे, तो या आपल्या विषयाला फार उपयोगी पडण्यासारखा आहे—

( ऋषिः— बृहस्पतिः आङ्गिरसः । देवता— ज्ञानम् । )

**उत त्वः पश्यन्न ददर्श वाचम् ।**
**उत त्वः शृण्वन्न शृणोत्येनाम् ॥** (ऋ० १०।७१।४)

"(१) तो खरोखरच वाणीला पहात असतांही पहात नाही व (२) तो दुसरा खरोखरच वाणीचें श्रवण करीत असतांही श्रवण करीत नाही."

' निरक्षर ' मनुष्याची निंदा वरील मंत्रांत केली आहे. त्याला अक्षरें दिसत असूनही दिसत नसल्यासारखीं आहेत व त्याला शब्दांचे ध्वनि ऐकूं येत असूनही ते शब्द न ऐकल्यासारखेच आहेत. या मंत्रांतील पुढील शब्द प्रकृत विषयाच्या विचाराला उपयोगी पडण्यासारखे आहेत—

( १ ) वाचं पश्यन् वाचं न ददर्श = शब्द पहात असतांही निरक्षराला ते दिसत नसल्यासारखे आहेत.

( २ ) वाचं शृण्वन् वाचं न शृणोति = शब्द ऐकत असतांही निरक्षराला ते न ऐकल्यासारखे आहेत.

वरील मंत्रांत ( १ ) शब्दांचें दर्शन व ( २ ) शब्दांचें श्रवण ही भाषा वापरलेली आहे. तेव्हा या मंत्राच्या वेळीं तरी निदान शब्दांचें किंवा अक्षरांचें डोळयांनी दर्शन होत होतें, असें म्हणणें प्राप्त आहे. तेव्हा प्रत्यक्ष आंगिरस बृहस्पति तरी निदान निरक्षर नसावा व त्याला अक्षरें वाचतां येत असावीं, असें म्हणण्यास कांही हरकत नाही. अक्षरें किंवा शब्द वाचण्याचीच ज्याला कल्पना नाही, तो 'वाचं पश्यन्' ( वाणीला पाहणारा ) असा शब्दप्रयोग करूं शकणार नाही. जर कोणी म्हणेल की, हा कांही तरी आलंकारिक शब्दप्रयोग आहे, तर तेंही खरें कारण नव्हे. "वाचं शृण्वन्" हा दुसरा प्रयोग त्याच मंत्रांत त्याच ऋषीने केलेला आहे. तेव्हा शब्दांचें दर्शन व शब्दांचें श्रवण याची निश्चित कल्पना स्वतः बृहस्पतीलाच नव्हती, असें मानतां येणार नाही. शब्दांचें दर्शन फक्त डोळयांनाच होतें व शब्दांचें श्रवण कानांनाच होतें, ही गोष्ट सिद्ध आहे. तसेंच शब्दांचें दर्शन डोळयांना होण्यासाठी ते शब्द लिहिले गेले पाहिजेत, हेंही उघड आहे. तेव्हा वरील मंत्राच्या वेळीं लिपि होती, असें मानणें गैरवाजवी होणार नाही. हा मंत्र ऋग्वेदामध्ये असल्यामुळे ऋग्वेदाच्या कालीं लिहिण्याचें ज्ञान अर्थात् लिपिज्ञान होतें, असें यावरून दिसतें.

या ठिकाणीं आणखी एक विचार सुचतो. तो हा की, ऋग्वेदाच्या प्रथम मंडलांतील सूक्तांत 'अक्षर' शब्द आहे व अक्षर शब्दाचा 'अ-क्षर' असा छेद धरून ' अ-विनाशी ' असा अर्थ करण्याचा परिपाठ आहे; पण ह्या शब्दाचा असाच अर्थ झाला पाहिजे, असा आग्रह धरण्याचें कारण नाही; कारण त्याचा दुसऱ्या रीतीने छेद करून त्याचा दुसरा अर्थ होणें संभवनीय आहे.

अक्ष-र = डोळे ज्यांत रमतात.

लिपि होती, असें ठरल्यानंतर 'अक्ष-र' शब्दाचा हा अर्थ अन्वर्थक दिसतो. जर हा अर्थ मानला तर पुढील मंत्राचा अर्थ करणें सुगम होतें. ( दीर्घतमा ऋषिः )

ऋचो अक्षरे परमे व्योमन् यस्मिन् देवा अधि विश्वे निषेदुः।
यस्तन्न वेद किमृचा करिष्यति य इत्तद्विदुस्त इमे समासते ॥
(ऋ० १।१६४।३९)

"रक्षक अशा परम अक्ष-रामध्ये ऋचा बसलेल्या आहेत. त्याच अक्ष-रामध्ये सर्व देवही बसले आहेत. ज्याला तें अक्ष-र माहीत नाही, तो ऋचा घेऊन काय करणार ? परंतु ज्याला तें अक्ष-र माहीत आहे, त्यालाच प्रतिष्ठा मिळते. "

'व्योमन्' शब्द जरासा नडणारा आहे; त्याचा अर्थ "वि-अव्" या धात्वर्थाला धरून केला आहे. विशेष रक्षण करणारा तो व्योमन् होय. ऋचा ह्या अक्ष-रांच्या आश्रयाने आहेत व तीं अक्षरें डोळयांना रमविणारीं अर्थात् लिहिलेलीं असल्यामुळे तीं "ऋचांचें विशेष रक्षण" करूं शकतात. म्हणजे कोणी एखाद्याने हे मंत्र पाठ जरी केले नाहीत, तरी ते लिहिलेले असल्यामुळे किंवा अक्ष-रांमध्ये सुरक्षित राहिले असल्यामुळे ते टिकाऊ आहेत; म्हणूनच उत्तर मंत्रांत म्हटलें आहे की, ज्याला तें 'अक्ष-र' माहीत नाही, त्याला

ऋचेपासून काय मिळणार? ज्याला तें अक्ष–र वाचतां येतें, त्याचीच प्रतिष्ठा होते.

या मंत्राच्या अर्थासंबंधाने व अक्षर शब्दाच्या "अक्ष–र" या छेदा-संबंधाने कोणाचा मतभेद असेल; तथापि पूर्वीच्या मंत्राच्या संबंधाने मात्र "वाचं पश्यन्, न ददर्श" यावरून लिपि होती, हें निर्विवाद ठरतें. जर अक्ष–र शब्दाचा हा अर्थ मानला व वरील मंत्राचा असा किंवा अशासारखा अर्थ स्वीकृत केला, तर पहिल्या मंडलामध्येही लेखनकलेचे सूचक शब्द किंवा मंत्र आहेत, असें मानावें लागेल. हें ठरो किंवा न ठरो, दहाव्या मंडलांतील बृहस्पतीच्या मंत्राने तर लिपीचें अस्तित्व ठरत आहे, याबद्दल शंका नाही.

आता अथर्ववेदाचा पुरावा आपण पाहूं—

( १ ) ताभ्यामुद्धृत्य वेदमथ कर्माणि कृण्महे ॥६८॥१॥

( २ ) स्तुता मया वरदा वेदमाता
प्रचोदयन्ती पावमानी द्विजानाम् ॥७१॥१॥

( ३ ) यस्मात् कोशादुदभराम वेदं तस्मिन्नन्तरवदध्म एनम् ॥
कृतमिष्टं ब्रह्मणो वीर्येण तेन मा देवास्तपसावतेह ॥७२॥१॥
( अथर्व० कां० १९ सू. ६८—७२ )

( १ ) दोनही हातांनी वेदाला वर उचलून आता आम्ही कर्में करतों.

( २ ) वर देणाऱ्या वेदमातेची मी स्तुति केली. ही द्विजांना पवित्र करणारी व प्रेरणा देणारी आहे.

( ३ ) ज्या पेटींतून आम्ही वेदाला वर काढलें, तिच्या आंत आता त्या वेदाला ठेवीत आहों. जें कांही इष्ट कर्म करावयाचें होतें, तें मंत्रांच्या वीर्याने आम्ही केलें आहे; त्या तपाच्या योगाने देव माझें रक्षण येथे करोत.

हे मंत्र अथर्व० कांड १९ मध्ये सूक्त ६८ ते ७२ मध्ये क्रमाने आहेत. पहिल्या मत्रांत ( ताभ्यां वेदं उद्धृत्य ) वेदाला दोनही हातांनी वर उचलण्याचा उल्लेख आहे. पिशवींतून किंवा पेटींतून पोथी बाहेर काढण्याची स्पष्ट

कल्पना येथे होत आहे; कारण मंत्राचा आशय " वेद बाहेर काढून कर्में करावयास लागतों " असा स्पष्ट आहे. करावयाचीं कर्में वेदाज्ञेप्रमाणे केल्या-नंतर " वेदमातेची आम्ही स्तुति केली " असें मधल्या मंत्रांत म्हटलें आहे व तिसऱ्या मंत्रांतील वाक्य तर अगदी स्पष्टच आहे. हा मंत्र म्हणतो कीं, " ज्या पिशवींतून किंवा पेटींतून अथवा कपाटांतून आम्ही वेद बाहेर काढले होते, तेथेच ते आता पुनः आम्ही ठेवीत आहों. " मंत्रांत " कोश " शब्द आहे; याचा अर्थ–पिशवी, पेटी, कपाट, खोली होऊं शकेल.

हे मंत्र पाहिले म्हणजे असें स्पष्ट दिसतें की, वेदाचें पुस्तक बाहेर काढणें व पुनः आंत ठेवणें, हे उल्लेख वरील मंत्रांत स्पष्ट आहेत. ज्यांना वेदाची पोथी अथर्ववेदकालीं होती, असें म्हणणें खपत नाही; कारण तसें मानलें तर लेखन होतें व लिपि होती, असें मानावें लागेल, ते मि. ग्रिफिथसारखे भाषांतरकार वरील मंत्रांतील " वेद " शब्दाचा अर्थ " केरसुणी " असा करतात ! पण श्री० सायणाचार्य वेदाचा अर्थ श्रुति असाच या मंत्रांत देत आहेत. " वेद " शब्दाचा अर्थ " केरसुणी " समजून वरील मंत्रांचा अर्थ ठीक होत नाही, हें स्पष्ट आहे. मि. व्हिट्नेनी आपल्या भाषांतरांत " वेद " असेंच लिहिलें असून " केरसुणी " असें लिहिलें नाही; तथापि त्यांचा कल " वेदाचें लिहिलेलें पुस्तक " असा मानण्याकडे नाही; कारण त्यांना अशी भीति आहे की, तसें मानलें तर त्या काळांत लिपि होती, असें मानावें लागेल ! पण ही भीति कांही आम्हांला असण्याचें कारण नाही. तेव्हा आम्ही जो सरळ अर्थच होईल तो घेणार. वरील मंत्र अगदी स्पष्ट आहेत, तेव्हा त्यांच्या अर्थाबद्दल शंका येण्याचें कारणसुद्धा नाही.

हे मंत्र पाहिले असतां वैदिक काळीं लिपि होती, व वेदाच्या पोथ्याही होत्या, असें स्पष्टपणें दिसतें.

❀ ❀ ❀

# वेदांमध्ये सौंदर्याची कल्पना आहे काय ?

वैदिक वाङ्मयांत तसेंच आर्यांच्या धार्मिक ग्रंथांत सौंदर्याच्या कल्पनेचा मागमूसहि नाही, असें विधान कित्येक युरोपीय पंडितांनी केलेलें आहे. परंतु यांचें हें विधान निर्विवादपणानें निदान मला तरी मान्य करतां येत नाही. कारण—

' सुरूपकृत्नुमूतये० ' ( ऋ० १।४।१ )

" ( सु ) सुंदर ( रूप ) रूप ( कृत्नुं ) करणाऱ्या ईश्वराची प्रार्थना करतात; कारण तोच सर्वांचें रक्षण करतो." या मंत्रांत "सु-रूप-कृत्नु" हे शब्द आहेत. यांचा अर्थ ( Maker of beautiful forms ) सुंदर आकार-स्वरूप बनविणारा, असा होतो. फक्त " रूप " शब्दानेच सुंदर आकृतीची कल्पना येते. 'तो रूपवान् आहे' असें म्हणण्यानेच तो सुस्वरूप आहे, असा बोध होतो. पण येथे तर ' रूप ' शब्दालाच ' सु ' हा शब्द आणखी जोडलेला आहे, अर्थात् हा " सु-रूप " शब्द निःसंशय सुंदर

आकाराचाच बोधक आहे, म्हणूनच यांत सौंदर्याची कल्पना स्पष्ट आहे. तसेंच आणखी पहा–

**इंद्रो राजा जगतश्चर्षणीनां अधि क्षमि विषुरूपं यदस्ति ॥**

**( ऋ० ७।२७।३ )**

“ ( **अधि क्षमि** ) या पृथ्वीवर ( **यत्** ) जें कांही ( **वि-सु-रूपं** ) विशेष सौंदर्ययुक्त रूप आहे, त्याचा आणि सर्व जगाचा राजा इंद्र आहे.” या मंत्रांतील “ **वि-सु-रूपं** ” हा शब्द विशेष सौंदर्याचा वाचक आहे.

**रूप** = सौंदर्यपूर्ण आकृति

**सु-रूप** = सुंदर मनोरम आकार

**वि-सु-रूप** = विशेष सुंदर मनोरम आकार

हे शब्द विनाकारणच योजिलेले आहेत, असें कोणी म्हणेल काय ? वरील शब्दांत सौंदर्याची कल्पना नाही, तर कसली वरें कल्पना आहे ?

सौंदर्याचें वर्णन करीत असतांनाच अथर्ववेदांत ( २।२।५ या ठिकाणीं ) “ **मनो-मुहः** ” शब्द आलेला आहे.

**अक्ष-कामा मनोमुहः ॥** ( अथर्व० २।२।५ )

“ डोळयांची कामना तृप्त करणारें व मन मोहून टाकणारें रूप. ” याहि शब्दांनी अप्रतिम सौंदर्याची कल्पना व्यक्त होत नाही काय ?

तसेंच—

**रुशद्वसानः सुदृशीकरूपः ॥** ( ऋग्वेद ४।५।१५ )

“ ज्याचें रूप ( **सु-दृशीक-रूपः** ) उत्तम दर्शनीय आहे आणि जो चमकदार वस्त्र वापरतो. ” या मंत्रांतील “ **सु-दृशीक-रूपः** ” हा शब्द अत्यंत दर्शनीय रूपाचा बोधक आहे. वेदांमध्ये रूपारूपांतील भेदहि दाखविले आहेत —

**याः सरूपा विरूपा एकरूपाः ॥** ( ऋ० १०।१६९।२ )

" जो ( **स-रूपाः** ) सारख्या स्वरूपाचा, ( **वि-रूपाः** ) अनेक विशेष रूपधारी किंवा कुरूप तसेंच ( **एक-रूपाः** ) एकच आकाराचा आहे. "

या मंत्रांतील हे शब्द रूपांच्या स्वरूपांचें वर्गीकरण दाखवतात; यावरून वेदांत रूपांचे भेद वर्णन केलेले आहेत, हें स्पष्ट होतें. ऋग्वेदांत १०।६८।३ या ठिकाणीं ' **अनवद्य-रूप** ' शब्द आहे, याचा अर्थ " अनिंदनीय स्वरूप-युक्त " असा होतो. अशा रीतीने वेदांमध्ये सुंदर रूपाची कल्पना आढळून येते.

हे मंत्र स्पष्ट आहेत आणि या शब्दांचा अर्थहि स्पष्ट आहे. इतके स्पष्ट आधार दिसत असूनहि हे पंडित " **वेदांत सौंदर्याची कल्पनाच नाही,** " असें म्हणतात आणि आमचे लोकहि त्यांचेंच वाक्य प्रमाण मानतात, हें आश्चर्य नव्हे काय ?

वास्तविक पाहतां आमच्या धर्माचे मूल आधार ग्रंथ " **स्वतःप्रमाण वेद** " आहेत. यासाठी त्यांच्या अर्थांची संगति आपणच लावली पाहिजे, म्हणजे अशा तऱ्हेचे विपर्यास व गैरसमज पसरविले जाणार नाहीत.



# वामनावताराचा संदेश

( त्रिविष्टप ) तिबेट देशामध्ये देवजातीचें राज्य, भारतवर्षामध्ये आर्यांचें राज्य, हिमालयाच्या मध्य उतरणीवर गंधर्वांचें राज्य, हिमालयाच्या पूर्व दिशेने भूतजातीचें राज्य, [ ज्यास सध्या भूतान ( भूतस्थान ) असें म्हणतात ] हिमालयाच्या पश्चिमेस पिशाच जातीचें राज्य, तिबेट व भरतखंड यांच्या पश्चिमेस असुर, दैत्य, दानव व राक्षस यांचीं राज्यें होतीं व हीं असुर राज्यें इराणापासून तों रशियापर्यंत पसरलीं होतीं. महाराष्ट्रामध्ये ज्याला देश असें म्हणतात त्यास पूर्वी महीपृष्ठ म्हणत व कोंकणाला महीतल, रसातल, भूतल अशीं तल किंवा ताल प्रत्ययान्त नांवें असत, त्यांतीलच एक नांव पाताल हें आहे.

ही साधारणपणें त्या वेळची देश-व्यवस्था होती. तिबेट, भरतखंड व समुद्रसपाटीचे प्रदेश यांना साधारणपणें त्रिविष्टप, भूलोक व पाताल असें समजलें जात असे. त्रिविष्टपच्या इंद्राच्याच ताब्यांत प्रथम हा भाग होता

व अतिप्राचीन कालीं असुर, दैत्य, दानव व राक्षस यांच्या त्रिविष्टपाच्या देवांबरोबर ज्या लढाया झाल्या, त्या तेथील राज्य मिळविण्यासाठीच झाल्या. याच्या पुढच्या कालामध्ये भारतीय आर्य आपल्या चातुर्वर्ण्य-संस्थेसह प्रबल झाले व गंधर्वादि सर्व आजूबाजूच्या जाती खालावल्या.

बली राजाची जी गोष्ट आहे, ती भारतीय आर्य राजांचा उदय होण्यापूर्वी जेव्हा तिबेटच्या देव-जातीचें राज्य भरतखंडावर होतें व ज्या कालीं देव जाति प्रबल होती, त्या काळची आहे. बलीच्या गोष्टीचा पूर्वापर-संबंध समजण्यास इतकी माहिती पुरेशी आहे.

## बली कोणत्या जातीचा ?

बली हा जन्माने आर्यवंशीय नव्हता व तो तिबेटच्या देव–जातीचाही नव्हता. हिरण्याक्ष व हिरण्यकशिपु हे दोघे दैत्य जातीचे बादशाह फार प्राचीन कालीं होऊन गेले. हे मूळचे इराणाच्या उत्तरेकडील प्रदेशांतील बलाढ्य राजे होते. सध्या जसे पठाण आहेत, तशासारखे हे होते. मुसलमानांच्या जशा स्वाऱ्या हिंदुस्थानावर झाल्या, तशाच यांच्याही झाल्या होत्या. हिरण्यकशिपूचा मुलगा प्रल्हाद, त्याचा मुलगा वैरोचन व वैरोचनाचा मुलगा बली होय. हिरण्यकशिपूचा जसा भारतीय आर्य क्षत्रियांशी अर्थाअर्थी संबंध नाही, त्याचप्रमाणे बलीचाही नाही.

ज्याप्रमाणे हिरण्यकशिपु हा देवांचा व आर्यांचा शत्रु होता, त्याचप्रमाणें बलीही होता. दोघांमध्ये फरक, औरंगजेब व अकबर यांच्या इतकाच फक्त राज्य करण्याच्या पद्धतींतच काय तो होता, शत्रुत्वांत नव्हता, ही गोष्ट येथे प्रथम लक्ष्यांत घेतली पाहिजे.

इराणपासून तों तहत रशियापर्यंत असुर, दैत्य, दानव व राक्षस यांचे देश होते व त्या सर्वांचें लक्ष्य तिबेटच्या देवराजाचा पराभव करावा व भारत-

वर्षांत हवातसा धुडगूस घालावा याकडे होतें; कारण भारतवर्षामध्ये उत्पन्न होणारें धान्य जसें तिबेटच्या देवजातीला पाहिजे होतें, त्याचप्रमाणें तें असुरादिकांनाही हवें होतें; म्हणून या सुवर्णभूमीवर अधिकार प्राप्त व्हावा, म्हणून प्राचीन काळींही देव व असुर यांचीं युद्धें होत होतीं.

पंधराव्या व सोळाव्या शतकांमध्ये इंग्लिश, फ्रेंच, पोर्तुगीज वगैरे लोक ज्या प्रकारची खटपट भारतवर्षांत करीत होते, तशाच प्रकारची धडपड असुर, दैत्य, दानव व राक्षस हे तिबेटच्या द्वाराने करीत होते. दोहोंच्या खटपटीत बरेंच साम्य आहे, म्हणून वर पंधराव्या शतकांतील राजकारणाचा उल्लेख केला आहे.

## बलीची पहिली स्वारी.

बली हा भरतखंडांतील नव्हता व तो देव-जातीचाही नव्हता. तो तिबेटच्या पश्चिमेकडच्या देशांतील होता. त्याने देवांचा पराभव करून भरतखंडावर स्वामित्व मिळवावें म्हणून जी पहिली स्वारी तिबेटावर केली होती, तिचें वर्णन श्रीमद्भागवत ( स्कं० ८, अ० १० ) मध्ये आलेलें आहे.

बली, नमुची, यातुधान, वैरोचन, जंभ वगैरे सर्व असुर, दैत्य, दानव व राक्षस या वेळीं एकमुखी हल्ला देवांवर चढवीत होते. हें असुरांचें ' मित्र-दल ' या वेळीं बनलेलें होतें. देवांच्या बाजूने मुख्य इंद्र सम्राट् असून त्याबरोबर मरुत्, वरुण, हयग्रीव वगैरे अनेक देववीर होते.

युद्ध फार दिवस चाललें व त्यांत सर्व देवांनी मिळून अद्वितीय संघशक्तीने भाग घेतल्यामुळे बलीचा पूर्ण मोड झाला. याचें वर्णन हें आहे—

येऽवशिष्टा रणे तस्मिन्नारदानुमतेन ते ।
बलिं विपन्नमादाय अस्तं गिरिमुपागमन् ॥ (श्रीभागवत०८।११।४७)

युद्धामध्ये बलीला मूर्च्छा आली, त्याचे थोडेसे वीर शिल्लक राहिले,

तेव्हा नारदाने त्यांना सांगितलें की, 'आता तुम्ही येथून निघून जा, नाही तर नाश पावाल.' तेव्हा हा नारदाचा उपदेश त्यांना पटला व मूर्च्छित झालेल्या बलीला घेऊन ते असुर-सैनिक पश्चिमेच्या पर्वतापलीकडे पळून गेले.

बलीने त्रिविष्टपावर हल्ला चढवला, तोही पश्चिमेकडून व असुर-सैनिक मूर्च्छित पडलेल्या बलीला घेऊन पळून गेले, तेही पश्चिमेकडेच पळाले. यावरून उघड होत आहे की, बलीचा देश तिबेटाच्या थेट पश्चिमेस होता. सध्याचें रशियन तुर्कस्थान हा किंवा याच्या लगतचा कोणता तरी त्याचा देश असावा.

पराजितश्रीरसुभिश्च हापितो हीन्द्रेण राजन् भृगुभिश्च जीवितः ।
सर्वात्मना तानभजद्भृगून्बलिः शिष्यो महात्मार्थनिवेदनेन ॥
( श्री० भागवत० ८।१५।३ )

'इंद्राने बलीचा पूर्ण पराभव केला, जवळ जवळ गतप्राण होण्यापर्यंत त्याची अवस्था पोचली. भृगूच्या आश्रमांत पोचल्यानंतर तेथील औषधोपचारांनी तो जगला, म्हणून भृगूला तो मान देऊं लागला.'

मरत असलेल्या बली दैत्यावर भृगु ऋषींनी उपचार केले व त्याचा प्राण वाचवला, म्हणून भरतखंडावर पुढची स्वारी करण्याचा बेत त्याने रहित केला नाही! या असुरांच्या मन:प्रवृत्तीचा विचार करण्यासारखा आहे. पृथ्वीराजाने जीवदान दिलेल्या व प्राण वाचविलेल्या मोगल महम्मद घोरीनेच पृथ्वीराजाचा शेवटीं नाश केला, या ऐतिहासिक गोष्टीशीं वरील गोष्टीची तुलना वाचकांनी अवश्य करावी. दीनांचें रक्षण करावें, म्हणून जखमी झालेल्या बलीला भृगूंनी आपल्या आश्रमांत त्याला ठेवून औषधोपचार केले; पण पुढे त्याच बलीने भृगूंचा असा पाणउतारा केला की, त्यामुळे भृगूंचे डोळे उघडले व त्यांनी बलीला शाप दिला !

## बलीची दुसरी स्वारी.

पहिली स्वारी फसल्यावर पुनः कमर कसून व अधिक तयारी करून बलीने दुसरी चढाई देवांच्या राष्ट्रावर केली—

**वृतो विकर्षन्महतीमासुरीं ध्वजिनीं विभुः ।**
**ययाविन्द्रपुरीं स्वृद्धां कंपयन्निव रोदसी ॥ ११ ॥**

(श्री० भागवत ८।१५)

मोठें सैन्य घेऊन बली दैत्याने इन्द्रपुरीवर दुसऱ्याने चढाई केली. पण या वेळीं देवसैन्याची मुळीच तयारी नव्हती. यामुळे इंद्राला बलीच्य आसुरी सेनेचा प्रतिकार करणें अशक्य वाटलें—

**भगवन्नुद्यमो भूयान्बलेर्नः पूर्ववैरिणः ।**
**अविषह्यमिमं मन्ये केनासीत्तेजसोर्जितः ॥** (श्री० भागवत ८।१५)

इंद्र म्हणतो— "आमचा जुना शत्रु जो बली त्याने आता मोठ्या तयारीने हल्ला चालवला आहे. आमची तर सध्या मुळींच तयारी नाही. तेव्हा याचा हा हल्ला परतविणें अगदी अशक्य आहे, असें मला वाटतें."

गेल्या महायुद्धामध्ये फ्रान्सची तयारी नसतां ज्याप्रमाणे जर्मनीने एकदम हल्ला चढवला होता, त्याचप्रमाणे देववीर हे आपापल्या अप्सरांबरोबर विहार करण्यांत गर्क असल्यावेळीं व असुरांच्या हल्ल्याविषयी अगदी गाफील होते त्या वेळीं, बलीने असा प्रचंड हल्ला चढवला की, देववीरांना प्रतिकारसुद्धा करतां आला नाही. सर्व देववीर आपापलीं गावें सोडून जीव घेऊन पळाले व लपतां येईल तेथे लपले—

**देवेष्वथ निलीनेषु बलिर्वैरोचनः पुरीम् ।**
**देवधानीमधिष्ठाय वशं निन्ये जगत्त्रयम् ॥** (श्री० भाग० ८।१५।३३)

"देव पळाले असें पाहून बलीने इंद्राच्या राजधानींत प्रवेश केला व त्रिविष्टप, भरतखंड आणि पाताल या तीनही ठिकाणीं आपल्या विजयाचा नगारा त्याने वाजवला !" अशा प्रकारें युद्ध न करतांच दुसऱ्याच्या गाफील-पणाचा फायदा घेऊन बली दैत्य या एवढ्या भूप्रदेशाचा बादशहा बनला ! आपला पणजा हिरण्यकशिपु, क्रूरनीतीचा आश्रय करून राज्य करीत होता, यास्तव त्याचें राज्य लोकप्रिय झालें नव्हतें व यामुळेच त्याचा वध केला गेला, ही गोष्ट बली दैत्याला पूर्णपणाने माहीत होती. म्हणून त्याने सौम्य नीतीने राज्य चालवून कोणालाही न दुखवितां सर्वांस वश करण्याची योजना सुरू केली. असें करण्यांत याचा उद्देश हा होता की, देवांनी किंवा आर्य लोकांनी बंड करूं नये व आपलें राज्य उलथून पाडूं नये.

जरी बली दैत्याने सौम्य नीतीने राज्य चालविलें होतें, तरी वरील तीनही राष्ट्रांतील सर्व अधिकाराच्या जाग्यांवर त्याने आपले दैत्यच आणून बसविले होते. भारतीय आर्य व त्रिविष्टपीय देव यांपैकी कोणीही विशिष्ट मर्यादेपेक्षा अधिक डोकें वर न काढील, अशी आंतून सक्तीची व्यवस्था त्याने केली होती. म्हणजे बलीचें राज्य जरी बाहेरून शांततेचें दिसत होतें व कोणास उघड त्रास होत नव्हता, सर्वांना न्याय सारखा मिळत होता, कोणाच्या धर्मकर्मांमध्ये व्यत्यय येत नव्हता, कोणताही असुर पूर्वीप्रमाणें आर्यादिकांना हाणमार करीत नव्हता, तथापि बलीची राजनीति अशी होती की, तीमुळे भारतीय आर्य, त्रिविष्टपीय देव व पातालांतील सर्पादि जातींचें वीर्य सारखें खच्ची होत रहावें व त्यांमध्ये पुनः उठण्याचा जोम वाढूं नये व सर्वांचा तेजोभंग होत रहावा व त्यांनी निरंतर आपले अंकित रहावें.

## पुरुषांचे विचार.

सदोदित तेजोवध झाल्याने बली दैत्याने पराभव केलेले देववीर व

आर्यवीर गर्भगलित होऊन "बलीचें सुराज्यच बरें आहे, आपणाला तरी अधिक उपभोग कशाला पाहिजेत ? दैत्य कर्ते पुरुष आहेत, त्यांच्याइतकी कर्तबगारी आम्हांमध्ये कोठे आहे ? देवांचें राज्य आर्यांवर किंवा आर्यांचें देवावर राज्य होण्यापेक्षा तिसऱ्या दैत्यांचेंच राज्य आर्य व देव या दोघांवर असलेलें चांगलें; कारण देवांचें राज्य झालें तर देववीर आर्यांवर जुलूम करणार व आर्यांचें राज्य झालें तर आर्यवीर देवांवर जबरदस्ती करणार ! या दोन्ही स्थिति वाईट. यासाठी या दोनहि जातींवर जे बली दैत्याचें सुराज्य आहे, तेंच उत्तम आहे. बलीच्या राज्यांत आम्हांला कांही त्रास नाही, बलीने स्वतः यज्ञयाग चालविले आहेत, आमच्या यज्ञांमध्ये तो विघ्न आणीत नाही, आमची हळूहळू उन्नति व्हावी म्हणून तो खटपट करीत आहे. यासाठी बलीचें राज्य कायम टिकवणें हेंच आमच्या हिताचें आहे." असें म्हणत।

हो त्या वेळच्या कांही पुरुषांची विचारसरणी होती; पण आर्यस्त्रिया व देवस्त्रिया मात्र पूर्वीचें वैभव आठवून अश्रुपात करीत होत्या. पण त्या जुन्या चालीच्या वेडगळ आहेत, असें कांही लोक समजत व कांहीना त्यांच्या अंतःकरणांत पेटत असलेल्या स्वातंत्र्याच्या अग्नीची कल्पना होतही असे.

## स्त्रियांचा जळफळाट !

मातांच्या मनांत जो विचार घोळत असतो, तो मुलांमध्ये उत्पन्न होत असतो. मातांमध्ये जर राज्यक्रांतीचे विचार घोळले, तर एकदोन पिढ्यांत खात्रीने राज्यक्रांति होते. पण जर बायकांनीच परकीय राज्याचें जूं मानेवर घेण्यांत भूषण मानलें, तर राज्यक्रांति होणें अशक्य; हा सिद्धांत सार्वकालिक आहे.

पराजित देवांच्या व आर्यांच्या स्त्रिया आपलें पूर्ववैभव आठवून मनांत कशा जळफळत असत, तें पहा—

एवं पुत्रेषु नष्टेषु देवमाताऽदितिस्तदा ।
हृते त्रिविष्टपे दैत्यैः पर्यतप्यदनाथवत् ॥ (श्री० भाग० ८।१६।१)

"दैत्यांनी आपलें राज्य हरण केलें व आपल्या मुलांचा दैत्यांच्या कारणाने सर्वतोपरी नाश झाला आहे, असें पाहून, अनाथ झालेल्या देवमाता मनांत जळत असत." या स्त्रियांना असें वाटे की आपलें, वैभव पूर्वीप्रमाणे वाढावें, आपल्या मुलांचा दर्जा राष्ट्रीय दृष्टीने वाढावा, दैत्य, असुर व राक्षस आपल्या संपत्तीचा उपभोग घेत आहेत, तो आपल्या मुलांना घेतां येण्याजोगी अनुकूल परिस्थिति पुनः प्राप्त व्हावी.

## स्त्रियांची इच्छा.

वर दाखवल्याप्रमाणे आर्यमातांचा जळफळाट झालेला होता. पूजा करून त्या रात्रंदिवस देवाची अशी प्रार्थना करीत—

तस्मादीश भजन्त्या मे श्रेयश्चिंतय सुव्रत ।
हृतश्रियो हृतस्थानान्सपत्नैः पाहि नः प्रभो ॥१५॥
परैर्विवासिता साहं मग्ना व्यसनसागरे ।
ऐश्वर्यं श्रीर्यशः स्थानं हृतानि प्रबलैर्मम ॥१६॥
यथा तानि पुनः साधो प्रपद्येरन्ममात्मजाः ।
तथा विधेहि कल्याणं धिया कल्याणसत्तम ॥१७॥(श्री०भाग०८।१६)

"हे ईश्वरा! मी तुझी भक्ति करीत आहें, तर माझें कल्याण होईल असें कर. हे प्रभो! प्रबल शत्रूंनी आमच्या सर्व संपत्ति हरण केल्या आहेत व आम्हांला स्थानभ्रष्ट केलें आहे. वैभवाच्या शिखरावरून आम्हांला दुःखाच्या सागरांत लोटलें आहे शत्रूंनी आम्हांला शहरांत फिरण्याचीही मोकळीक ठेवली नाही. प्रबल शत्रूंनी आमचें ऐश्वर्य, आमची संपत्ति, आमचें यश व आमचीं सर्व स्थानें हीं आमच्याकडून हरून घेतलीं आहेत व आम्हांला

देशोधडीस लावलें आहे. आमच्या तरुणांना पूर्वीचें वैभव मिळावें, ते पूर्वीप्रमाणे ऐश्वर्यसंपन्न व्हावे, त्यांचें धवल यश पुनः चहूंकडे पसरावें व त्यांचीं सर्व अधिकारस्थानें पुनः त्यांस मिळावीं; अर्थात् राष्ट्रांतील सर्व अधिकारांचीं स्थानें त्यांना प्राप्त व्हावीं, अशी कांही कल्याणाची योजना, हे ईश्वरा ! तूं घडवून आण. ''

या प्रार्थनेमधील वेदमातांचे शब्द, बली दैत्याने येथे केवढा अनर्थ केला होता व पराजित लोकांची स्थिति कशी बनवली होती, हें स्पष्टपणाने दाखवीत आहेत. पहा—

(१) हृताश्रियः— दैत्यांनी यांची सर्व संपत्ति हरून नेली होती, यामुळे दैत्य प्रत्यहीं श्रीमान् व देव धनहीन बनत होते;

(२) हृतस्थानाः— देवराष्ट्रांतील सर्व चांगल्या जागा व अधिकाराच्या जागा दैत्यांनी बळकावल्या होत्या; त्यामुळे देवतरुणांना कोणतेंही कार्यक्षेत्र उरलें नव्हतें;

(३) विवासिताः — दैत्यांनी देवांना देशोधडीस लावलें होतें;

(४) व्यसने मग्नाः — सर्वांना दुःखसागरांत लोटून दिलें होतें;

(५) ऐश्वर्य, संपत्ति, यश व जागा — या देवांच्या व आर्यांच्या राष्ट्रांत देवांना व आर्यांना न मिळतां त्या सर्व दैत्यांना मिळत असत.

बलीच्या सुराज्यांत देवराष्ट्र व आर्यराष्ट्र यांची कशी अवस्था झाली होती व तरुणांना कसें वागविलें जात असे, तें सर्व या शब्दांत पाहण्यासारखें आहे.

## ईश्वरी साक्षात्कार.

कोणत्याही विचारावर एकतानता झाली म्हणजे साक्षात्कार होतो. तसा तो त्या वेळीं स्त्रियांना झाला होता. पहा—

देवमातर्भवत्या मे विज्ञातं चिरकांक्षितम् ।
यत्सपत्नैर्हृतश्रीणां च्यावितानां स्वधामतः ॥१२॥
तान्विनिर्जित्य समरे दुर्मदानसुरर्षभान् ॥
प्रतिलब्धजयश्रीभिः पुत्रैरिच्छस्युपासितुम् ॥१३॥
इन्द्रज्येष्ठैः स्वतनयैर्हतानां युधि विद्विषाम् ।
स्त्रियो रुदन्तीमासाद्य द्रष्टुमिच्छसि दुःखिताः ॥१४॥
आत्मजान्सुसमृद्धांस्त्वं प्रत्याहृतयशश्रियः ।
नाकपृष्ठमधिष्ठाय क्रीडतो द्रष्टुमिच्छसि ॥१५॥ (श्री० भाग० ८।१७)

" हे देवमाते ! तुझ्या मनांतील फार दिवसांची इच्छा मला माहीत आहे. दैत्यांनी तुझ्या मुलांचें सर्व राज्य हरण केलें व त्यांना त्यांच्या स्वतःच्या मालकीच्या घरांतून बाहेर हाकलून दिलें आहे. त्या तुझ्या तरुणांनी युद्धांत दैत्यांचा पराभव करावा व गेलेलें वैभव पुनः प्राप्त करून घ्यावें, अशी तुझी मनापासून इच्छा आहे. इंद्रादि तुझ्या मुलांनी शत्रूंना युद्धांत कापून काढावे व त्यामुळे दैत्यांच्या स्त्रिया दुःखी झाल्या असून त्या रडत आहेत, असें पाहण्याची तुझी इच्छा आहे. तुझ्या तरुण पुत्रांनी आपलें गतवैभव पुनः प्राप्त केलें आहे व ते आपल्या देशांत पूर्ववत् ऐश्वर्य उपभोगीत आहेत, असें पाहण्याची तुझी इच्छा आहे. "

या सक्षात्काराच्या वर्णनांतील शब्दही बलीचें राज्य कशा प्रकारचें होतें व तें जित लोकानां कसें काय वाटत होतें, हें स्पष्ट दाखवीत आहेत.

## वामनाची बिकट कामगिरी.

वामनावताराच्या वेळीं राजकारण फारच बिकट झालेलें होतें. त्रिविष्टपांतील देवजाती, भरतखंडांतील आर्य–जाती व इतर सर्व लहानसहान जाती विभागल्यामुळे व कित्येक वर्षे पूर्ण परतंत्र झाल्यामुळे कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाही, अशी स्थिति झाली होती. जो तो आपापल्यापुरतें पाहूं

लागला होता. संघशक्ति उत्पन्न होण्याचा संभव कोणाच्याच दृष्टिपथांत येत नव्हता, तीनही देशांत व्यापलेलें बली दैत्याचें साम्राज्य उलथून पाडणें, अगदी अशक्य, असें सर्वांस मनापासून वाटूं लागलें होतें. देवांचे गण एकत्र जमणें अशक्य झालें होतें, देवसम्राट् इन्द्राला दिवसाढवळया रस्त्यावरून फिरणेंही अशक्य झालें होते. स्त्रियांच्या डोळयांतील दुःखाच्या अश्रुधारा बंद होत नव्हत्या, अशा प्रकारें सर्व बाजूंनी विपरीत परिस्थिति उत्पन्न झाली होती. कोणालाच स्वातंत्र्यप्राप्तीचा सरळ मार्ग दिसत नव्हता व त्याची आशाही वाटत नव्हती. अशा पूर्ण निराशामय स्थितीमध्ये वामनाचा जन्म झाला होता. तेव्हा त्याच्या कामगिरीचें महत्त्व किती होतें, हें कोणासही सहज समजण्यासारखें आहे.

त्या वेळच्या वीरांगनांच्या सर्व महत्त्वाकांक्षा वामनाच्या अंतःकरणांत एकवटल्या होत्या. बलीदैत्य कांही सामान्य धोरणी नव्हता. त्याने स्वतः वैदिक धर्माची दीक्षा घेऊन तो स्वतः यज्ञयाग करीत असे व आपण पूर्ण-पणाने प्रजेचेच आहों, असें भासवीत होता; पण या तीनही देशांतील लोकांनी आपलें डोकें वर काढूं नये, यासाठी जें करणें आवश्यक होतें, तें सर्व करण्यांत मात्र तो कांहीएक कसूर करीत नव्हता. भारतीय लोक धर्माच्या बाबतींत पहिल्यापासून भोळसर असल्यामुळे बलीराजा स्वतः यज्ञ करतो आहे, हें पाहून ते त्याची वाहवाच करीत होते ! पण त्याची राष्ट्रावरील पकड केवढी जबरदस्त आहे, याची फारच थोड्यांना कल्पना होती. परदेशीय मनुष्य जो राजकारणांत मुरलेला आहे तो जर जित लोकांचे गुणानुवाद गाईल किंवा जित लोकांचा धर्म स्वीकारील, तर त्यांत त्याचा राजकीय हेतु कांहीतरी आहे कीं काय, हें आधी पाहिलें पाहिजे, हीच शिकवण येथे मिळते. त्रिविष्टपादि तीनही राष्ट्रांवर आपली छाया सर्वकाल रहावी, यासाठी वैदिक धर्म स्वीकारणें हें बलीचें सोंग होतें, ही गोष्ट वामनाच्या पूर्णपणाने मनांत ठसली होती.

म्हणून त्याने बलीचा यज्ञ चालला असतां "सोमाभिषव" होण्याच्या वेळीं यज्ञामध्ये प्रवेश केला व तो बलीच्या पुढे आला. याजक लोक सोमाचा रस काढण्याच्या तयारीस लागले होते, या वेळीं यज्ञसदःस्थानीं तेजस्वी वामन-मूर्ति येऊन उभी राहिली.

## वामनाची पूर्वतयारी.

वामन लहान असला तरी स्वतः तो उत्तम राजकारणपटु असून, प्रसंगीं स्वतः चार हात करण्यासही समर्थ होता. युद्धाचे डावपेच, मल्लयुद्धाचे डाव व इतर चढाईच्या योजना यांची त्याला पूर्णपणें माहिती होती. म्हणूनच वामनबटूने बलीच्या यज्ञमंडपांत स्वतः येण्यापूर्वी गुप्त वेषाने विश्वासाचे शेकडो वीर दर्भमुष्टींत, धोतरांत, छाटींत व कृष्णाजिनांत आपापलीं शस्त्रास्त्रें लपवून व दडवून यज्ञाच्या सदस्यांमध्ये आधीच पाठवून दिले होते व ते ब्राह्मणमंडळींत गुप्तपणाने आधीच जाऊन बसले होते. इतर ब्राह्मणां-प्रमाणेच यांच्याही टिळेटोप्या असल्यामुळे यांच्याबद्दल कोणास कांहीएक संशय आला नाही. याप्रमाणे कडेकोट पूर्वतयारी केल्यानंतर स्वतः वामन बटु ब्रह्मचाऱ्याच्या वेषाने कौपीन, दंडकमंडलु व छाटी, लंगोटी घेऊन यज्ञमंडपांत शिरून बलिदैत्याच्या पुढे येऊन उभा राहिला. वयाने अगदी लहान, पण अत्यंत तेजस्वी, दिसावयाला छोटा पण बुद्धीने थोर, आकाराने लहान पण कृतीने महान्, थोडे पण गंभीर शब्द बोलणारा, असा वामनासारखा ब्राह्मण-कुमार बलिदैत्याने यापूर्वी कधींच पाहिला नव्हता. त्याचें तें असामान्य तेज पाहून बलिराजालाही फार कौतुक वाटलें व म्हणून बलीने त्याचें स्वागत करून त्याला काय पाहिजे तें माग, म्हणून सांगितलें. वामनाने तीन पावलें भूमि मागितली. बलीने त्याची समजूत केली व म्हटलें की, कांहीतरी अधिक माग; पण वामनाने आपला हट्ट सोडला नाही.

अशी विपरीत मागणी मागणारांच्या मागणींत कांहीतरी श्लेष असतो,

तो श्लेष जाणतां आला तर धास्ती नसते; नाही तर समूळ विनाश होतोच होतो. वामनाच्या "त्रिपाद भूमि" शब्दांतील श्लेष स्पष्ट हा होता की "तिबेट, भरतखंड व पाताल यांतील सर्व भूमि मला दे!" पण हा अर्थ बलीला समजणें अशक्य होतें; कारण आपल्या विरुद्ध तरुण ब्राह्मणसमाजाने कांही-तरी क्रांतिकारक कट केला आहे व त्या कटांत बरेच देववीरही संमिलित झाले आहेत, या गोष्टीची जाणीवसुद्धा बली दैत्याला नव्हती, यामुळे तो अगदी बेसावध होता.

बली दैत्य स्वतः व त्याचे सर्व वीर जरी पूर्ण बेसावध होते, तथापि तो मोठाच सम्राट् असल्यामुळे स्वभावतः त्या यज्ञमंडपाजवळ व आंतही शेकडो राक्षसवीर जय्यत उभे होते व कठीण प्रसंग उत्पन्न होतांच बलीचें रक्षण करण्यास सिद्धहि होते.

### आणीबाणीचा प्रसंग.

आपले सर्व वीर यज्ञमंडपांत सशस्त्र तयार व पूर्ण सावध आहेत व शत्रूकडील वीर पूर्ण बेसावध आहेत, याची पक्की खूणगाठ वामनाने जेव्हा बांधली व सर्व वेळ पूर्णपणाने आपणांस अनुकूल अशी आहे, हें जेव्हा त्याने पाहिलें, तेव्हाच त्याने बलीराजाबरोबर "तीन पावलें भूमि" मागण्याचा विनोद चालविला; कारण तो ओळखून होता की, सोमाचें सवन होईपर्यंत आपली अनुकूल परिस्थिति कांही झालें तरी बदलणार नाही.

बलीच्या पुरोहिताला वामनाबद्दल बराच संशय आला असावा किंवा त्याच्या क्रांतीविषयी कांही गुणगुणही समजली असावी; म्हणून त्याने बलीला सावध करण्याची बरीच खटपट केली; पण बलीने त्याचें कांही ऐकलें नाही व ऐकलें असतें तरीहि वामनाच्या पकडींतून त्या वेळीं बली सुटणें अशक्यच होतें.

## बलीवर कुरघोडी.

योग्य संधि येतांच वामनाने बलीला खाली पाडून त्याच्या डोक्यावर आपला पाय ठेवला. हें इतक्या क्षणार्धांत त्याने केलें की, प्रथम तें कोणाच्या लक्ष्यांतही आलें नाही. ऋत्विज यज्ञ करण्यांत, इतर ब्राह्मण वेदघोषांत व इतर जन गप्पा मारण्यांत मग्न झाले होते, अशा संधींत वामनाने बली दैत्याला चीत केलें. ही गोष्ट प्रथम बलीच्या पाहरेकऱ्यांनी पाहिली, तेव्हा ते आरडाओरडा करून म्हणाले—

**अनेन याचमानेन शत्रुणा बटुरूपिणा ।**
**सर्वस्वं नो हृतं भर्तुर्न्यस्तदण्डस्य बर्हिषि ॥ ११ ॥**
**तस्मादस्य वधो धर्मो भर्तुः शुश्रूषणं च नः ।**
**इत्यायुधानि जगृहुर्बलेरनुचरासुराः ॥ १२ ॥**
ते सर्वे वामनं हन्तुं शूलपट्टिशपाणयः ॥ (श्री० भाग० ८।२१)

" अहो ! या याचना करणाऱ्या ब्राह्मणबटुरूपी शत्रूने विश्वासघात करून आमच्या बादशहाचें सर्वस्वच हरण केलें ! आम्ही आपल्या राजाचें संरक्षण केलेंच पाहिजे, म्हणून या भटाच्या मुलाचा वध करणें, हाच आमचा या वेळीं धर्म आहे. असें म्हणून बलीच्या दैत्य सेवकांनी शूल, पट्टिश वगैरे आपापलीं आयुधें घेतलीं व लगेच तीं सज्ज करून ते सगळे दैत्य वामनाचा वध करण्यासाठीं वामनाच्या अंगावर तुटून पडले. "

या वर्णनावरून वामनाने " राज्याची भीक " मागितली व ती बलीने खुषीने दिली, हें खरें नव्हे, हें समजण्यासारखें आहे.

**तानभिद्रवतो दृष्ट्वा दितिजानीकपानृप ।**
**प्रहस्यानुचरा विष्णोः प्रत्यषेधन्नुदत्युधाः ॥१५॥**(श्री० भाग० ८।२१)

" ते दैत्य आपल्या पुढारी वामनावर चालून येत आहेत, असें पाहून

किंचित् हसून आपलीं आयुधें वर उगारून वामनाच्या अनुयायांनी त्या दैत्य-सैनिकांचा प्रतिबंध केला."

वामनाने आपली पूर्व तयारी जर इतकी कडेकोट केली नसती, तर या वेळीं त्याचा अंतच झाला असता; पण वेळप्रसंगाचें पूर्ण अनुसंधान करून वामनाने योग्य दिशेने जी आपली अपूर्व तयारी केली, ती या वेळीं त्याच्या फारच उपयोगी पडली. बली दैत्य व त्याचे अनुयायी पूर्ण बेसावध व वामन आणि त्याचे अनुयायी पूर्ण सावध असल्यामुळे व असा हल्ला होईल, याची पक्की जाणीव वामनाच्या अनुयायांना असल्यामुळे या झटापटीमध्ये वामनाचा जय झाला, हें स्वाभाविकच झालें. अशा रीतीने वामनाने आपल्या अनुयायांकडून सर्व दैत्यांचा पूर्ण मोड केल्यानंतर त्याने बलीला पकडून त्याला दोऱ्यांनी जखडून बांधून कैद केलें. याचें वर्णन पहा—

> बबंध वारुणैः पाशैर्बलिं सौत्येऽहनि क्रतौ ॥२६॥
> हाहाकारो महानासीद्रोदस्योः सर्वतो दिशम् ॥
> गृह्यमाणेऽसुरपतौ विष्णुना प्रभविष्णुना ॥२७॥
>
> (श्री० भाग० ८।२१)

"सोमरसाचें हवन करण्याच्या दिवशीं बलीला वारुण पाशांनी जखडून बांधलें. तेव्हा एवढ्या मोठ्या सम्राटाला वामनाने कैद केलें, हें पाहून चारही दिशांमध्ये मोठी गडबड उडून गेली."

बलीला कैद केल्यानंतर राज्यामध्ये सर्वत्र दैत्यांची धरपकड झाली. कांही ठिकाणीं दैत्यांनी हाणमार करण्याची खटपट केली; पण त्यांचा बादशहाच कैद झाल्यामुळे कोणालाही अधिक उत्साह राहिला नाही. सर्व दैत्य, असुर, दानव व राक्षस घाबरून गेले; त्यामुळे वामनाच्या सावध अनुचरांना आपला बेत उत्तम रीतीने तडीस नेतां आला. शेवटीं आपल्या दैत्यांचा विनाकारण संहार होऊं नये, म्हणून स्वतः बलीनेच त्या सर्व दैत्यसैनिकांना

वामनाच्या स्वाधीन होण्यास सांगितलें; तेव्हा सर्वत्र शांतता झाली व वामनाने दैत्यसाम्राज्य नष्ट होऊन देव व आर्य यांना पूर्ण स्वातंत्र्य प्राप्त झालें, अशी दौंडी पिटविली व इंद्राचें निशाण पुनः अमरावतीवर फडकूं लागलें.

नंतर बलीराजाचे फार हाल करूं नयेत, म्हणून पुष्कळांनी बऱ्याच शिफारसी केल्या व स्वतः बलीनेही बिनशर्त माफी मागितली; तेव्हा त्याच्या अनुयायांसह त्यास पाशांतून सोडलें, तेव्हा–

इत्युक्त्वा हरिमानम्य ब्रह्माणं सभवं ततः ।
विवेश सुतलं प्रीतो बलिर्मुक्तः सहासुरैः ॥३॥ (श्री० भाग० ८।२३)

" बलीने वामनाच्या सर्व शर्ती कबूल केल्या. नंतर वामनाला त्याने नमस्कार केला व आपल्या अनुयायांसह सुतल देशांत जाऊन राहिला. "

हा सुतल देश कोकणाचा एक भाग होय. चौताल कोकण आहे व त्या प्रत्येक तालाचीं अतल, वितल, सुतल आदि नांवें आहेत. सगळ्या कोकण-पट्टीचे १४ विभाग केले, तर तिसरा सुतल हा विभाग राजापूर–रत्नागिरीच्या आसपास कोठेतरी येतो. या ठिकाणीं बलिदैत्याचें शेवटचें आयुष्य गेलें. म्हणजे वामनाने या ठिकाणीं एक जो मोठा शहाणपणा केला, तो हा की पूर्वी-प्रमाणे बलीला आपल्या अनुयायांसह दैत्यदेशांत जाण्यास मोकळीक दिली नाही; कारण तसें केलें असतें, तर बलीने पुनः चढाई करण्यास कमी केलें नसतें व पुनः रक्तपात करण्याचा प्रसंग ओढवला असता. पुनः पूर्व इति-हासाची पुनरावृत्ति होऊं नये, म्हणून वामनाने बलीला नांवाचा मुक्त केला खरा; पण त्याला कोकणांत नजरकैदेंत ठेवून दिला. तेथेच त्याचे सर्व अनुयायी राहिले. वामनाने बलीच्या एकाही अनुयायास त्यांच्या दैत्यदेशांत परत जाऊं दिलें नाही; हें त्याचें फारच मोठें शहाणपण अत्यंत वाखाणण्यासारखें आहे.

यानंतर इंद्राचें राज्य इंद्राला दिलें व आर्य-मांडलिकांना आपल्या संस्थानांत राज्य करण्यास सांगून व सर्वांस जिवंत राजनीतीचा उपदेश देऊन ब्रह्मचारी वामन आपल्या तपस्येस निघून गेला. तात्पर्य, ऐतिहासिक दृष्ट्या विचार करतां असें स्पष्ट म्हणावें लागतें की, वामनाच्या महत्वाच्या कामगिरीशीं दुसऱ्या कोणाच्याहि कामगिरीची तुलना होऊंच शकत नाही.

## वामनावताराचा संदेश.

**“ स्वकीय स्वराज्याची भूक परकीय सुराज्याने भागत नाही व भागतां कामा नये. ”** हा राजकारणांतील अति महत्त्वाचा सिद्धांत वामनावताराने जगास इतक्या प्राचीन कालांत सांगितला आहे.

बलीचें राज्य सुराज्य होतें, यांत शंका नाही; पण स्वराज्याच्या ऐवजीं तें कोणीही स्वीकारणार नाही व कोणाही समंजस माणसाने तें तसें स्वीकारतां नये. हें मोठें तत्त्व वामनावताराने सांगितलें, म्हणून जग असेपर्यंत सर्व राजनीतिज्ञ पुरुष वामनाचे गोडवे गातील, यांत कोणालाच शंका नाही.



# धृतराष्ट्राची चिन्ता

जेव्हा भारतीय युद्ध सुरू होण्याचा रंग दिसूं लागला, दोनही पक्षांचीं सैन्यें कुरुक्षेत्राच्या रणभूमीमध्ये एकमेकांशीं भिडण्याच्या उद्देशाने एके ठेकाणीं जमलीं, दोनही पक्षांच्या सेनापतींनी आपापले सेनाव्यूह रचले व आता युद्ध टळत नाही, अशी खात्री झाली, तेव्हा धृतराष्ट्राची चिन्ता अतिशय वाढली व तो संजयास चिन्तातुर स्वराने म्हणतो—

धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।
मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत संजय ॥( भ० गी० १।१ )

" हे संजया ! धर्माचें पुण्यक्षेत्र अशा प्रसिद्ध कुरुक्षेत्रामध्ये युद्ध करण्या-च्या इच्छेने एकत्र जमलेल्या माझ्या व पाण्डूच्या मुलांनी पुढे काय बरें केलें? "

या विचारण्यामध्ये धृतराष्ट्राच्या मनांत चिन्तेचा केवढा मोठा भयंकर ओघ वहात होता, तें स्पष्ट दिसत आहे. अशी मोठी चिन्ता धृतराष्ट्राला कां वाटावी, ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे.

पाशवी शक्तीच्या दृष्टीने जर पाहिलें, तर धृतराष्ट्राजवळ पाशवी सामर्थ्य पाण्डवांच्या किती तरी पट अधिक होतें. धृतराष्ट्राचें सैन्यबल मोठें, भीष्मद्रोणासारखे अद्वितीय योद्धे, राष्ट्रांतील सर्व धन अगदी हातामध्ये; याशिवाय साम्राज्यावर अनियंत्रित प्रभुत्व असल्यामुळे या प्रभुत्वामुळे जें पाठबळ मिळतें, तें निराळेंच. इतकें प्रचंड पाशवी सामर्थ्य असतांही धृतराष्ट्र असा चिन्तातुर कां व्हावा ?

## धृत-राष्ट्र व हृत-राष्ट्र.

धृतराष्ट्राच्या चिन्तेचें कारण जर शोधावयाचें असेल तर तें "धृत+राष्ट्र" या शब्दांत दिसेल. तो "धृत+राष्ट्र" होता, म्हणूनच चिन्तेने व्यापलेला होता. तो " धृत+राष्ट्र " नसता तर त्यास चिन्ता त्रास देऊं शकली नसती.

' धृत ' म्हणजे शक्तीने धरून ठेविलें आहे, ' राष्ट्र ' म्हणजे देश किंवा राज्य ज्याने, तो धृतराष्ट्र होय.

पण्डूचें राज्य, तें वंशाधिकाराप्रमाणे पांडवांनाच मिळावयाचें. राष्ट्राचा कायदा व सर्व शिष्टांची संमति पाण्डवांचेंच राज्य आहे, असें सांगत आहे. हें राज्य पाण्डवांस पचूं द्यावयाचें नाही; हरप्रयत्न करून पाण्डवांकडून तें हरून घ्यावयाचें व आपलें नसतांही तें आपण पचवावयाचें, हा आग्रह " धृत-राष्ट्र " या शब्दांत स्पष्ट दिसत आहे. हा शब्द या सम्राटास जो लावला आहे, तो हा भावार्थ व्यक्त करण्याच्या उद्देशानेच योजिला आहे. दुसऱ्याचें लुबाडलेलें राज्य कायमचें आपल्या ताब्यांत ठेवण्याचा प्रयत्न करीत असल्यामुळे "धृतराष्ट्र" हा या अशा एवढ्या चिन्तेमध्ये होरपळलेला दिसत आहे.

" धृत+राष्ट्र " व " हृत+राष्ट्र " असे दोन पक्ष नेहमी असतात व त्यांमध्ये नेहमी युद्ध जुंपत असतें. सर्व जगाच्या इतिहासामध्ये आपणांस

हीच गोष्ट आढळेल. चिन्ता ही नेहमी ‘ धृत–राष्ट्रा ’ लाच लागणार; कारण या युद्धामुळे ‘ आपण अन्यायाने मिळविलेलें सर्व राज्य एकदम आपल्या हातांतून जाईल, ’ अशी भीति त्यालाच असते. जे ‘ हृत–राष्ट्र ’ असतात, ते जरी युद्धभूमीवर आलेले असले, तरी त्यांस असल्या चिन्तेचा लवलेशही असणें शक्य नाही; कारण त्यांचें स्वराज्य आधीच दुसऱ्यांनी हरलेलें असल्यामुळे ज्याबद्दल चिन्ता करावयाची, तेंच त्यांच्याकडे नसतें. त्या कारणाने त्यांना चिन्ता सतावत नाही. जेव्हा युद्ध सुरू होतें, तेव्हा ‘ हृत–राष्ट्र ’ अगदी शान्त असतात, त्यांना चिंता त्रास देत नाही. ते म्हणतात की, ‘ आमचा युद्धांत पराजय झाला, तरी आमच्या ‘ हृत–राष्ट्र ’ शब्दाने व्यक्त होणाऱ्या स्थितींत फरक होऊन आणखी त्याच्या खालची स्थिति प्राप्त होईल असें नाही. ’ तेव्हा हृतराष्ट्रीयांचा पराभव झाला तरी परिस्थिति तीच राहणार, हा विश्वास त्यांस असतो. बरें, जर जय मिळाला तर आपलें गेलेलें स्वराज्य आपणांस परत मिळेल, ही खात्री असते. इतकेंच नव्हे तर फायदा होण्याची अर्धीअधिक खात्री असल्यामुळे यांना उत्साहच अधिक वाटत असतो.

हीच विचारसरणी लक्ष्यांत घेऊन ‘ धृतराष्ट्रीयां ’ ची बाजू पहावी, कारण युद्ध सुरू झालें व जर त्यांत यांस अपयश आलें, तर यांचा सर्वस्व-नाश होत असतो. बरें, जर यश आलें तर यांना आणखी कांही मिळेल, असें शक्य नसतें; कारण हृतराष्ट्रीयांकडून जें काय मिळणें शक्य असतें, तें सर्व धृतराष्ट्रीयांनी या पूर्वीच मिळविलेलें असतें. त्यामुळे जय मिळाला तरी यांचा कांहीच लाभ होणें शक्य नसतें. युद्धामध्ये धन, मनुष्यबल आदि अनेक शक्ति यांच्याजवळ असलेल्या नाश पावतात, ही हानि निराळीच. या कारणाने जय मिळाला तरी यांना कांही फायदा नाही; पराजय झाला तर सर्वस्वनाश व दोनही स्थितींत बलहानि ही होणारच. तात्पर्य, दोन्ही स्थितींत धृतराष्ट्रीयांचें नुकसान होणारच, अशी पक्की खात्री असते. यासाठी युद्ध

होऊं नये, सर्वत्र शान्ति रहावी अशी धृतराष्ट्रीयांची मनापासून इच्छा असते.

हृतराष्ट्रीयांना नुसती मृत शान्ति केव्हाच नको असते; त्यांना आपण दोन हात करावे व गेलेलें स्वराज्य मिळवावें, असें वाटत असल्यामुळे स्वराज्यासाठी युद्ध करण्याची संधि आली, तर त्यांस मोठी पर्वणी आली आहे, असें वाटतें; म्हणून युद्ध उपस्थित झालें तर हृतराष्ट्रीयांना आनंद वाटतो व धृतराष्ट्रीयांना मोठी चिन्ता वाटते.

असला हा चिन्तेचा अग्नि सम्राटांचीं अन्तःकरणें नेहमी जाळीत असतो. सम्राटांचे बाहेरचे डामडौल व बाहेरच्या शेख्या कितीही चालोत; कोणी स्वराज्यासाठी युद्ध चालविलें, म्हणजे यांचें हृदय अशा प्रकारच्या चिन्तेने व्याकुल होत असतें.

## आंधळा धृत-राष्ट्र.

"धृतराष्ट्र" नेहमी आंधळाच असतो ! कां बरें त्याने आंधळें असूं नये ? एक तर त्याला त्याच्याजवळच्या पाशवी बलाने आंधळेपण येत असतें; पाशवी बल वाढलें म्हणजे तें आपल्या मालकास आंधळें केल्याशिवाय रहात नाही. पाशवी बल वाढलें म्हणजे त्यास कर्तव्य व अकर्तव्य समजेनासें होतें. 'मी बलवान् आहें, तेव्हा इतर सर्व निर्बल लोकांकडील राज्यें, धनें व भोग-साधनें हीं माझींच आहेत,' असें त्यास वाटतें व याच बलाच्या कारणाने तो इतर अशक्त लोकांस लुबाडावयास लागतो व त्यास असेंही वाटतें की, 'या इतर अशक्त लोकांस स्वराज्य चालविण्याची केव्हाच योग्यता नव्हती व पुढेही नसणार ! राज्य कोणाचेंही असो, तें आपल्याच उपभोगासाठी मिळालें पाहिजे. अशक्तांनी तें न दिलें, तर तें त्यांच्याकडून आपण बळजबरीने घेऊं; आमच्याकडे शक्ति आहे, ती यासाठीच आहे.' हें यांचें तत्त्वज्ञान !

याप्रमाणें हा धृत-राष्ट्र आपल्या बळाच्या घमेंडीने हवे तसे अत्याचार

करीत सुटतो; पण जेव्हा याच्या जाचाने गांजलेले लोक आपली संघटना करून याच्या विरुद्ध उठतात व जेव्हा ते समोरासमोर युद्धासाठी दण्ड ठोकून उभे राहतात, तेव्हा मात्र याच्या पोटांत धडकी भरते.

पाशवी शक्ति, धनदौलत व अनियंत्रित अधिकार यांमुळे फुगलेला अरेराव मनुष्य इतका आंधळा बनतो की, त्याला कांहीच दिसत नाही. धर्म-अधर्म यांची तो पर्वा करीत नाही; खरें किंवा खोटें पाहण्याची त्याला कधीच गरज भासत नाही ! तसेंच न्याय-अन्याय सर्व बलाने तोलतां येतात, असें तो समजतो ! त्याला असें वाटतें की, आपण करूं ती नीति व आपण म्हणूं तेंच योग्य कर्तव्य होय.

धृतराष्ट्र हा शारीरिक दृष्टीने आंधळा असो किंवा नसो, तो मानसिक व आत्मिक दृष्टीने आंधळा होता; यामुळेच त्यास अशा घोर चिन्तेमध्ये पडावें लागलें होतें.

## आंधळ्याचे आंधळे अनुयायी !

धृतराष्ट्र स्वतः आंधळा होता; प्रत्यक्ष गोष्टी त्याच्या समोर घडत असूनही त्या त्यास दिसत नव्हत्या. महासाध्वी पतिव्रता गांधारी देवीही डोळ्यांनी चांगली डोळस होती; पण तिला पातिव्रत्यामुळे पतीसाठी आपल्या डोळ्यांवर पडदा ओढून घ्यावा लागला ! लोक म्हणतात की, ती महासाध्वी असल्यामुळे व नवरा आंधळा असल्यामुळे तिने आपल्या डोळ्यांवर फडकें बांधलें होतें. हें खरें असेलही; पण अशा करण्याचा अर्थ नवऱ्याच्या विरुद्ध जावयाचें नाही, हाही एक आहे. यामुळे धृतराष्ट्र करील तें हिला प्रमाण होत होतें. धृतराष्ट्राने बहुधा पाण्डवांशीं पुष्कळ अन्यायच केले व पुष्कळ प्रसंगीं हिने एक अक्षरही उलट उच्चारलेलें नाही. तेव्हा सर्वच अर्थांनी ही डोळे असून आंधळी बनली होती, हें उघड आहे. आंधळ्याचे अनुयायी असेच डोळे असूनही चांगले आंधळे बनत असतात !

अपशकून होऊं लागले म्हणजे गांधारीला वाटे की, आपल्या मुलांचें वाटोळें होईल, यासाठी तें न व्हावें, म्हणून ही स्वार्थानेच आपल्या पोरांनी चालविलेल्या अत्याचारांच्या विरुद्ध बोले ! पहिल्या प्रथमच जर हिने दुःशासनाला आपल्या सर्व शक्तीने प्रतिबंध करून थांबविलें असतें, तर कुलाचें यश बचावलें असतें; पण पातिव्रत्यामुळे म्हणा किंवा पुत्रप्रेमाने म्हणा, डोळे असून आंधळी झाल्यामुळे कुलाचें नांव बद्दू झालें तें झालेंच.

धृतराष्ट्राच्या मनांत प्रारंभापासून होतेंच की, कांही उपायाने जर पांडवांचें शल्य बाहेरच्या बाहेर काढून टाकतां आलें, तर फार चांगलें होईल; म्हणून बाहेरून तो पाण्डवांवर प्रेम करी व आंतून त्यांच्या घात करण्याच्या योजनेस संमति देई. साम्राज्य आपल्या मुलांच्या हातांत असावें, ही मनांतून त्याची प्रबल इच्छा होती.

धृतराष्ट्राच्या मुलांचीं नांवेंही कशीं आहेत, तीं पहा– दुर्योधन, दुःशासन, दुःसह, दुःशल, दुर्धर्ष, दुष्प्रधर्ष, दुर्मर्षण, दुर्मुख, दुष्कर्ण, दुर्मद, दुर्विगाह, दुर्विमोचन, दुष्पराजय, दुराधर इ० हीं मुलांचीं नांवें ! यांची भगिनी दुःशला ! यांच्या नांवांचा प्रारंभही ‘ दुः ’ म्हणजे दुःख, दुष्टता, दुष्ट भाव अशा अर्थांच्या सूचक शब्दापासून होत आहे. शौर्य, वीर्य, पराक्रम, यांच्या दृष्टीने जरी या शब्दांत कांही वाईट नसलें, तरी यांच्या शौर्यवीर्याचा उपयोग दुष्ट बुद्धीसाठीच झालेला असल्यामुळे यांच्या शौर्याचा प्रारंभ व शेवट सर्व शोक, चिंता, दुःख यांतच झालेला आहे. आंधळयाची संतति ही अशी आहे.

‘धृत+राष्ट्र’ दुसऱ्याचें राष्ट्र अन्यायाने आपल्या ताब्यांत घेऊन, तें अन्यायाने आपल्या आधीन कायमचें कसें राहील, याची विवंचना करीत असल्यामुळे, तो धर्माप्रमाणे दोषी असतो व याच कारणाने त्याचे जे जे अनुयायी असतात, ते सर्व त्याला विरोध करीत नसल्यामुळे त्याच्या दोषांमुळे

तेही दोषीच होत असतात. याच कारणास्तव धृतराष्ट्राचा वडील मुलगा 'सुयोधन' असतांही 'दुर्योधन' या नांवाने प्रसिद्ध झाला. ज्यांचा मुख्य नेता आंधळा असेल, त्यांची गति अशीच असते.

## सामुदायिक पाप.

'धृत–राष्ट्रा' चा पक्ष सामुदायिक पाप करणारा असतो. त्याची राजनीति सामुदायिक पाप करण्याची असते. यामुळे त्याच्या अनुयायांमध्ये जरी कोणी पुण्यशील पुरुष असले, तरी ते पाप्यांप्रमाणे दण्डनीय समजले जातात. हीच अवस्था भीष्मपितामह व द्रोणाचार्य आदिकांची झाली होती. वास्तविक रीतीने पाहिलें असतां हे लोकोत्तर पुरुष ज्ञानी, तेजस्वी, पुरुषार्थी, धार्मिक व उदार असे होते.

परंतु यांचें शौर्य दुष्ट साम्राज्यवादी धृतराष्ट्रपुत्रांच्या अनीतीच्या पक्षाकरिता लढण्यांत गेलें. याच कारणासाठी हे थोर पुरुष असतांही असत्पक्षामध्ये राहिल्यामुळे वध करण्यास योग्य समजले गेले !

तसेंच धृत-राष्ट्राच्या बाजूच्या लोकांमध्ये कोणी उदारमतवादी, कोणी धर्मवादी, कोणी समतावादी, कोणी पुराणमतवादी, असे अनेक पक्ष असतात व त्या पक्षांत कांही लोक खरोखर सज्जनही असतात; पण त्या पक्षाकडून सामुदायिक पाप होत असल्यामुळे व संघाचें पाप सर्व संघाला दूषित करीत असल्यामुळे, ते सर्व दोषी आहेत, वध्य आहेत, असेंच समजलें जातें.

वास्तविक पाहिलें तर धृतराष्ट्राच्या पक्षांतील भीष्म पितामह व द्रोणाचार्य 'हे पाण्डवांची मागणी न्याय्य आहे, पाण्डवांस स्वराज्य मिळालेंच पाहिजे, त्यांना स्वराज्य देण्याच्या कामीं कालहरण केलें जात आहे व निरनिराळीं विघ्नें उत्पन्न केलीं जात आहेत, हें ठीक नव्हे.' असें वारंवार प्रतिपादन करीत होते. त्यांचें स्पष्ट असें मत होतें की, 'धृतराष्ट्राचा पक्ष अन्यायाचा आहे व धर्मराजाचा पक्ष न्यायाचा आहे.'

साम्राज्यवादी लोक जेव्हा अधिकाराच्या, वैभवाच्या व पाशवी शक्तीच्या मदाने मत्त झालेले असतात, त्या वेळीं ते कोणाचाही सदुपदेश ऐकण्यास तयार नसतात. भूतकाळांतील साम्राज्यवादी समतेचा सदुपदेश ऐकण्यास तयार झाले असल्याची इतिहास साक्ष देत नाही; वर्तमानकाळचे साम्राज्यवादीही तसेच हट्टी दिसत आहेत; यावरून भविष्यकालींही त्यांचा स्वभाव बदलेल, हें संभवनीय दिसत नाही. ज्या वेळीं हे पूर्णपणें पराभव पावतात, त्याच वेळीं यांस सत्य दिसूं लागतें व सदुपदेश ऐकण्यास हे तयार होतात; पण त्या वेळीं त्याचा कांही उपयोग नसतो.

## स्वतःच्या पापाने मरण.

साम्राज्यवादी जे मरतात, ते आपल्या स्वतःच्या पापानेच मरत असतात. ते साम्राज्य चालवीत असतां व अधिकार गाजवीत असतांही— **निहताः पूर्वमेव** । ( भ० गी० ११।३३ ) ' ते पूर्वीच मेलेले असतात. ' यांचा मृत्यु त्यांच्या पापांमुळे झालेला असतो. त्यामुळे त्यांचा बचाव करण्यास कोणीही समर्थ नसतो. स्वराज्यवादी हे '**निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्** ॥' ( भ० गी० ११।३३ ) केवळ निमित्तमात्र पुढे उभे रहावे लागतात. ' त्यांनी केलेल्या पापांनीच ते जुलूम करणारे मेलेलेच असतात व ईश्वरीय योजनेने ते मरणारच असतात; म्हणून स्वराज्यासाठीं प्रयत्न करणारांनी युद्ध न केलें, तर साम्राज्यवादी जगतील असा प्रकार मुळीच नसतो—

**ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे । येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ॥**
(भ० गी० ११।३२)

' तुम्ही प्रयत्न केला नाही, तरी ते समोर उभे राहिलेले साम्राज्यशाहीचे वीर कायमपणाने आतां अधिकारावर राहणार नाहीत. ' कारण त्यांच्या पापांमुळे त्यांचे दिवस आतां संपले आहेत. तुम्ही प्रयत्न केला नाही, तर दुसरे कोणी तरी निमित्ताला पुढे उभे राहतील; कारण ते आपल्या

स्वतःच्या पापांनी मेलेले आहेत. त्यांचें सैन्यबल केवढेंही मोठें असलें म्हणून काय झालें? जे आपल्या कर्मांनीच मेलेले असतात, ते जागयावर उभे तरी किती दिवस राहणार? इतर सर्व मृत्यूचा परिहार करतां येतो; पण आपल्या पापांमुळे होणाऱ्या मृत्यूचा मुळीच परिहार करतां येत नाही.

दुर्योधन नेहमी म्हणत असे व धृतराष्ट्राला तें खरेंही वाटत असे की, "आपणांकडे अकरा अक्षौहिणी सैन्य आहे; भीष्म, द्रोण, कर्ण यांसारखे प्रचंड लढवय्ये आहेत; शस्त्रास्त्रांची समृद्धि भरपूर आहे; साम्राज्याचें सर्व धन आपणांकडे साठलेलें आहे व साम्राज्यांतून हवें तितकें सैन्य पैशाच्या जोरावर व अधिकाराच्या बलावर आपणांस उभारतां येण्यासारखें आहे.

'पाण्डवांजवळ फारसें सैन्यबल नाही. त्यांना अधिक सैन्य लागलें, तर तें त्यांस उभारतां येणार नाही; त्यांच्याजवळ धन नाही. जे कांही वीर त्यांच्याजवळ आहेत, त्यांना युद्धकलेचा फारसा अनुभव नाही; कारण कित्येक वर्षे त्यांनी कोणत्याही प्रबल शत्रूशीं युद्ध केलेलें नाही व ते रानावनांत हिंडून दिवस काढीत होते; त्यांच्यांत फारशी संघटना नाही. त्यांपैकी प्रत्येकाचें मन निराळें. धर्म म्हणणार,'शान्ति धरा; आपण अहिंसेच्या मार्गानें जाऊंया.' तर भीम म्हणणार, 'ठोकाठोकी केली पाहिजे,' अर्जुन ऐन वेळेस कसा भांबावून जाईल, याचा नेम नाही व नकुल–सहदेवांची तर कांही किंमतच नाही. पाण्डवांची सर्व भिस्त कृष्णावर आहे; पण त्याने शस्त्र हातीं न धरतां युद्ध न करण्याची प्रतिज्ञा केली आहे. अशी पाण्डवांची स्थिति आहे. तेव्हा त्यांच्या चळवळीचा आम्ही विचार करावा, असें त्यांत कांही नाही.'

केवळ पाशवी बलाचाच विचार केला, तर दुर्योधन म्हणत होता, तें खरें होतें. कौरवांइतकें पाशवी बल पांडवांकडे नव्हतें; पण त्यांचें बल सत्याचें होतें. त्यांची बाजू 'धर्मा'ची होती; त्यामुळे त्यांचें अन्तःकरण त्यांस सांगत असे की, सत्याचाच 'विजय' होणार आहे.

साम्राज्य-रक्षणासाठी कौरवांनी अनेक पापें केल्यामुळे त्यांविषयी जनतेमध्ये एक प्रकारची अप्रियता उत्पन्न झाली होती व सर्वांस असें मनापासून वाटूं लागलें होतें की, कोणत्या तरी आपत्तीने कौरवांच्या साम्राज्याचा नाश व्हावा.

दुर्योधनाचे डोळे शाबूत असतांही त्यास ही वस्तुस्थिति दिसत नव्हती. साम्राज्यवादी डोळे असून आंधळे होतात, ते असे होत ! सगळया जनतेच्या मनांतून पाण्डवांचा 'विजय' व्हावा असें होतें; कारण जनतेला माहीत होतें की, पाण्डवांचा पक्ष सत्याचा असतांही कौरवांनी त्यांना केवळ पाशवी बलामुळे फार गांजलें आहे. नेहमी जनतेच्या मनांत ज्यांचा विजय व्हावा, असें मनापासून असतें, त्यांचाच ' विजय ' होतो; कारण प्रचण्ड जनतेच्या इच्छाशक्तीचा पाठिंबा 'धर्मा' च्या पक्षालाच मिळत असतो; तो निष्कारण अन्यायाने छळणाऱ्या साम्राज्यशाहीस कसा मिळेल ?

दुर्योधनाने आपल्या पाशवी बलाचा जसा विचार केला, तसा पाण्डवांच्या या आत्मिक बलाचा विचार केला नाही; कारण तो आपल्या अतुल पाशवी बलाने उन्मत्त झालेला होता. जरी ही गोष्ट दुर्योधनाच्या लक्ष्यांत आली नव्हती, तरी ती आंधळया धृतराष्ट्राच्या मनांत आली होती. या दृष्टीने हा आंधळा असून डोळस होता, असें म्हटलें तरी चालेल; कारण तो आंधळा असतांही आपल्या सर्व पापांना जाणत होता व याच कारणाने " युद्ध होणार, आता तें टळत नाही " हें समजल्याबरोबर सर्वांपेक्षा तो अधिक भयभीत झाला होता !

## पापांची भीति·

कोणाच्याही मनाला जी भीति वाटते, ती आपण केलेल्या पापांमुळेच वाटत असते. मनुष्य पाप न करील, तर त्यास मुळीच भीति वाटणार नाही. वर धृतराष्ट्राला जी भीति व जी चिन्ता वाटत आहे, त्याचें कारण त्याला

आपल्या पापांचें स्मरण होत आहे हें आहे. तो मनांतल्या मनांत म्हणत आहे की– " आपण भीमाला विष घालून मारण्याचा प्रयत्न तर केलाच ! त्यानंतर त्यास पाण्यांत बुडवून मारण्याची खटपट केली; कुन्तीसह सर्व पाण्डवांना लाक्षागृहामध्ये जाळून मारण्याचा यत्न करण्यासही मागेपुढे पाहिलें नाही ! सर्व पाण्डवांची धर्मपत्नी द्रौपदी हिला भर सभेंत नग्न करण्याची खटपट केली; तिला अनेक अपशब्द बोलून छळलें; पाण्डवांचें राज्य कपटद्यूताने हरून घेतलें; त्यांना वनांत पाठवलें, तेथे त्यांना पुष्कळ छळलें; नंतर त्यांना अज्ञातवासांत राहण्याचे असह्य कष्ट दिले; त्यांनी धर्माप्रमाणे प्रतिज्ञा पूर्ण केली व आता ते ' आपलें राज्य आपणांस परत द्या, ' म्हणून मागत आहेत; पण आम्ही तें त्यांस देत नाहीं; युद्धाशिवाय सुईच्या अग्राइतकीसुद्धा भूमि मिळणार नाही, असें आम्ही त्यांस सांगितलें. ते पाण्डव धर्माप्रमाणे चालले व आम्ही अधर्म करतों, हें त्यांनी जगाच्या नजरेस आणून दिलें; शक्ति असूनही त्यांनी अत्याचार केले नाहीत. आम्हीमात्र त्यांच्यावर भयंकर अत्याचार केले; ' तुम्ही प्रतिज्ञेप्रमाणे वागा म्हणजे तुमचें राज्य तुम्हांस देऊं. ' असें आम्ही त्यांना अनेक वेळा आश्वासन दिलें; पण तें पालन करण्याची वेळ येतांच आम्ही तें पाळलें नाही. आम्ही त्यांस स्वराज्य परत देण्याचीं वचनें दिलीं, तीं स्वराज्य त्यांस देण्याच्या इच्छेने दिलेलीं नव्हतीं, तर कोठून तरी कालहरण व्हावें, यासाठीच तीं दिलीं होतीं. आम्ही इतके अत्याचार केले खरे; पण पाण्डव आपल्या वचनाप्रमाणे वागले व केवळ तडजोडीसाठी म्हणून 'आम्हांस पांच गावें तरी द्या,' अशी त्यांनी शेवटची मागणी केली; पण तेवढी अगदी अल्प मागणीसुद्धा आम्ही मान्य केली नाही व ' युद्धाशिवाय तुम्हांस कांहीएक मिळणार नाही, ' असें त्यांस स्पष्ट सांगितलें."

हीं सर्व पातकें मूर्तिमन्त उग्र रूप धारण करून त्याच्यापुढे नाचत आहेत व त्यामुळे त्यास आपला नाश जवळ आला अशी खात्री वाटत आहे.

धृतराष्ट्राची ही चिन्ता आहे व या कारणाने तो चिन्तातुर होऊन संजयास विचारीत आहे की, 'युद्धाचें पुढे काय झालें ?'

## धर्मवचनांचा दुरुपयोग.

युद्धाचा वृत्तांत पुढे काय झाला, हें विचारण्याचें आणखीही एक कारण आहे. तें हें की, धृतराष्ट्राने पाण्डवांवर 'धर्म-वचनां'चा प्रयोग केला होता. त्या प्रयोगाचा परिणाम कसा काय झाला, तेंही धृतराष्ट्राला पहावयाचें होतें. अन्यायाने दुसऱ्याचें राज्य हरण करणारे व कपटाने त्या राज्यावर आपला अधिकार स्थिर राखण्याची खटपट करणारे, जित लोकांवर निरनिराळे प्रयोग करतात, त्यांत हाही एक प्रयोग आहे. धर्मवचनांप्रमाणे युद्ध करणें हें पाप आहे असें जित लोकांस भासवणें, अल्पसंतुष्टता चांगली असें त्यांस भासवणें, संपूर्ण विश्वाचें हित साधण्यासाठी स्वराष्ट्राभिमान हा गौण आहे असें भासवणें, इहलोकीच्या यशापयशापेक्षा परलोकाच्या सद्गतीचें महत्त्व त्यांस अधिक भासविणें, जित लोक हे कधीच उन्नत स्थितींत नव्हते असें त्यांस भासवणें व त्यावरून पुढे केव्हाही ते उठणें शक्य नाही अशी त्यांची खात्री करून देणें. जित लोकांची विचारसरणीच निरुत्साही करून टाकणें, इत्यादि अनेक प्रयोग विजयी लोक आपलें हित साधण्यासाठी करीत असतात. असे प्रयोग धृतराष्ट्राच्या पक्षांतील लोकांनी पाण्डवांवर केले होते. सैतानसुद्धा आपल्या कृत्याच्या समर्थनासाठी धर्मवचनांचा आधार देत असतो, असें म्हणतात; त्याचप्रमाणे जित लोकांस कायमचें दडपून टाकण्यासाठी जेते लोक धर्म-वचनांचाही आधार घेत असतात.

महाभारत उद्योगपर्वामध्ये " संजययानपर्व " या नांवाचें पर्व अध्याय २० ते ३२ मध्ये आहे. हे तेरा अध्याय महाभारतामधूनच समग्र वाचावे. हे वाचल्यानंतर वाचकांस अर्जुनास असा विषाद कां वाटला, तें समजेल.

## धृतराष्ट्राची चिन्ता

धृतराष्ट्राला माहीत होतें की, पाण्डव हे जन्मतः धार्मिक वृत्तीचे आहेत; म्हणून ते धर्मवचनांच्या प्रयोगाने फसले जातील. यासाठी त्याने पाण्डवांजवळ संजयाला पाठवलें व त्याच्याकडून पाण्डवांवर हा धर्मवचन-प्रयोग केला. हा प्रयोग अर्जुनाच्या मनावर बिंबला व युद्धांत उभें राहतां-क्षणींच त्याच्या मनावर त्या नुकत्याच ऐकलेल्या उपदेशाचा परिणाम झाला व त्यामुळे खिन्न होऊन त्याने युद्धापासून निवृत्त होण्याचा निश्चय श्रीकृष्णा-जवळ व्यक्त केला. खात्रीने असें होईल, असें धृतराष्ट्र जाणतच होता व यासाठी आपण केलेला प्रयोग साधला कीं नाही, हें जाणून घेण्यासाठी तो संजयाला विचारीत आहे की, 'दोन्ही सैन्यें एके ठिकाणीं जुळलीं, त्या-पुढे काय बरें घडलें ? ' म्हणजे आम्ही जो धर्मवचनप्रयोग पाण्डवांवर केला, त्याचा परिणाम व्हावयाचा तसा आम्हांला अनुकूल झाला कीं नाही ? हें जाणण्याची आतुरता धृतराष्ट्राच्या मनांत स्पष्ट दिसत आहे.

धृतराष्ट्राने हा प्रयोग कसा केला, तें आता पहा– ( उद्योगपर्व अ० २० मध्ये ) धृतराष्ट्र संजयाला सांगत आहे की, ' हे संजया ! तूं पांडवांच्या छावणीमध्ये जा व त्यांस सांग की, धृतराष्ट्र मनापासून पाण्डवांचें हित करूं इच्छीत आहे. धृतराष्ट्र नेहमी पांडवांचे गुण वर्णन करीत असतो व वनवासां-तून पाण्डव परत आलेले पाहून, त्यास मनापासून आनंद झाला आहे. धृतराष्ट्राच्या मनांतून पाण्डवांशीं युद्ध करावें, असें मुळीच नाही; इतकेंच नव्हे तर पाण्डवांशीं सख्य घडावें, अशीच त्याची मनापासून इच्छा आहे; म्हणून पाण्डवांनीही तडजोड करण्यास तयार व्हावें. हे संजया ! अशा प्रकारच्या गोष्टी तूं पांडवांस सांग की, ज्यांच्या योगाने पांडवांचा युद्धविषयक उत्साह कमी होऊन जाईल व त्यांची सर्व चळवळ थंड पडेल. '

यावरून स्पष्ट होत आहे की, धृतराष्ट्र हा पाण्डवांशीं सख्य करूं इच्छीत नव्हता, शान्ति स्थापन व्हावी असें त्यास मनापासून वाटत नव्हतें व

पाण्डव सुखरूप आल्याने त्यास आनंदही झालेला नव्हता. हा सर्व प्रयत्न करण्यांत धृतराष्ट्राचा अन्तःस्थ हेतु असा होता की, पाण्डवांचा युद्धविषयक उत्साह नाहीसा व्हावा व एकदा त्यांचा उत्साह खचला म्हणजे मग आपणांस जें साधावयाचें तें सहजच साधेल. साम्राज्यवादी लोकांची राजनीति किती खोल असते, तें पहा.

याप्रमाणे धृतराष्ट्राचा संदेश घेऊन संजय पांडवांकडे गेला. पाण्डवांशीं त्याच्या बऱ्याच सामोपचाराच्या गोष्टी झाल्या. त्यानंतर तो पाण्डवांस उद्देशून म्हणाला—

(म० भा० उद्योगपर्व० अ० २४) 'हे धर्मराजा! तुम्ही पांडव खरोखरच, सज्जन आहां. तुमच्यासारखे धर्मात्मे तुम्हीच! कितीही कठीण प्रसंग आला तरी तुम्ही धर्ममर्यादेचें उल्लंघन म्हणून करणारच नाही. वाः! काय हो तुमची ही धर्मश्रद्धा! या जगांत खरोखर तुम्हीच धन्य आहां. आजपर्यंत तुम्ही कौरवांच्या शेकडो अपराधांची क्षमा केलीत, असे तुम्ही धर्मात्मे असतां आता तुम्ही आपल्याच भाऊबंदांचा— दुर्योधनादिकांचा वध करण्यासारखें घोर कर्म करण्याचें मनांत तरी कसें आणलेंत? तुमच्यासारखे पापभीरू लोक असें करतील, असें मला नाही वाटत. मला तर असें खात्रीने वाटतें की, असलें कुलक्षय करण्याचें घोर पातक तुम्ही कांही करणार नाही! हे धर्मराजा! क्षत्रियांचें युद्धाचें काम म्हणजे नुसतें कसाईपण आहे! असलें ह कसायांचें काम पाण्डवांसारख्या धर्मात्म्यांनी करावें, हें योग्य नव्हे! माझी पक्की खात्री आहे की, असलें क्रूर कर्म तुम्ही कांही करणार नाही. अहो! तुम्हांला हें पक्कें माहीत आहे की, अत्यंत वृद्ध झालेला धृतराष्ट्र तुमच्यावर किती प्रेम करीत आहे! पण तो तरी विचारा काय करील? त्याचें कोण ऐकतो? साम्राज्यमदाने धुंद झालेले दुर्योधन, दुःशासन, कर्ण, आदि दुसरे सदस्य त्या बिचाऱ्याचें ऐकताहेत कोठे? ते साम्राज्यवादी ऐकत नाहीत,

यांत त्याचा काय बरें दोष ? तो तर नेहमी तुमच्यासाठी तळमळत असतो. अहो ! रात्रंदिवस त्या बिचाऱ्यास तुमच्या काळजीने झोप सुद्धा येत नाही ! अशा तुमचें हित व्हावें असें इच्छिणाऱ्या त्या म्हाताऱ्याला तुम्ही आपल्या हातांनी पुत्रशोकामध्ये लोटून देणार काय ? मला वाटतें की, जर सर्वांस सुख मिळावें अशी तुमची इच्छा असेल, तर तुम्ही कौरवांशीं सख्य करावयास तयार व्हा व आपल्या कुलाचें रक्षण केल्याचें यश मिळवा.'

(उद्योग अ० २५) "हे पाण्डवहो ! धृतराष्ट्र तर सख्य करण्यास एका पायावर तयार आहे. तुम्ही सर्व पाण्डव जन्मापासून दयाळू, धर्मभीरु व उदार धर्मात्मे आहां. तुमच्यासारख्या सज्जनांना युद्धासारखें क्रूर कर्म करणें कधीही योग्य नाही. तुमच्यासारख्या निष्पाप माणसांनी जरी थोडेंसें पाप केलें, तरी तें स्वच्छ धोतरावरील काळया डागाप्रमाणे अधिक स्पष्ट दिसतें. यासाठी युद्ध केल्याने तुमच्या नांवास काळिमा मात्र लागेल. कौरव तर दुष्ट आहेतच, त्यांच्या नीच कर्मांना कांही सीमाच नाही ! पण तुम्ही मात्र तसे नाही ! तुम्ही आतापर्यंत धर्माचें यत्किंचितही उल्लंघन केलेलें नाही, असें असतां आता युद्ध करण्याची हीन बुद्धि तुम्हांस कशी बरें झाली ? अरेरे, धर्मराजा ! तूं तर इतकीं वर्षें धर्मपालन करण्यांत घालवलींस व आता असलें हीन कर्म करण्यास प्रवृत्त झालास, याला म्हणावें तरी काय ? युद्ध करणें हें नीच पुरुषांचें कार्य आहे· तुमच्यासारख्या धार्मिक लोकांना तें मुळीच शोभत नाही."

(उद्योग० अ० २७) "हे धर्मराजा ! तूं तर धर्माची मूर्ति आहेस. तुला माहीत आहे की, जीवित नश्वर आहे. या जगांत कोण बरें चिरकाल टिकणार आहे ? कौरवांचा तुम्ही वध केलांत व तुम्ही स्वराज्य मिळविलेंत, म्हणजे तुम्ही येथे शाश्वत रहाल काय ? अहो, तुमचें स्वराज्य जर त्यांनी तुम्हांस न दिलें, तर तुम्ही तीर्थक्षेत्रीं जा, तपस्या करा, भिक्षावृत्तीने उप-

जीविका केलीत तरी कांही हरकत नाही; पण आपला धर्म सोडूं नका.

"अहो ! मनुष्यजीवन अल्प आहे. यासाठी आपल्या भाऊबंदांना ठार मारून राज्य मिळविलेंत, तर तें तुम्ही किती दिवस उपभोगाल बरें ? हे भोग संपतील व तुमचें पाप मात्र कायमचें राहील. अशा रीतीने दंडेलीने राज्य मिळविणें,हें कोणत्याही कारणाने यश वाढविणारें नाही. विषयवासनाच मनुष्याला असें क्रूर कर्म करण्यास प्रवृत्त करते. यासाठीं धर्मा ! तूं असल्या विषयवासनेचा संयम कर. तुझ्यासारख्या ज्ञानी मनुष्याला असली विषयवासना वाढवणें कधीही योग्य नाही. वासना व तृष्णा ही वाढत जाते व संपूर्ण पृथ्वीचें जरी राज्य मिळालें तरी तिची तृप्ति होत नाही व राज्य मिळून तरी सुख कोठे होतें ? केवल धर्माचरणानेच सुख होत असतें. तुम्ही योगसाधन करा; ध्यानधारणा, जप, तप, करा; तुमची धार्मिक उन्नति करून घ्या. तुमच्या धर्मामध्ये कौरव कांही हात घालूं इच्छीत नाहीत. परलोकप्राप्तीचीं साधनें खुशाल करीत रहा. असल्या क्रूर युद्धाच्या पाठीमागे लागून तुम्हांस काय मिळणार आहे बरें ? युद्धाने स्वराज्य मिळालें, तरी तें चिरकाल टिकणार नाही; म्हणून धर्मसंचय करा. म्हणून हे धर्मज्ञा युधिष्ठिरा ! असल्या क्रूर कर्मांपासून निवृत्त हो; मन शांत कर; तृष्णा सोड; आत्मसंयम कर व या घोर युद्धापासून दूर रहा."

## सावध रहा !

धृतराष्ट्राच्या प्रेरणेने संजयाने पांडवांकडे जाऊन त्यांस धर्मपालनाचा व संन्यासाचा उपदेश असा केला होता ! धृतराष्ट्राच्या मनांत काय होतें, हें यावरून स्पष्ट होत आहे. या उपदेशाचेंच प्रतिबिंब अर्जुनाच्या विषादामध्ये स्पष्ट दिसेल. अर्जुनाच्या मनावर या उपदेशाचा ताजा ठसा उमटलेला होता व तो जेव्हा युद्धभूमीवर गेला व जेव्हा दोहींकडे आपले बांधवच आहेत, हें त्याने पाहिलें, तेव्हा त्याच्या मनावर हा उपदेश अधिकच आरूढ झाला ! हा

उपदेश खरा आहे, असें अर्जुनाला वाटलें व तो खरोखर असें समजूं लागला की, धर्मयुद्धाने स्वराज्य मिळविणें, हें ठीक नव्हे; त्यापेक्षा भिक्षावृत्तीने राहणें पुण्यकारक आहे !

पहा, विजयी लोक–स्वतः राक्षसी अत्याचार करीत असतांही–जिंकलेल्या लोकांस कसा धर्मोपदेश करण्यास धजतात व उच्च तत्त्वें बोलून व शान्ति, बंधुभाव, वसुधैव–कुटुंबक वगैरे महासिद्धांत सांगून स्वराज्यासाठी प्रयत्न करणारांची कशी दिशाभूल करीत असतात ! म्हणून जित लोक जेव्हा स्वराज्यप्राप्तीचा प्रयत्न करीत असतील, तेव्हा त्यांनी विजयी राष्ट्राच्या धर्मोपदेशकांचीं व त्यांनी प्रतिपादिलेल्या तत्त्वज्ञानाच्या सिद्धांतांचीं व्याख्यानें फार सावधगिरीने ऐकलीं पाहिजेत.

वरील धर्मवचनांचा प्रयोग कौरवांनी पाण्डवांवर केला होता व धृतराष्ट्र असें समजत होता की, या प्रयोगाचा परिणाम पाण्डवांवर आम्हांला पाहिजे तसाच घडून येईल; कारण पाण्डव धार्मिक वृत्तीचे आहेत. यासाठी तो विचारीत आहे की, ' युद्धासाठी दोनही सैन्यें एकत्र जमल्यावर पुढे काय झालें ? ' आपला डाव साधला, असें उत्तर येतें कीं नाही, हें हा सम्राट् पहात आहे !

युद्धासाठी कुरुक्षेत्रासारखी पुण्यभूमि व प्रसिद्ध क्षेत्र पसंत करण्यांतहीं हाच उद्देश होता की, क्षेत्रांत गेल्यानंतर आपण केलेल्या धर्मोपदेशाकडे पांडवांचा कल जास्ती होईल. कोणीही मनुष्य धर्मक्षेत्रामध्ये गेल्यावर थोडा तरी धार्मिक बनतच असतो.

असा विचार करून धृतराष्ट्र विचारीत आहे की, 'हे संजया ! दोनही सैन्यें धर्मक्षेत्रांत एकत्र जमल्यावर पुढे काय झालें ?' म्हणजे 'आमच्या योजनेप्रमाणे धर्मक्षेत्राचा परिणाम त्यांच्यावर झाला कीं नाही ? संजया ! तूं जो उपदेश त्यांना केलास, त्याचा योग्य व इष्ट परिणाम त्यांच्यावर झाला कीं नाही ?'

## पराजयाची शंका.

आपली पाशवी शक्ति फार मोठी असतांही भीष्मद्रोणादि मोठमोठे वीर पाण्डवांना अनुकूल झाल्यामुळे कदाचित् आपला पराजय होईल, अशी जबरदस्त शंका धृतराष्ट्राला वाटत होती. पाण्डवांपैकी प्रत्येक वीर जसा सूड उगविण्याच्या भावनेने कसून लढेल, त्याप्रमाणे आमचे भाडोत्री वीर, पैशासाठी जमा झालेले वीर कधीही लढणार नाहीत. दुर्योधन, दुःशासन व कर्ण यांशिवाय आपणांकडे मनापासून लढणारा वीर नाही. पांडवांकडे प्रत्येक वीर मागील अपमानांचा सूड उगविण्यास तयार आहे. हा विचार मनांत आणून धृतराष्ट्र युद्धाच्या प्ररिणामाविषयी चिन्ताक्रान्त झाला होता.

## धर्म-युद्ध.

'धृत-राष्ट्र' व 'हृत-राष्ट्र' या दोन पक्षांमध्येच नेहमी युद्धें होत असतात. हृत-राष्ट्र आपलें हरून गेलेलें राष्ट्र पुनः परत मिळविण्यासाठी युद्ध करीत असतात, म्हणून त्यांच्याकडून होणारें युद्ध ' धर्मयुद्ध ' असतें; पण ' धृतराष्ट्र ' अन्यायाने व कपटाने दुसऱ्याचें राज्य मिळवितो व तें कपटानें, भेदनीतीने व पाशवी शक्तीने आपल्या ताब्यांत ठेवण्याची खटपट करीत असतो व एवढ्यासाठी तो युद्ध करीत असतो; म्हणून त्याच्याकडून केलें जाणारें युद्ध हें ' अधर्मयुद्ध ' होतें. दोनही बाजूंकडून एकच युद्ध होत असतें; पण त्यामध्ये एक बाजू धर्मयुद्ध करते, ' धर्मा ' ला अनुसरणारी असते; म्हणून तिला 'मनमोहन' भगवान् श्रीकृष्ण सहाय्य करतो व त्याच बाजूला ' विजय ' ही असतो; पण त्याच युद्धांत जी दुसरी बाजू असते, ती कपट, अधर्म, अन्याय, भेदनीति, पाशवी क्रूरता, जुलूम, जबरदस्ती इत्यादिकांचा आश्रय करते, म्हणून तिचा शेवटीं पराजय होतो व तिच्या अवाढव्य पाशवी बलाचा कांही एक उपयोग होत नाही.



# विजयोत्सव

'विजयोत्सव' विजयादशमीच्या दिवशीं करण्याची रीति प्रायः अखिल भारतवर्षीय हिंदु लोकांमध्ये आहे. भरतखंडांतील कोणत्या गावामध्ये विजयादशमीचा उत्सव होत नाही असें नाही. ज्या गावीं हिंदूंची वस्ती आहे, त्या गावीं विजयादशमीला सीमोल्लंघन करून हिंदू लोक आपल्या शत्रूचा पूर्ण पराभव झाला, अशी कल्पना करून, शत्रूची धनसंपत्ति आपल्या ताब्यांत घेतात व ती आपल्या घरीं आणून इष्टमित्रांस वाटून देतात ! हिंदूंची ही रीति अर्थपूर्ण नाही, असें कोण म्हणेल ? पण या उत्सवांतील रहस्य समजलें, तरच त्याचें महत्त्व आहे, नाही तर शमीचीं किंवा आपट्याचीं कांही पानें आणून तीं तेवढीं वाटलीं, म्हणजे उत्सव साजरा झाला, असें ज्यांस वाटेल, त्यांना विजय तरी कसा मिळणार व अन्तःकरणाचा उत्सव तरी त्यांच्या वाट्यास कसा येणार ?

' विजयोत्सव ' हा ' दशमी ' च्याच दिवशीं करावयाचा असतो; कारण [ दशमी = दश+शमी ] दहा इंद्रियांचें शमन झालें तरच खरा विजय

मिळतो, ही गोष्ट या तिथीने सुचविली जाते. दश इंद्रियांचा संयम झाला तरच खरा आध्यात्मिक विजय मिळेल, नाही तर पराजय होईल, ही महत्त्वाची गोष्ट ' विजया दशमी ' या शब्दाने दाखविली जाते, हें वाचकांनी येथे लक्ष्यांत ठेवावें. अन्तर्यामींचा विजय झाला, तरच बाहेरचा जगांतील विजय मिळणें शक्य असतें. विजयेच्छु लोकांनी ही गोष्ट केव्हाही विसरून चालावयाची नाही.

## नवरात्रोत्सव.

' विजया दशमी ' च्या पूर्वी ' नव-रात्रा ' चा कार्यक्रम केला जातो. याला ' नव-रात्र ' असेंच कां म्हणतात व ' नव-दिन ' कां म्हणत नाहीत, ही एक विशेष विचार करण्यासारखी गोष्ट आहे. जेथे हा उत्सव मोठ्या थाटाने चालतो, तेथे देवतेवर दररोज एक याप्रमाणे नऊ पुष्पमाला बांधल्या जातात. कित्येक ठिकाणीं तर दर रात्रीस एक याप्रमाणे वाढत्या आरत्याही असतात. पहिल्या दिवशीं एक दीप, दुसऱ्या दिवशीं दोन व याप्रमाणे वाढत वाढत नवव्या दिवशीं नऊ दिवे आरतीमध्ये असतात. याचा अर्थ काय ? नऊ रात्रींतील उत्सव रात्रीचा व दसरा मात्र दिवसाचा असें कां असतें ? या नऊ रात्री कशाच्या सूचक आहेत ? व नवरात्रोत्सव दिवे लावून आणि विजयोत्सवच तेवढा दिवसाच्या प्रकाशांत कां केला जातो ? उत्सव करणारांनी याचा विचार करावा.

रात्र ही अंधार, काळोख, पुढचा मार्ग न समजणें, दिशाभूल होणें अशा प्रकारच्या पूर्ण अज्ञानाची द्योतक आहे, हें सर्वांस माहीत आहे. या उत्सवांत अशा नऊ रात्री आहेत व त्यांचा द्योतक हा ' **नवरात्रोत्सव** ' आहे. यामध्ये नऊ रात्रींचा उत्सव करावयाचा नसून नऊ रात्रींचा अंधकार दूर करण्यासाठी हा समारंभ करावयाचा आहे, ही गोष्ट नवरात्रोत्सव करणारांनी लक्ष्यांत बाळगणें इष्ट आहे.

## नऊ तत्त्वें.

हे नऊ अंधकार कोणते, हें आता आपण येथे पाहूं. प्रत्येक मनुष्याला

नऊ पदार्थांचें ज्ञान त्याच्या उन्नतीसाठी पाहिजे असतें–(१) परमात्मा, परब्रह्म, ईश्वर; (२) आत्मा, जीव; (३) काम, संकल्पशक्ति; (४) बुद्धि, ज्ञानशक्ति; (५) मन, संकल्पशक्ति; (६) अहंकार; (७) इंद्रियगण; (८) शरीर, व्यष्टि; ( ९ ) संघ, समाज, राष्ट्र, अखिल मानव-जाति, समष्टी.

मनुष्याची उन्नति होण्यास या नऊ पदार्थांचें योग्य ज्ञान त्यास झालें पाहिजे व त्या ज्ञानाच्या योगानें त्यास त्यांसंबंधाचें आपलें कर्तव्य उत्तम रीतीने करतां आलें पाहिजे. मनुष्याचें यश किंवा अपयश या ज्ञानावर व या कर्तव्यांवरच अवलंबून असतें.

बहुधा सर्वसाधारण मनुष्याला या नऊ तत्त्वांसंबंधाने गाढ अज्ञान असतें. तें त्यांचें अज्ञान दूर करावें व त्यांना अंधकारांतून प्रकाशाच्या मार्गावर आणावें, यासाठी या उत्सवाचा उपक्रम आहे. याचसाठी या उत्सवामध्ये सप्तशतीचा पाठ केला जातो. तिच्या अगदी प्रारंभीं असें म्हटलेलें आहे—

आत्मतत्त्वं शोधयामि, विद्यातत्त्वं शोधयामि, शिवतत्त्वं शोधयामि, सर्वतत्त्वं शोधयामि नमः स्वाहा ॥ (सप्तशतीविधिः)

"आत्मतत्त्व, विद्यातत्त्व, शिवतत्त्व व सर्वतत्त्व या चार तत्त्वांचें संशोधन करण्याची व त्या तत्त्वसंशोधनासाठी ( स्व+आ–हा ) आत्मसमर्पण करण्याची प्रतिज्ञा उपासक या उपासनेच्या प्रारंभीं करीत असतो." आत्मतत्त्वामध्ये परमात्म्यापासून शरिरापर्यंत सांगितलेल्या आठ पदार्थांचा समावेश होतो. विद्यातत्त्वामध्ये बंधनांतून सुटका करून घेण्याचें सर्व तत्त्वज्ञान येत असतें. पहा–

विद्ययाऽमृतमश्नुते । ( केन उ० १२; ईश उ० ११; मैत्री उ० ७।९)
यदेव विद्यया करोति तदेव वीर्यवत्तरं ( भवति ) ।
( छां० उ० १।१।१०)

विद्या साधिष्टं प्रापयति । ( छां० उ० ४।९।३ )
विद्यया देवलोकः ॥ ( बृ० उ० १।५।१६ )
अमृतं तु विद्या । ( श्वे० उ० ५।१ )

" विद्येने अमृत प्राप्त होतें. विद्येच्या योगाने जें काय केलें जातें, तें अधिक प्रभावशाली होतें. विद्येच्या योगाने साध्य प्राप्त होतें. विद्येने देवांच्या स्थानासारख्या स्थानाची प्राप्ति होते. " विद्यातत्त्वाच्या संशोधनाचें हें फल आहे. तात्पर्य, विद्यातत्त्वानेच मनुष्याची इहपरलोकीं उन्नति होणें शक्य आहे.

यापुढे शिवतत्त्वाचें संशोधन करावयाला सुचविलें आहे. शिव म्हणजे कल्याण. तें कसें साधावें व तें प्राप्त झाल्यावर तें चिरकाल कसें टिकवावें, या गोष्टींचा या शिवतत्त्वाच्या संशोधनामध्ये समावेश होत असतो. पुष्कळ वेळा आपलें खरें कल्याण कशांत आहे, तेंच मनुष्याला समजत नाही व तो अमूक रीतीने कल्याण होईल, असें म्हणून रात्रंदिवस खटपट करीत असतो; पण बऱ्याच वेळा तो शेवटीं फसतो. यासाठी मनुष्यमात्राचें खरें कल्याण कसें साधेल, तें विचार करून ठरवणें, हें शिवतत्त्वाचें संशोधन होय.

आत्मतत्त्व, विद्यातत्त्व व शिवतत्त्व यांमध्ये ज्यांचा समावेश होत नाही, अशीं मानवहिताचीं जीं कांही तत्त्वें असतील,त्या ऐहिक अभ्युदयाच्या विषयांचा समावेश या शेवटच्या ' सर्वतत्त्व ' शब्दामध्ये होत असतो. या चार तत्त्वांच्या संशोधनाची व्याप्ति अशी इतकी विस्तृत आहे. या चार तत्त्वांचें संशोधन जर मनुष्याने केलें व त्या निष्कर्षाप्रमाणे जर तो वागला, तर त्याचें इहपरलोकीं कल्याण होईल, यांत शंका नाही. या चार तत्त्वांचें संशोधन करणें व त्याचा निष्कर्ष आपल्या आचरणांत आणणें, हा आपल्या शक्तिसंवर्धनाचा मार्ग आहे. नवरात्रमहोत्सव हा याप्रमाणे या चार तत्त्वांचें संशोधन करून आपली शक्ति वाढवा, असें सुचवीत आहे.

हा उत्सव नऊ रात्रींमध्ये केला जातो, म्हणून ह्यास ' नवरात्रोत्सव, '

विद्यातत्त्वादिकांचें संशोधन करावयाचें असल्यामुळे यास ' शारदोत्सव ' व शेवटीं आपला ' विजय ' साधावयाचा असल्यामुळें याला ' विजयोत्सव ' असें म्हणतात.

## तीन महा शक्ति.

विजय व्हावा अशी इच्छा असेल तर अज्ञानान्धकार दूर केला पाहिजे. आत्मतत्त्व, विद्यातत्त्व, शिवतत्त्व व सर्वतत्त्व यांचें संशोधन केलें पाहिजे. व्यक्तीच्या काय किंवा राष्ट्राच्या काय, उन्नतीला ज्ञान हें एकच खरें साधन आहे. " ज्ञानान्मुक्तिः " म्हणजे ज्ञानाच्या योगानेच बंधनांतून किंवा पारतंत्र्यांतून सुटका होत असते. या ज्ञानाबरोबरच तीन शक्तींचें एकीकरणही झालें पाहिजे, ही गोष्ट उपासकांच्या मनांत बिंबविण्यासाठीच या उत्सवांमध्ये तीन देवींची एकसमयावच्छेदें करून उपासना सांगितली आहे.—

" महाकाली + महालक्ष्मी + महासरस्वती "

या तीन देवता क्रमशः " शौर्य, धन व ज्ञान " यांच्या देवता आहेत. या तीनही देवतांची मिळून उपासना या उत्सवांत करावयाची असते. सर्व उपासक या तीनही देवतांचा उच्चार करीत असतात; पण ज्ञानी, शूर व धनी पुरुषांनी आपसांत सहकार्य करून आपलें अभेद्य ऐक्य केलें पाहिजे व त्यायोगें आपला अपूर्व विजय साधला पाहिजे, ही गोष्ट मात्र फारच थोड्या लोकांच्या लक्ष्यांत येत असते.

येथे हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे की, येथे नुसतीं 'काली–लक्ष्मी–सरस्वती' अशीं नांवें नसून ' महाकाली–महालक्ष्मी–महासरस्वती ' अशीं आहेत. अर्थात् शौर्यही प्रचंड पाहिजे, धनसंपत्तीही फार मोठी कमावली पाहिजे व विद्याही फारच मोठी संपादन केली पाहिजे व या तीनही शक्तींचें सहकार्य राष्ट्रामध्ये झालें, तरच सर्वांची खरी उन्नति होईल.

कोणतीही उपासना करावयाची असो, ती करावयाची असतांना योगाचें

कोणतें तरी आसन घालून बसावें, आचमन करून प्राणायाम करावा व मग उपासनेस प्रारंभ करावा, असा प्रघात आहे; परंतु या शक्ति-उपासनेमध्ये पुढे दिल्याप्रमाणे प्राणायाम करावा, असें सांगितलें आहे-

गायत्र्या प्राणानायम्य... कुंडलिनीमुत्थाप्य हृदिस्थं दीप-कलिकाकारं जीवं...ब्रह्मणि संयोज्य स्वदक्षिणकुक्षिस्थं पापपुरुषं ध्यात्वा......पूरकेण तं...शोषयित्वा कुंभके...तं दग्ध्वा... तद्भस्म... रेचयेत् ॥

"गायत्री मंत्राने प्राणायाम करावा. तो असा- कुंडलिनीचें उत्थापन करून हृदयामध्ये दिव्याच्या ज्योतीप्रमाणे जो जीव आहे, त्याचा ब्रह्माशीं संयोग करून, आपल्या डाव्या कुशीमध्ये जो पापपुरुष आहे, त्याचें स्मरण करावें...पूरक करून त्या पापपुरुषाला शुष्क करावा, कुंभकाच्या वेळीं त्या पापाला जाळावें व रेचक करून त्याचें भस्म बाहेर फेकून द्यावें." हा प्रयोग आत्मतत्त्वाचें संशोधन करण्यासाठी सांगितला आहे. आपल्या शरिरांत असलेल्या पापाचा म्हणजे दोषांचा नाश करण्यासाठी व आपल्या जीवात्म्याची शक्ति वाढावी म्हणून हा प्रयोग आहे. प्रत्येक प्राणायामाच्या वेळीं याप्रमाणे दोषांचा नाश होत गेला, तर मनुष्य शुद्ध होईल व आत्मशुद्धि झाली की, मनुष्याची शक्ति वाढलीच, असें समजावें.

या ठिकाणीं सांगितलेला प्राणायाम कुंडलिनी उत्थापन करण्याची योग-प्रक्रिया ज्यांस साधली असेल, त्यांसच करतां येणें शक्य आहे. साधारण चांगल्या कुलांतील सदाचारी मनुष्य चांगल्या गुरूजवळ राहून जर योगाभ्यास करील, तर त्याला कुंडलिनी उत्थापन करण्यासाठी एक किंवा दोन वर्षांचा अवधि पुरे आहे. ही कुंडलिनी पाठीच्या कण्याच्या खालीं माकड-हाडाजवळ असते. प्राणायामाच्या योगाने ती आपल्या ताब्यांत येते. याच शक्तीला भवानी, काली, चण्डिका इत्यादि नांवें योगग्रंथांत दिलेलीं आहेत. यावरून

वाचकांच्या लक्षांत येईल की, आत्मतत्त्वाचें संशोधन करावयासाठी या उत्सवा-मध्ये या गोष्टी सांगितल्या आहेत. या कांही तरी उगीच नसून ज्याप्रमाणे शास्त्रीय ज्ञान प्रत्यक्ष व सप्रयोग सिद्ध करतां येतें, त्याचप्रमाणे योगसाधन करून कुंडलिनी-शक्तीचें उत्थापन करणाऱ्याला आपल्या आंतील शक्ति प्रत्यक्ष पाहतां येतात व त्या आपल्या ताब्यांतही आणतां येतात. याप्रमाणे आत्मतत्त्वाच्या संशोधनाची विद्या या उत्सवामध्ये अशा रीतीने सांगितली आहे. आता बाह्य जगांतील विजयासंबंधाने या उपासनेमध्ये काय सांगितलें आहे, तें पाहूंया. या उत्सवामध्ये उपासक देवतेजवळ काय मागतो, तें पहा—

## आत्मोन्नति.

रूपं देहि जयं देहि यशो देहि द्विषो जहि।
देहि सौभाग्यमारोग्यं देहि देवि परं सुखम् ॥१०॥
विधेहि द्विषतां नाशं विधेहि बलमुच्चकैः ॥११॥
विधेहि देवि कल्याणं विधेहि परमां श्रियम् ॥१२॥
विद्यावन्तं यशस्वन्तं लक्ष्मीवन्तं जनं कुरु ॥१३॥ (अर्गलास्तोत्र)

"हे देवि! मला सुंदर रूप दे, विजय दे, यश दे, माझे शत्रु दूर कर. मला ऐश्वर्य, आरोग्य व उत्तम सुख दे, माझ्या सर्व शत्रूंचा नाश कर, माझें बल वाढव, कल्याण व मोठी संपत्ति मला दे. लोकांना विद्वान्, यशस्वी व धनसंपन्न कर."

## सीमोल्लंघन.

वरील नऊ अज्ञानांधकारांचा नाश झाला म्हणजे दश इंद्रियांचें शमन करून सीमोल्लंघन करावयाचें असतें. हें सीमोल्लंघन गावाच्या सीमेचें उल्लंघन करून सध्या करतात; पण केवळ गावची सीमा ओलांडली म्हणजेच हें सीमो-ल्लंघन झालें, असें कोणीही समजूं नये. मनुष्याचीं कार्यक्षेत्रें अनेक आहेत; त्या प्रत्येक कार्यक्षेत्रामधील सीमा त्याने ओलांडली पाहिजे. हें ध्येय आपल्यापुढे

या उत्सवाने ठेवलेलें आहे. हें कसें तें आपण पाहूं—

ग्रामसीमेचें उल्लंघन करून आपण जरी पुढच्या गावीं गेलों, तरी तेथे विजय मिळवून तिकडचें धन आपल्या गावीं आणण्याची परिस्थिति आज नाही व अशी परिस्थिति केव्हाही नव्हती; कारण वेदकाळींसुद्धा राज्यें व साम्राज्यें होतीं व आपल्याच राष्ट्रांतील गावामध्ये एका गावच्या लोकांनी दुसऱ्या गावच्या लोकांस लुटावें, अशी स्थिति कोणतीही राजसंस्था चालूं देणार नाही.

श्रीरामचंद्रांनी भारतीयांचें स्वातंत्र्य हिरावून घेणाऱ्या लंकाद्वीपस्थ रावणावर जी चढाई केली ती दसऱ्याच्या सुमुहूर्तावर केली. आपली पारतंत्र्याची सीमा त्यांनी ओलांडली, शत्रूच्या देशांत प्रवेश केला, तेथे त्याचा पूर्ण पराभव केला, भारत देशाचें यश उज्ज्वल केलें व आर्यांना पूर्ण स्वातंत्र्य प्राप्त करून दिलें. याचें स्मरण म्हणून कोणी आपल्या गांवची सीमा ओलांडीत असले, तर तेंही योग्यच आहे; पण ही एक कृति त्याहून मोठ्या कार्यक्रमाची सूचक आहे, हें येथे विसरून कधीही चालावयाचें नाही.

सीमोल्लंघनामध्ये मुख्य तत्त्व काय आहे, तें समजलें म्हणजे आपल्या सध्याच्या कार्यक्षेत्रांमध्ये आपण कसें सीमोल्लंघन करावें, तें सहज समजेल. यासाठी हें तत्त्व आपण पाहूं. हें तत्त्व पुढे दिल्याप्रमाणे आहे—

१. आपल्या अधिकारांत जें क्षेत्र आहे, तेवढ्या क्षेत्राच्या चतुःसीमा अगदी सुरक्षित ठेवाव्या; त्याच्या आंत असा बंदोबस्त ठेवावा कीं, कोणत्याही शत्रूचा आंत प्रवेश होऊं नये.

२. नंतर बाहेरच्या क्षेत्रांत प्रवेश करावा व तें क्षेत्र जितकें आपल्या अधिकारांत आणतां येईल तितकें आणावें व त्याच्यावर आपला अधिकार उत्तम रीतीने स्थापन करावा.

३. याप्रमाणे आपलें क्षेत्र वाढवावें व विजय मिळवून आपलें प्रभुत्व

धन, ऐश्वर्य व वैभव वाढवावें व मिळालेलें ऐश्वर्य आपल्या ताब्यांत ठेवावें.

४. याप्रमाणे आपली उन्नति करीत जावें.

हें सीमोल्लंघनाचें तत्त्व समजण्यासाठी आपण कांही उदाहरणें घेऊं—

गावांत एक व्यापारी आहे. तो दरवर्षास हजार रु० चा व्यापार करतो. हजार रु० चा व्यापार करणें ही त्याच्या व्यापाराची सीमा आहे. या दसऱ्याच्या दिवशीं त्याने या सीमेचें उल्लंघन करण्याचा निश्चय केला पाहिजे व पुढच्या वर्षी ही सीमा ओलांडली जाईल असें केलें पाहिजे. पहिली मर्यादा टिकली पाहिजेच, पण पुढे वाढही झाली पाहिजे. हें व्यापाऱ्यांचें सीमोल्लंघन होय.

शेतकऱ्याने आपल्या शेतीच्या कार्यक्षेत्रामध्ये सीमोल्लंघन करावें. पूर्वीच्या बींबियाण्यामध्ये सुधारणा करणें, खतपाणी व मेहनत-मशागतीमध्ये सुधारणा करून जमिनीचा कस वाढवून आपल्या उत्पन्नामधील सीमेचें उल्लंघन करणें शेतकऱ्यास शक्य आहे.

गावांतील सोनार, सुतार, धोबी, लोहार, चांभार वगैरे सर्व कारागीर लोकांनी आपल्या धंद्यांत सुधारणा करून, आपली कारागिरी वाढवून, आपली सर्व बाजूंनी उन्नति होण्याच्या मार्गांत सीमोल्लंघन केलें पाहिजे. ब्राह्मणांनी आपलें सीमोल्लंघन करावयाचें तें आपल्या धर्माच्या ज्ञानामध्ये करावें. देशासाठी, धर्मासाठी व लोककल्याणासाठी जेवढा त्याग गेल्या वर्षी आपण केला असेल, त्यापेक्षा अधिक मोठा त्याग या वर्षी करावा व या दिशेने त्यागाच्या सीमेचें उल्लंघन करावें.

सध्याच्या परिस्थितीमध्ये क्षत्रियांच्या सीमोल्लंघनास वाव राहिलेला नाही; यासाठी त्यांनी वर लिहिल्याप्रकारचें सीमोल्लंघन होईल तितकें करावें. तसेंच चालू राजकारणामध्ये यापूर्वी जो भाग घेतला असेल, त्याच्यापेक्षा अधिक भाग या वर्षी घेण्याचा निश्चय करून त्यांनी आपलें सीमोल्लंघन करावें.

या वर दिलेल्या थोड्याशा उदाहरणांवरून वाचकांच्या लक्ष्यांत येईल कीं, प्रत्येक मनुष्याने आपापल्या कार्यक्षेत्रांत सीमोल्लंघन करून आपलें कार्यक्षेत्र अधिक विस्तृत केलें पाहिजे. हेंच त्यांचें सीमोल्लंघन होय.

आपलें सौंदर्य, आपलें बल, आपलें यश व आपला सर्व कार्यक्षेत्रांतील विजय यांमध्ये आपण आपल्या पूर्वीच्या सीमेचें उल्लंघन केलें कीं नाही, तें दसऱ्याच्या दिवशीं प्रत्येकाने पाहिलें पाहिजे व आपल्या सौंदर्याच्या पूर्वीच्या सीमेपेक्षा आपण किती आघाडी मारली, आपल्या बलाच्या व यशाच्या क्षेत्राच्या पूर्वीच्या सीमेपेक्षा या वर्षी आपण किती मोठें क्षेत्र या वर्षी आक्रमिलें आहे, आपलें विजयाचें क्षेत्र आपण या वर्षी किती विस्तृत केलें आहे, या गोष्टींचा विचार करून आपण या वर्षीचें सीमोल्लंघन खरोखर केलें कीं नुसतें सीमोल्लंघनाचें नाटक केलें, हें प्रत्येकाने पाहिलें पाहिजे.

आपण विद्यावान्, लक्ष्मीवान् व यशस्वी होण्याच्या प्रयत्नांमध्ये पूर्वीच्या सीमेपेक्षा किती आघाडी मारली, तेंही या दिवशीं पहावयास पाहिजे.

या उत्सवांतील उद्देशाप्रमाणे जोंपर्यंत आर्य लोक आपलें सीमोल्लंघन प्रत्येक क्षेत्रांत करीत होते, तोंपर्यंत त्यांची अखंड उन्नति होत होती; पण जेव्हापासून त्यांचें सीमोल्लंघन प्रत्येक कार्यक्षेत्रांत होईनासें झालें व जेव्हापासून ते नुसती गावची सीमा ओलांडूनच आपलें सीमोल्लंघन झालें असें समजूं लागले, तेव्हापासून त्यांची अधोगति सुरू झाली. यावरून सीमोल्लंघन हें किती व्यापक व किती महत्वाचें आहे, हें सहज समजेल.

## राजकीय चळवळी.

स्वदेशी चळवळ, स्वराज्यासाठी चळवळ व अशा प्रकारच्या ज्या आपल्या उद्धाराच्या चळवळी आहेत किंवा होतील, त्या चळवळींत आपण जी प्रगति केली, त्या सीमेचें उल्लंघन करून पुढे जाणेंही इष्ट आहे. अशा प्रकारचें

सीमोल्लंघन कितीही जरी झालें तरी तें इष्टच आहे. येथे कित्येक लोक विचारतील की, धार्मिक उत्सवांमध्ये राजकीय आणि औद्योगिक बाबींची भेसळ कां करावी ? या शंकेचें समाधान असें की, आपले बहुतेक सर्व महोत्सव विशेषेंकरून राजकीय बोध देणारेच आहेत. "रामनवमीचा महोत्सव" हद्दपार केलेल्या एका आर्य–राजकुमाराने आपल्या देशाचें स्वातंत्र्य कसें स्थापन केलें व या देशाला पारतंत्र्याच्या पंकांत कोंबणाऱ्या परद्वीपस्थ राजाच्या साम्राज्याचा कसा नाश केला, तें सूचित करीत आहे. "गणेशोत्सव" हा गणरायांनी स्वजातीयांची संघटना कशी केली व स्वदेशबांधवांचें सांघिक बल वाढवून त्यांचा दर्जा कसा वाढवला व देव–राष्ट्राला वारंवार त्रास देणाऱ्या पाश्चिमात्य शत्रूंचा नायनाट करून त्यांनी कसें आपल्या राष्ट्राचें कल्याण केलें, तें दाखवीत आहे. 'कृष्णाष्टमीचा महोत्सव' हृतराष्ट्रीयांनी धृतराष्ट्रीयांकडून आपलें गेलेलें स्वराज्य कसें प्राप्त करून घेतलें याची आठवण करून देत आहे व कंसासारख्या जुलमी, स्वार्थी संस्थानिकाचा जुलूम दूर करण्यासाठी बाल श्रीकृष्णाने त्याचा कसा वध केला व गोकुलवासीयांस त्याच्या जुलमांतून कसें सोडवलें, तें दाखवीत आहे. यावरून या उत्सवांमध्ये राजकीय बोध कसा आहे, तें सहज समजून येईल.

दसरा हा दिवस श्रीरामचंद्राच्या रावणावरील शेवटच्या चढाईचा सूचक असल्यामुळे तो राजकीय स्वरूपाचाच आहे. इतकेंच नव्हे तर या नवरात्र-महोत्सवामध्ये ज्या सप्तशतीचा पाठ केला जातो, तो सप्तशती ग्रंथ प्रारंभापासून शेवटपर्यंत राजकीय उलाढालींचाच इतिहास आहे. ही महत्त्वाची गोष्ट असल्यामुळे या सप्तशती ग्रंथांत काय सांगितलें आहे, हें आता आपण पाहूं.

## सुरथ राजा.

फार प्राचीन काळीं सुरथ नांवाचा एक राजा या आर्यावर्ताचा सम्राट् होता. तो धर्माप्रमाणे राज्य चालवीत असतां त्याच्यावर अनेक विदेशी

शत्रूंनी हल्ला केला. हे विदेशी शत्रु जरी संख्येने अगदी थोडे होते, तरी त्यांची संघटना व कपटनीति विशेष असल्यामुळे त्यांनी या आर्य सम्राटाचा पराभव केला—

> न्यूनैरपि स तैर्युद्धे कोलाविध्वंसिभिर्जितः ॥ ६ ॥
> आक्रान्तः स महाभागस्तैस्तदा प्रबलारिभिः ॥ ७ ॥
> अमात्यैर्बलिभिर्दुष्टैर्दुर्बलस्य दुरात्मभिः ।
> कोशो बलं चापहृतं तत्रापि स्वपुरे ततः ॥ ८ ॥ (सप्तशती अ० १)

"त्या थोड्याशा विदेशी शत्रूंनी या भारतीय आर्य सम्राटाचा पूर्ण पराभव केला. त्यांनी चारही बाजूंनी त्यास घेरलें व कोंडून टाकलें. इकडे त्याच्या दुष्ट प्रधानांनी त्याच्याशीं विश्वासघात केला, त्यांपैकीं कांही शत्रूला फितुर झाले व कांहींनी त्याचा खजिना वगैरे लुटून आपलीं घरें भरलीं." याप्रमाणे घरभेदी नोकर व कपटी शत्रु यांमुळे त्या सुरथ राजाचा पूर्ण पराजय झाला व तो आपलें राज्य सोडून श्रीमार्कंडेय ऋषींच्या आश्रमांत जाऊन राहिला.

ऋषींनी राजाचें आदरातिथ्य करून कुशल प्रश्न विचारले. तेव्हा राजानें झालेला वृत्तांत ऋषींस निवेदन केला. तेव्हा ऋषीने राजास स्वराज्य पुनः प्राप्त करून घेण्याचा जो उपदेश केला, त्यालाच ' सप्तशती ' असें म्हणतात. हा उपदेश एक अत्यंत प्राचीन काळचा राज्यक्रांतीचा इतिहासच आहे. या उपक्रमावरून लक्ष्यांत येईल की, या नवरात्रमहोत्सवांत वाचावयाची सप्तशती म्हणजे एक राजकीय क्रांतीचाच इतिहास आहे. सुरथ राजाने आपलें गेलेलें स्वराज्य पुनः कसें प्राप्त करून घेतलें व आपलें पारतंत्र्य कसें नाहींसें केलें, याचा इतिहास या ग्रंथांत आहे. या धार्मिक उत्सवामध्ये या प्रकारें राजकारण भरलेलें आहे. यासाठी या उत्सवाच्या अन्तीं जें सीमोल्लंघन करावयाचें तें राजकीय कार्यक्षेत्रामध्येही करणें इष्टच आहे. इतर बाबींत केलें किंवा न केलें तरी

त्याचें कांही विशेष नाही; पण राजकीय कार्यक्षेत्रांत तर तें अवश्य केलेंच पाहिजे. असो. श्रीमार्कंडेय ऋषींनी सुरथ राजाला आपलें स्वातंत्र्य व स्वराज्य पुनः प्राप्त करून घेण्सासाठी जो उपदेश केला, तो अति प्राचीन काळचा देव-राष्ट्राचा राजकीय क्रान्तीचा एक मोठा हृदयंगम इतिहास आहे. पहा—

देवासुरमभूद्युद्धं पूर्णमब्दशतं पुरा ।
महिषेऽसुराणामधिपे देवानां च पुरंदरे ॥२॥
तत्रासुरैर्महावीर्यैर्देवसैन्यं पराजितम् ।
जित्वा च सकलान्देवानिन्द्रोऽभून्महिषासुरः ॥३॥ (सप्तशती अ० २)

" पूर्वी देवासुरांचें युद्ध झालें. देवांचा राजा इंद्र व असुरांचा राजा महिषासुर होता. या दोघांच्या घनघोर युद्धामध्ये असुरसैन्याने देवसैन्याचा पूर्ण पराभव केला व महिषासुराने इंद्राच्या राजधानीमध्ये प्रवेश केला व तो इन्द्रपदावर आरूढ झाला. " सर्व देवराष्ट्र याप्रमाणे पश्चिमेकडच्या असुरांच्या आधीन झालें. याप्रमाणे देवांचें स्वराज्य गेलें व त्यांना पारतंत्र्य आलें. यामुळे त्यांची अवस्था कशी झाली तें पहा—

सूर्येन्द्राग्न्यनिलेन्दूनां यमस्य वरुणस्य च ।
अन्येषां चाधिकारान्स स्वयमेवाधितिष्ठति ॥६॥
स्वर्गान्निराकृताः सर्वे तेन देवगणा भुवि । (सप्तशती अ० २)

" देवराष्ट्रांतील मूळचे सर्व अधिकारी सूर्य, इन्द्र, अग्नि, इन्दु, यम, वरुण या नावांचे देव होते. त्यांना महिषासुराने आपआपल्या कामांवरून दूर केलें व त्यांचीं सर्व कामें स्वतःच्या देखरेखीखाली महिषासुर स्वजातीय असुरां-कडून करून घेऊं लागला. "

## जित व जेते.

जेते लोक जिंकलेल्यांस राज्यशासनाचा अनुभव घेऊं देत नाहीत. हा

राजनीतीचा एक नियमच आहे. त्याचप्रमाणें महिषासुराने देवराष्ट्राचा ताबा घेतल्याबरोबर आधी देवांना राज्यकारभारांतून दूर केलें व तेथे असुरांना नेमलें. यायोगाने देववीरांना राजकीय अनुभव मिळेनासा झाला व असुरांचा तोच अनुभव वाढूं लागला. जेते लोक, जित लोक कायमचे नालायख बनावे, एवढ्यासाठीच राज्यशासनाचा अनुभव त्यांना घेऊं देत नाहीत. अशा एकदोन पिढया गेल्या म्हणजे कायमच्या दास्यशृंखला त्यांच्या पायांत अडकतात व प्रत्यहीं जेत्यांचा अनुभव वाढत जातो व जितांचा अनुभव कमी होत जातो.

याप्रमाणे सर्व देवराष्ट्र परतंत्र झालें व जेव्हा त्यांचे स्वराज्यप्राप्तीचे सर्व प्रयत्न फसले, तेव्हा ते सर्व देववीर निराश होऊन एके ठिकाणीं जमले व पुढे काय करावें, याचा विचार करूं लागले. देव जोंपर्यंत स्वतंत्र स्वराज्याचा उपभोग घेत होते, तोंपर्यंत ते एकमेकांशीं फटकून वागत, आपसांत भांडत व कधीही एकमेकांच्या घरींसुद्धा जात नसत. पहा—

न वै देवा अन्योऽन्यस्य गृहे वसन्ति । (श० ब्रा०)

" देव एकदुसऱ्याच्या घरीं सुद्धा जात नाहीत, " यामुळे त्यांच्यामध्ये सांघिक बल नव्हतें व म्हणूनच अल्पसंख्याक विदेशी शत्रूंनी त्यांचा पूर्ण पाडाव केला व त्यांस देशोधडीस लावलें. देशोधडीस लागल्यानंतर त्यांस शुद्धि आली व ते सर्व जातींचे तेहेतीस कोटी देव एकत्र बसून आपण पुढे काय करावें याचा विचार करूं लागले. देवराष्ट्राचे पराजित लोक एकत्र जमून, राष्ट्र-सभा भरवून आपल्या स्थितीचा विचार करूं लागले व त्याच्यामध्ये आपल्या स्थितीचा जसजसा विचार होऊं लागला, तसतसा त्यांना आपल्या पारतंत्र्या-बद्दल व महिषासुराच्या जाचाबद्दल तिटकारा वाटूं लागला. एके वेळीं या सर्व देवांची प्रचंड सभा झाली व त्यामध्ये ब्रह्मदेव, विष्णु व रुद्र हेही हजर होते. देवराष्ट्रांतील सर्व प्रजेचीं दु:खें त्यावेळीं वेशीवर मांडण्यांत आलीं, तेव्हा त्या सभेमध्ये प्रमुख देवांचीं फारच जोरदार भाषणें झालीं—

इत्थं निशम्य देवानां वचांसि मधुसूदनः ।
चकार कोपं शंभुश्च भ्रुकुटीकुटिलाननौ ॥९॥
ततोऽतिकोपपूर्णस्य चक्रिणो वदनात्ततः ।
निश्चक्राम महातेजो ब्रह्मणः शंकरस्य च ॥१०॥
अन्येषां चैव देवानां शक्रादीनां शरीरतः ।
निर्गतं सुमहत्तेजस्तच्चैक्यं समगच्छत ॥११॥ (सप्तशती)

" याप्रमाणे देवराष्ट्रांतील लोकांच्या करुणकथा ऐकून विष्णु व शंकर यांना फार राग आला, त्यांच्या भुवयांना आठ्या पडल्या. तेव्हा त्यांच्या तोंडांतून तेज बाहेर पडलें व इतर सर्व देवांचें तेजही या तेजांत मिळालें. याप्रमाणे सर्व देवांच्या तेजाचें एकीकरण झालें !"

जे कधीही एकमेकांच्या घरींसुद्धा जात नसत व एकमेकांस भेटण्याचेंही टाळीत; इतकेंच नव्हे तर कित्येकांची वाटेंत भेट झाली तर जे एकमेकांच्या जिवावरही उठत, ( उदाहरणार्थ, जलदेव व अग्निदेव हे कधी एकमेकांस भेटत नसत व भेटले तर जलदेव अग्निदेवास ठार मारी व अग्निदेव पडद्याआड राहून जलदेवांत खळबळ करून त्यांस नाहीसे करून टाकी ! ) तेच देव पारतंत्र्याचें झणझणीत अंजन डोळ्यांत पडतांक्षणींच शुद्धीवर आले व त्यांनी आपली संघटना केली; यामुळे सर्व देवांच्या तेजाचें एकीकरण झालें व आपण आता राक्षसांचा पराभव करून त्यांच्याकडून आपलें स्वराज्य पुनः प्राप्त करून घेऊंच घेऊं, असा त्यांस आत्मविश्वास वाटूं लागला.

याप्रमाणे देवांचें संघटण झालें व ते आपलें स्वराज्य प्राप्त करून घेण्याची चळवळ करूं लागले हें खरें; पण महिषासुराची व त्याच्या विख्यात सेनापतींची मारक शक्ति देवांच्या परिचयाची असल्यामुळे देववीरांपैकी कोणीही धडाडीने चळवळीचा पुढाकार घेण्यास तयार होईना. हें पाहतांच काली, सरस्वती व लक्ष्मी या तीन स्त्रियांनी पुढाकार घेतला व महाकालीच्या

आधिपत्याखाली सर्वांनी मिळून चढाई करण्याचें ठरवलें—

जयेति देवाश्च मुदा तामूचुः सिंहवाहिनीम् ॥३५॥
दृष्ट्वा समस्तं संक्षुब्धं त्रैलोक्यममरारयः ।
सन्नद्धाखिलसैन्यास्ते समुत्तस्थुरुदायुधाः ॥३६॥
आः किमेतदिति क्रोधादाभाष्य महिषासुरः ॥
अभ्यधावत तं शब्दमशेषैरसुरैर्वृतः ॥३७॥
स ददर्श ततो देवीं व्याप्तलोकत्रयं त्विषा । (सप्तशती, अ० २)

“ त्या काळीं देवीने सर्व देवसैन्याचा पुढाकार घेतला, असें पाहून देवांनी तिला जया असें नांव देऊन तिचा जयजयकार केला व जयजयकार करीत देवसैन्य तयार झालें. इकडे असुरांची खात्री होती कीं, देवसैन्यांतील पुरुषवीर आता कांही उठणें शक्य नाही, ते सुखावलेले आहेत व आमच्या मारक शक्तीला ते भ्याले आहेत. तेव्हा देवसैन्याकडून चढाई होईल, अशी राक्षसांना शंकाही नव्हती. पण देवांचें सैन्य स्त्रियांच्या आधिपत्याखाली सज्ज झालें आहे व जिकडे तिकडे देवराष्ट्रांतील सर्व स्त्रिया जाग्या झाल्या आहेत व त्या गावोगाव भयंकर चळवळ चालवीत आहेत व सर्व देवराष्ट्र त्यांनी खळबळवून टाकलें आहे, असें जेव्हा असुर-अधिकारी-वर्गाने पाहिलें, तेव्हा त्यांस ( दृष्ट्वा समस्तं संक्षुब्धं त्रैलोक्यं ) सर्व त्रैलोक्यच एकमताने आपल्या विरुद्ध उठलें आहे कीं काय असें वाटलें !!” जे जे विश्वासाचे म्हणून वर्ग होते, तेहि विरुद्ध चळवळींत भाग घेऊं लागले व स्त्रियाही सेनापतीचें कार्य करण्यास तयार झाल्या, हें पाहून आता या राष्ट्रास आपल्या पाशवी शक्तीने ताब्यांत ठेवतां येणें कठीण असें असुरांच्या नोकरशाहीस वाटलें; पण ज्यांच्या हातांत पाशवी बल हवें तितकें असतें, ते त्याचा उपयोग करण्यापूर्वी कधीही आपली हार मानण्यास तयार होत नाहीत. यामुळे देवसैन्यास प्रचण्ड युद्धाची तयारी केल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें.

नुसती संघटना केली, स्त्रिया चळवळींत सामील झाल्या, मुलांच्या चळवळी झाल्या, सर्व देवराष्ट्रांत असुरांविरुद्ध असंतोष माजला, ह्या गोष्टी पहात असतांही महिषासुर व त्याचे दिवाण हे असल्या चळवळीस भीक घालण्यास तयार नव्हते. असुरांना मनांतून वाटलें खरें की, आता आपले सुखाने राज्य करण्याचे दिवस निघून गेले आहेत,तरी पण देवसैन्याचें आधिपत्य एका स्त्रीने घेतलें आहे व चळवळींत स्त्रियांचेंच प्राबल्य आहे, हें पाहून त्या असुरांस वाटलें की, या स्त्रिया काय करणार! असा विचार करून महिषासुराने आपलें असुर-सैन्य जमा केलें व युद्धाची तयारी केली. या असुर-सैन्याचे सेनापति चिक्षुर, उदग्र, असिलोमा, बाष्कल ( पुष्कळ बोलका ), बिडाल ( घारे डोळे असलेला ) अशा प्रकारचे होते.

जेव्हा देवसैन्याचें आधिपत्य एका स्त्रीने घेतलें आहे असें पाहिलें, तेव्हा शुंभासुराने आचरटपणाने तिला असाही निरोप पाठला की, "हे देवस्त्रिये! तूं युद्धाची खटपट कशास करीत आहेस? माझ्याजवळ ये, माझी बायको हो, म्हणजे हें सर्व राज्य तुला मिळेल." पण देवस्त्रिया असल्या प्रलोभनास भुलणाऱ्या नव्हत्या. प्रलोभनें व गोड वचनें यांस भुलण्याचा समय पार निघून गेला होता. तेव्हा त्या देवस्त्रीने जें उत्तर दिलें, तें सर्व स्त्रियांनी लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे—

> यो मां जयति संग्रामे यो मे दर्पं व्यपोहति ।
> यो मे प्रतिबलो लोके स मे भर्ता भविष्यति ॥ १२० ॥
>
> ( सप्तशती, अ० ५ )

"जो युद्धामध्ये माझा पराभव करील, जो माझा युद्धाचा गर्व दूर करील व जो माझ्या बरोबरीचा बलवान् असेल, तो माझा पति होईल." म्हणजे "जर तुझ्यामध्ये शक्ति असेल, तर पुढे ये, माझ्याबरोबर युद्ध कर व जर तूं जय मिळविलास, तर मग मी विवाह करण्याचा विचार करीन." हें

देवस्त्रीचें भाषण ऐकून राक्षसाला राग आला. पण करणार काय ? युद्ध केल्या-शिवाय गत्यंतरच नव्हतें; तेव्हा देवसैन्य व असुरसैन्य यांचें भयंकर युद्ध झालें. राक्षसांनी आपली शर्थ केली; पण या युद्धामध्ये राक्षसांचा पूर्ण मोड झाला व देवांना जय प्राप्त होऊन त्यांचें स्वराज्य त्यांस पुनः प्राप्त झालें. या युद्धामध्ये या देवीने जी प्रतिज्ञा केली होती, तीही लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे–

त्रैलोक्यस्य हितार्थाय वधिष्यामि महासुरम् ॥५४॥
(सप्तशती अ० ११)

" तीनहि लोकांचें हित व्हावें, म्हणून या असुरांचा मी वध करतें. " आपल्या देशाचें हित व्हावें म्हणून राष्ट्रीय शत्रूचा वध मी करतें, अशी प्रतिज्ञा प्रत्येक देवस्त्रीने केली होती. काली, कुमारी, ब्रह्माणी, लक्ष्मी, अंबिका, वाराही, नारसिंही, ऐन्द्री या व इतर अनेक देवस्त्रियांनी या महायुद्धांत प्रमुख भाग घेतला होता. यांपैकी कित्येक कुमारिका होत्या, कित्येक प्रौढा होत्या तर कित्येक अगदी दहा वर्षांच्या मुलीही होत्या. ज्या वेळीं स्त्रिया व मुली सुद्धा युद्धामध्ये भाग घेण्यास तयार होतात, त्या वेळीं तें राज्यशासन जनतेस अगदी नापसंत झालेलें असतें, असें समजावें. महिषासुर किंवा शुंभनिशुंभ यांचें राज्यशासन देवराष्ट्रास अत्यंत जाचक झालें होतें व तें दूर झालेंच पाहिजे, अशी आबालवृद्धांमध्ये तीव्र इच्छा उत्पन्न झाली होती. जेव्हा पुरुष पुढारीपण घेण्यास तयार नाहीत असें स्त्रियांनी पाहिलें, तेव्हा विदेशी राजाचें राज्यशासन मानण्यास तयार नसलेल्या स्त्रियांनी व कुमारिकांनी चळवळीचें पुढारीपण पत्करून राज्यक्रान्ति घडवून आणली व स्त्रियांनी स्वतः युद्ध करून स्वराज्याची स्थापना केली.

सप्तशतीच्या सातशे श्लोकांमध्ये स्त्रियांनी केलेल्या दोन राज्यक्रान्त्यांचीं वर्णनें आहेत. महिषासुराचा पराभव करून पहिली व शुंभनिशुंभांचा पराभव

करून दुसरी क्रान्ति केली. या वेळीं या देवस्त्रिया व देवकुमारिका गदायुद्ध, बाणयुद्ध, शस्त्रयुद्ध, अस्त्रयुद्ध, बाहुयुद्ध व कूटयुद्ध या सर्व युद्धांमध्ये अत्यंत प्रवीण झाल्या होत्या; म्हणूनच त्यांस या दोनही युद्धांमध्ये यश मिळालें. महिषासुर व शुंभासुर हे कसलेले योद्धे होते. प्रथमतः जरी या स्त्रिया आहेत म्हणून त्यांनी तिकडे विशेषसें लक्ष्य दिलें नव्हतें, तरी जेव्हा यांची तयारी चांगली आहे असें त्यांच्या लक्ष्यांत आलें, तेव्हा आपले सर्व असुर व राक्षस यांना बोलावून आणून आपल्या युद्धकौशल्याची त्यांनी शर्थ केली; पण देव-सैन्यही तशाच त्वेषाने व सूडाच्या भावनेने लढलें व शेवटीं असुरांचा पूर्ण मोड झाला.

या इतिहासावरून आपल्या राष्ट्राचें स्वातंत्र्य प्रस्थापित करण्यासाठी बाल, वृद्ध, तरुण, स्त्री व पुरुष यांनी आपापल्या परीने शक्य तितका प्रयत्न केलाच पाहिजे; असा सर्वांनी एकदिलाने प्रयत्न केला तरच आपला विजय होईल, नाही तर कधीही स्वराज्यप्राप्ति होणार नाही, ही गोष्ट येथे स्पष्ट होते.

दसऱ्याच्या उत्सवामध्ये थोडेंसें राजकारण आहे, असें कित्येकांस वाटतें. पण नवरात्रोत्सवामध्ये राजकारण असेल असें पुष्कळांस वाटत नाही. पण ज्या देवीचा हा नवरात्रोत्सव केला जातो, त्या देवीने केलेल्या राजकीय उलाढालींचेंच वर्णन सप्तशतीमध्ये केलेलें आहे. तें पाहिलें म्हणजे या उत्सवांतील राजकारण तेव्हाच लक्ष्यांत येतें.

श्रीराम किंवा श्रीकृष्ण यांचे उत्सव फक्त पुरुषांचेंच राजकारण दाखवीत असतात. पण हा नवरात्राचा देवीचा उत्सव, स्त्रियांनी व कुमारिकांनीही आपल्या देशाच्या राजकारणांत भाग घेतला पाहिजे व जर पुरुष पुढे सरसावत नसले तर स्त्रियांनी राज्यक्रांति करून आपल्या देशाचें स्वातंत्र्य-रक्षण केलें पाहिजे, असें सांगत आहे. या दृष्टीने हा उत्सव इतर सर्व उत्सवांपेक्षा श्रेष्ठ आहे, असें म्हणणें योग्य होईल.

प्राचीन काळच्या त्या स्त्रियांनी आपल्या अन्तःपुराची मर्यादा उल्लंघून रणभूमीमध्ये प्रवेश करून जें सीमोल्लंघन केलें, तें राष्ट्राच्या इतिहासामध्ये चिरस्थायी झालेलें आहे.

या वेळीं ब्रह्माणी, कौमारी, सरस्वती या ब्राह्मण स्त्रिया व कुमारिका, तसेंच काली, अंबिका, भवानी, ऐंद्री, लक्ष्मी, वाराही, नारसिंही, या क्षात्र-स्त्रिया व कुमारिका खांद्याला खांदा लावून आपल्या देशाच्या स्वातंत्र्य-रक्षणासाठी लढल्या, ही गोष्ट आजही आपणांस बोधप्रद होण्यासारखी आहे. याचप्रमाणे वेळप्रसंगीं चारही वर्णांनी किंवा चारही वर्णांच्या स्त्रियांनी व पुरुषांनी कोणताही भेद व उच्चनीच भाव मनांत न आणतां व मागच्या उखाळया-पाखाळया न काढतां आपल्या राष्ट्राच्या हितासाठी आपलें कर्तव्य करण्यास पुढे आलें पाहिजे. हेंही एक सीमेचें उल्लंघनच आहे.



# लक्ष्मीचा एकच प्रश्न !

या पृथ्वीवरील प्रत्येक राष्ट्रांत, प्रत्येक प्रान्तांत व प्रत्येक गावांत लक्ष्मी हिंडत असते व रात्रीचा निबिड अंधकार पडला म्हणजे तेथील प्रत्येक घरांतील लोकांस ती एकच प्रश्न विचारीत असते. प्रत्येक माणसाने, प्रत्येक कुटुंबाने, प्रत्येक गावाने, प्रत्येक प्रांताने व प्रत्येक राष्ट्राने ह्या प्रश्नाचें उत्तर देण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हें उत्तर जसें येईल, त्यावर लक्ष्मीचें वास्तव्य तेथे होणें किंवा न होणें हें अवलंबून आहे, ही गोष्टही उत्तर देणाराने विसरूं नये. रात्रीच्या अन्धकारांत लक्ष्मी येऊन जो प्रश्न विचारते, तो हा आहे—

निशीथे वरदा लक्ष्मी 'को जागर्तीति भाषिणी' ।
जगत्प्रभ्रमते तस्यालोकचेष्टावलोकिनी ॥

"वर देण्यास तत्पर असलेली लक्ष्मी रात्रीच्या वेळीं लोकांचीं कृत्यें पहात व 'कोण जागत आहे ?' असा प्रश्न विचारीत, सर्व जगांत हिंडते." लक्ष्मीने या वेळीं 'कोण जागत आहे ?' असा प्रश्न विचारला असतां जे लोक या प्रश्नाचें योग्य उत्तर देतात, त्यांवर लक्ष्मी प्रसन्न होते व त्यांच्या घरीं ती आपलें वास्तव्य करते. या वेळीं जे जागत नसतात व घोरत

पडलेले असतात, ते दरिद्रावस्थेंत खिचपत राहतात !

आमच्या पुराणग्रंथांमध्ये 'कोजागरी पूर्णिमा' या नांवाने प्रसिद्ध असलेली एक पूर्णिमा आहे. या दिवशीं पुष्कळ भाविक लोक स्वतः दूध पितात, त्यांहून थोडे आपल्या इष्टमित्रांसही दूध पाजतात व त्यांहून फारच थोडे लोक रात्रभर जागत बसतात व त्याहून विरळाच लक्ष्मीच्या या वरील प्रश्नाला योग्य उत्तर देण्याइतके तत्परतेने जागत असतात ! त्यामुळे धर्मग्रंथांनी लक्ष्मी अमूक रात्रीं येणार व अमूक प्रश्न विचारणार, असें सांगितलें असतांही त्यापासून कोणी आपला फायदा करून घेण्याचा विचार करीत नाही !! वरील श्लोक कोजागरी पूर्णिमेच्या कथेंतील आहे. तो लक्ष्यपूर्वक पाहिला असतां आपणांस पुढील गोष्टी त्यांत आहेत, असें दिसून येईल—

१. लक्ष्मी 'वर' देण्यास नेहमी तयार आहे खरी; पण तिच्याकडून वर, घेणारा तिला भेटल्याशिवाय ती आपण होऊन कोणास वर देऊं शकत नाही.

२. ती रात्रीच्या वेळीं लोक काय करीत आहेत हें पाहते व कोण वर देण्यास योग्य आहे, हें त्याच्या रात्रींच्या आचरणावरून ठरविते.

३. जो जागत राहतो त्यावरच ती प्रसन्न होते. जे घोरत पडलेले असतात त्यांवर ती प्रसन्न होत नाही.

४. कलावान् ( चंद्रा ) ची पूर्ण वाढ ( पूर्णिमा ) झाली आहे, असें पाहून लक्ष्मी वर देण्यासाठी बाहेर पडते. जेव्हा कलावान् क्षयी स्थितींत असतो, तेव्हा ही कोणालाही वर देत नसते.

वरील श्लोक पाहिला म्हणजे लक्ष्मीच्या स्वभावामधील या चार गोष्टी वाचकांच्या लक्ष्यांत तेव्हाच येऊं शकतील.

दिवस मावळला व अंधार पडूं लागला, म्हणजे ती बाहेर पडते व अंधकारांत राहून लोक काय करीत आहेत, हें प्रथम पाहते. दिवसाच्या

वेळीं ती बाहेर पडत नाही. मनुष्य दिवसा काय करीत आहे, त्याकडे तिचें फारसें लक्ष्य नसतें. अंधकार पडला म्हणजे मनुष्याला वाईट काम करण्याची प्रवृत्ति होते. यासाठी मनुष्यांची ही प्रवृत्ति कशी काय आहे, तें पाहण्यासाठी ती रात्रीं लोकांचें आचरण कसें काय चालत असतें, तें स्वतः पाहते व ज्यांचें आचरण चांगलें असतें, त्यांसच वर देते. रात्रीच्या वेळचें दुराचरण हें केवळ नैतिक दृष्टयाच आहे असें कोणी समजूं नये; औद्योगिक दृष्टया किंवा राजकीय दृष्टया सुस्ती, आळस व घोरत पडणें, हें सुद्धा दुराचरणच होय. असें कोणत्या-ही प्रकारचें दुराचरण जो करतो, त्यावर लक्ष्मी कधीही प्रसन्न होत नाही.

## कलेची पूर्णता.

कलावानाची पूर्णता झालेली असून जागृति झाली पाहिजे. ही गोष्ट 'कोजागरी' च्या उत्सवांत मुख्य आहे. चन्द्र हा कलावान् आहे. हा कलावान् किंवा कलानिधि जेव्हा पूर्ण होईल, त्या वेळीं वर देणारी लक्ष्मी वर देण्यासाठी बाहेर पडते. जेव्हा हा कलावान् क्षयी असतो, त्याच्या कलांची पूर्णता झालेली नसते, त्या वेळीं कोणासही लक्ष्मी वर देत नसते. लक्ष्मीचा हा गुण लक्ष्मीवान् होऊं इच्छिणाऱ्यांनी नेहमी लक्ष्यांत ठेवला पाहिजे.

राष्ट्रांतील कलावानांच्या सर्व कलांची पूर्ण वृद्धि झाल्यानन्तर, कलावन्तां-च्या सर्व कला पूर्णपणें प्रकाशूं लागल्यावर त्या राज्यांतील लोक जर जागृत असले, तरच लक्ष्मी त्यांस प्रसन्न होते. तिथींमधील पूर्णिमा ही 'कलावाना' च्या 'सर्व कलांची पूर्णता' दाखवीत आहे. याच वेळीं '**कोण जागत आहे?**' असा प्रश्न विचारीत लक्ष्मी या जगांत हिंडत असते. या प्रश्नाचें योग्य उत्तर देतां येईल, अशी तयारी आपण केली पाहिजे.

राष्ट्रांतील कलावानांच्या सर्व कलांची जरी पूर्णता झालेली असली, तरी जर तेथील लोक आपल्या कर्तव्यास जागत नसले, तर त्यांवर लक्ष्मी प्रसन्न होत नाही, हा ह्या उत्सवांतील बोध हिंदराष्ट्रानें पक्का लक्ष्यांत ठेवण्या-

सारखा आहे; कारण हिंदराष्ट्रामध्ये शेदोनशे वर्षांपूर्वीपर्यंत कलावानांच्या कलांची फारच पूर्णता होती; पण या देशांतील लोक राजकीय, व्यापारी, औद्योगिक व इतर दृष्टींनी जागत नव्हते; त्यामुळे कोणत्या रूपाने कोण कोण येथे येत आहेत, ते काय करीत आहेत व त्याचा परिणाम काय होणार आहे, हें त्यांस ते घोरत पडल्यामुळे समजलें नाही. गेल्या दोन तीन शतकांत दोन–तीनशे वेळ '**कोजागरी पूर्णिमा**' आली व त्या दिवशीं महालक्ष्मीने हिंदवासीयांस '**तुमच्यापैकी कोण** जागत आहे?' असा प्रश्नही केला; पण त्या वेळीं येथे कोणी जागतच नव्हता; म्हणून लक्ष्मीच्या प्रश्नास कोणीच उत्तर दिलें नाही. त्यामुळे हिंदवासीयांची राज्यलक्ष्मी तर निघून गेलीच; पण तिच्याबरोबर इतर सर्व धनदौलतही निघून गेली!! त्यानंतर येथील कलावानांची एक एक कला क्षय पावूं लागली व आज बहुतेक सर्व कलांचा क्षय झालेला आहे. योग्य वेळीं न जागल्याने कसा अनर्थ होतो, ही गोष्ट याप्रमाणे हिंदराष्ट्रास पूर्णपणाने समजली आहे.

हिंदूंच्या सणांमध्ये त्यांस 'जागत रहा' म्हणून सांगणाराही एक सण आहे. तो कलानिधीच्या पूर्ण होण्याच्या दिवशीं एवढ्यासाठीच ठेवला आहे की, उत्सव करणारांस "**कलांच्या पूर्णतेचा संबंध** आपल्या जागण्याशीं व जगण्याशीं आहे" ही गोष्ट समजावी.

## स्वदेशी-व्रत.

ही अवनति कलावानांच्या कलांच्या क्षीणतेमुळे आहे, ही गोष्ट सर्वांत प्रथम कै० लो० टिळकांच्या लक्ष्यांत आली व त्यांनी स्वराज्याच्या चतुःसूत्रींत '**स्वदेशी व्रत पाळा**' असें सांगितलें; कारण स्वदेशी व्रत हेंच कलांच्या उन्नतीस कारणीभूत होणारें आहे. पण या सूत्राला व्यावहारिक स्वरूप देण्याचें कार्य महात्मा गांधींनी केलें. सर्वच कला एकदम उन्नत होणें कठीण आहे, हें जाणून, गुजराथी लोकांच्या व्यापारी व हिशोबी दृष्टीने, त्यांनी सर्वव्यापक

स्वदेशीपैकी एक खादीची कला तेवढीच जनतेपुढे मांडली व सुताने स्वर्गाला जाण्याचा मार्ग दाखवून दिला. सुताची कला ही जीवनाला अत्यंत आवश्यक असल्यामुळे रोजची गरज भागून आवश्यक कार्य करीत असतांच एका मोठ्या कलेची पूर्णता करून दाखवण्याची योजना महात्मा गांधींनी योजली. या दृष्टीने विचार करतां असें म्हणावें लागतें की, आपलें राष्ट्र घोरत निजलेलें असतां आधी लो० टिळक व महात्मा गांधी हे जागे झाले व नंतर त्यांनी इतर पुष्कळ लोकांस जागें केलें व कोजागरीच्या मध्यरात्रीं महात्मा गांधी व त्यांच्या अनुयायांनी लक्ष्मीच्या प्रश्नास ‘ आम्ही जागत आहों ’ असें उत्तर दिलेलें आज सर्व जगाने ऐकलें आहे.

पुष्कळ वर्षे लक्ष्मीच्या प्रश्नास असें उत्तर येथे कोणीच दिलेलें नव्हतें, तेव्हा लक्ष्मीने आश्चर्यचकित होऊन नीट न्याहाळून पाहिलें, तेव्हा तिच्या लक्ष्यांत आलें की, कांही हिंदी लोक तेवढे जागे झाले आहेत खरे, पण अजून बरेच जागे व्हावयाचे आहेत. तेव्हा जागे झालेल्या हिंदी लोकांस तिने पाहिजे तसला वर मागण्यास सांगितलें. तेव्हा महात्माजींनी महालक्ष्मीस सांगितलें की– “ हे देवी ! मी किंवा माझे जेवढे अनुयायी आहेत, तेवढेच तुझ्या-कडून वर प्राप्त करून ऐश्वर्यवान् होऊं इच्छीत नाहीत. सर्व हिंदराष्ट्राला जागें करून आम्ही सर्व हिंदराष्ट्रवासी लोक थोड्याच दिवसांत तुझ्याकडे वर मागूं, त्या वेळीं तो आम्हांस तूं द्यावा.” देवीने ‘बरें आहे’ असें सांगितलें व ती स्वस्थानीं निघून गेली. आता वर मिळण्यास थोड्याशा अधिक जागृतीची आवश्यकता आहे, इतकें ठरलें. व्यक्ति जागी असली तर व्यक्तीला वर मिळेल व राष्ट्र जागृत असलें तर राष्ट्राला वर मिळेल. जो जागा असेल त्यास वर मिळेल.

आपल्या धर्मग्रंथांत ईश्वर जागा असतो, म्हणूनच त्याची लोक पूजा करतात, असें सांगितलें आहे. पहा—

## जागणारांचें कल्याण.

**देवासश्च मर्तासश्च जागृविं प्रभुं विश्पतिं नमसा निषेदिरे ।**

(ऋग्वेद ६।१५।८)

" देव किंवा मनुष्य प्रजापालक प्रभु परमेश्वर जागत असतो, म्हणूनच त्याची पूजाअर्चा करतात." जर ईश्वर निजत असता, तर त्याला कोणीही भजलें नसतें. तो जागा असल्यामुळे सर्वांचें उत्तम रक्षण करूं शकतो, म्हणून त्याला लोक भजतात. जो स्वतः निजतो त्याची भक्ति कोण कशासाठी करील? कारण निजणारा वेळेवर उपयोगी पडेल, असा नियमच नसतो. याचप्रमाणे मनुष्यांमध्येही जो मनुष्य जागृत असतो, त्याचीच प्रतिष्ठा होत असते. या विषयीं पुढील वेदमंत्र फारच मनन करण्यासारखे आहेत—

**यो जागार तमृचः कामयन्ते यो जागार तमु सामानि यन्ति ।**
**यो जागार तमयं सोम आह तवाहमस्मि सख्ये न्योकाः ॥१४॥**
**अग्निर्जागार तमृचः कामयन्तेऽग्निर्जागार तमु सामानि यन्ति ।**
**अग्निर्जागार तमयं सोम आह तवाहमस्मि सख्ये न्योकाः ॥१५॥**

(ऋग्वेद ५।४४।१४-१५)

" जो जागत असतो, त्याच्यावर ऋग्वेदाचे मंत्र प्रेम करतात; जो जागतो, त्याच्याजवळ साम मंत्र येतात; जो जागतो, त्याला सोम म्हणतो की, तुझ्या सख्यामध्ये मी घर करून राहतों. याला उदाहरण असें की, अग्नि जागत राहतो, म्हणून त्यावर ऋचा प्रेम करतात व साममंत्रही त्याकडे येतात. अग्नि जागतो, म्हणून त्याला सोम म्हणतो की, तुझ्या सख्यामध्ये मी राहतों."

या मंत्रांवरून उघड होतें की, वेदमंत्र कितीही उत्तम असले तरी त्यांच्यापासून फायदा व्हावयाचा तो जागत राहणाऱ्या माणसालाच होतो.

जो जागत राहून पहारा करतो व आपलें रक्षण करण्यास तत्पर असतो, तोच वेदाच्या उपदेशापासून आपला लाभ करून घेऊं शकतो. आम्ही आपल्या हितासाठी कसें जागावें, तेंही वेदाने सांगितलें आहे. पहा—

**ये रात्रिमनुतिष्ठन्ति ये भूतेषु जाग्रति ।**

**पशून्ये सर्वान् रक्षन्ति, ते न आत्मसु जाग्रति, ते नः पशुषु जाग्रति ॥**

**(अथर्व० १९।४८।५)**

" जे रात्रीच्या वेळीं पहारा करतात, जे सर्व प्राणी निजले असतांही जागत राहतात, जे पशूंचें व आपलें जागृत राहून रक्षण करतात, तेच खरे जागत असतात. "

**भूत्यै जागरणमभूत्यै स्वप्नं ॥ (वा० यजु० ३०।१७)**

" उन्नतीसाठी जागृति व अवनतीसाठी सुस्ती आहे." जे लोक आत्म-हितासाठी जागत असतात, तेच आपली भरभराट करून घेतात व जे घोरत पडतात, ते अवनतीमध्ये जातात. सर्व इतिहास हेंच सांगत आहे व आपला अनुभवही तसाच आहे. राष्ट्रामध्ये जागृत राहणें, तें सत्याला बरोबर घेऊन जागलें पाहिजे. याविषयी असें म्हटलें आहे—

**तेन सत्येन जागृतम् ॥ (ऋ० १।२१।६)**

"सत्याने जागून पहारा करा." सत्याला समोर ठेवा व त्या सत्यदृष्टीने जागे रहा व आपलें रक्षण करून घ्या. सत्याशिवाय नुसत्या जागण्याने कार्य-भाग होणार नाही. " अशा रीतीने जो जागृत असतो, त्याचेंच देव रक्षण करतो. पहा—

**पाहि जागृविम् ॥ (ऋ० ३।३७।८; अथर्व २०।२०।१; २०।५७।४)**

"जागृत राहतो, त्याचें रक्षण कर." जो आपल्या रक्षणासाठी जागतच नसेल, त्याचें रक्षण देव तरी कसें करणार ? प्रत्येक युद्धांत जागृत मनुष्या-

ल्याच फार महत्त्व असतें. पहा—

जागृविर्विदथे शस्यमाना । (ऋ० ३।३९।१-२)

" युद्धामध्ये जागृत मनुष्याची प्रशंसा फार होते. " युद्धामध्ये सुस्त, आळशी किंवा झोपाळू अशा माणसाला कशी किंमत येणार ? सर्वच युद्धाला हा नियम लागू आहे. मनुष्य हा प्रत्येक क्षणीं कोणत्या ना कोणत्या तरी युद्धांत उभा असतोच. त्या सर्व जीवनार्थकलहांमध्ये जर त्यास यश पाहिजे असेल, तर त्याने आपली जागृति ठेवली पाहिजे. जागृति असेल तर यश मिळेल. यासाठी सांगितलें आहे की—

सं त्वा शिशामि जागृह्यदब्धं विप्र मन्मभिः । (ऋ० १०।८७।२४)

" मी तुला प्रेरणा देतों की, तूं मननशक्तीसह अखंड जागत रहा. " घोरत पडूं नकोस. घोरत पडशील तर फसशील, मग तुला तरून जाण्याचा उपाय दिसणार नाही. जे अशा रीतीने जागत असतात, तेच तेजस्वी यशाने युक्त होऊन आपल्या मातृभूमीला आपल्या शक्तीने धारण करूं शकतात. म्हणून म्हटलें आहे—

ज्योतिष्मतीमदितिं धारयत्क्षितिं स्वर्वतीमा सचेते
दिवे दिवे जागृवांसा दिवे दिवे ।
ज्योतिष्मत्क्षत्रमाशाते । (ऋ० ५।६२।८)

" तेजस्वी अविनाशी व आत्मीयतेने युक्त अशा मातृभूमीची नेहेमी जागृत असणारेच प्रतिदिवशीं योग्य रीतीने सेवा करतात व आपलें तेजस्वी क्षात्रतेज वाढवतात. " जागृत असणारे लोकच मातृभूमीची सेवा करून आपलें क्षात्रतेज अधिक तेजस्वी करतात. जे घोरत पडतात, ते नाश पावतात. भारतीय हिंदी लोक घोरत पडल्यामुळेच गेल्या दोन शतकांमध्ये त्यांस आपलें क्षात्रतेज अधिक उज्ज्वल करतां आलें नाही व आपल्या मायभूमीला तेजस्वी बनवतां आलें नाही. भारतीयांजवळ हे वेदसंदेश होते; पण ते तसेच

पोथींत पडून राहिले होते. ते उपयोगांत आणावयासाठी झाले तरी मनुष्य जागृत असला पाहिजे. अशा रीतीनें राष्ट्रांतील पुरुष जागत असले, तरच त्यांचें यश उज्ज्वल होतें. म्हणून वेद सांगत आहे की–

**वयं राष्ट्रे जागृयाम पुरोहिताः ॥ (वा० य० ९।२३)**

"आम्ही आपल्या राष्ट्रांत अग्रभागीं राहून जागूंया." म्हणजे राष्ट्राचे नेते होऊन राष्ट्राचें भवितव्य आपल्या प्रयत्नाने अधिक उज्ज्वल करूंया. "राष्ट्रांत जागत राहणें" ( राष्ट्रे जागृयाम ) हा उपदेश जर लोक पाळतील, तर राष्ट्रीय अवनति होणारच नाही.

**ब्रह्मणा पयसा वावृधानो विशि राष्ट्रे जागृहि ॥ (अथर्व०१३।१।९)**

"ज्ञानाने व दुधाने पुष्ट होत आपल्या राष्ट्रांतील प्रजेमध्ये जागत रहा." ज्ञानाने आपल्या मनाला व बुद्धीला पुष्ट कर व दुधाने–गाईच्या दुधाने— आपलें शरीर पुष्ट कर. अशा रीतीने पुष्ट झाल्यावर त्या शक्तीचा उपयोग करण्यासाठी आपल्या राष्ट्रांतील प्रजाजनांमध्ये जागृति उत्पन्न कर. हें मनुष्याचें राष्ट्रीय कर्तव्य आहे. जो असें करतो, तोच लोकांचा खरा रक्षणकर्ता होतो. पहा—

जनस्य गोपा अजनिष्ट जागृविः । ( वा० यजु० १५।२७ )
ज्योक् क्षेत्रेऽधि जागरत् । ( अथर्व० १९।२४।२)

"जो जागणारा मनुष्य असतो, तोच जनांचा रक्षक होतो. तो आपल्या क्षेत्रामध्ये राहून जागत राहतो." जागत राहून पहारा करतो, म्हणून तो रक्षण करूं शकतो. याप्रमाणे जनहित व राष्ट्रहित करणारांस स्वतः जागृत राहून लोकांस जागृत करण्याचें कार्य केलें पाहिजे. असे जागणारे लोकच धन प्राप्त करूं शकतात. याविषयी पुढील मंत्र पहा—

**रयिं जागृवांसो अनुग्मन् । (ऋ० ६।१।३)**
**स नो वित्तेऽधि जाग्रति । (अथर्व० १९।४८।६)**

" जे जागतात, ते धन प्राप्त करतात. तो तर आमच्या वित्ताचें जागून रक्षण करतो. " आपल्या हितास जागल्याशिवाय धन प्राप्त होणार नाही व आपल्या मालमत्तेचें स्वतः रक्षण केल्याशिवाय तिचें रक्षणही होणार नाही. हे धर्मवचनांचे आदेश पहावे व दरिद्री झालेल्यांनी आपल्या कृतकर्माचें मनन करावें; म्हणजे त्यांस कळून येईल की, आपण स्ववित्तरक्षणासाठी जागलों नाही व आपलें कर्तव्य केलें नाही, म्हणून आमची आजची अशी विपन्न स्थिति झालेली आहे. यासाठी झाली ती चूक झाली, निदान यापुढे तरी आपण आपल्या वैयक्तिक व राष्ट्रीय हितासाठी जागूंया व पुढे अशा चुका होणार नाहीत अशी व्यवस्था करूंया. म्हणजे आमची भविष्यकालीं ऊर्जितावस्था खात्रीने होईल.

प्रत्येक मनुष्याने आपापल्या घरांत जागत राहिलें पाहिजे. वास्तविक रीतीने हें कोणास सांगावें लागूं नये व न सांगताच ज्याचें त्याने आपल्या घरीं वित्ताचें रक्षण व संवर्धन करावें. पण ही साधी गोष्ट आपल्या धर्माने सांगितली असूनही, आपण त्याकडे लक्ष्य देत नाहीं, याचें आश्चर्य करावें तेवढें थोडें आहे. या विषयींचे कांही आदेश पहा–

**स्वे गये जागृह्यप्रयुच्छन् । (वा० य० २७।३; अथर्व० २।६।३)**

'आळस न करतां किंवा चुका न करतां आपल्या घरांत जागृत रहा.' दक्षता ठेवून व जागून आपल्या घराचें रक्षण करा. हा उपदेश सर्वांनी लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. तसेंच–

**सदं वेति द्रुहो रक्षसः पाति जागृविः । (ऋ० ९।७१।१)**

" जो जागतो, तो द्रोह करणाऱ्या दुष्ट राक्षसांपासून आपल्या घराचें रक्षण करतो. " असें जो न करील, त्याचें घर राक्षस लुटून फस्त करतात व

घराच्या मालकास भिकेस लावतात. आपल्या संरक्षणासाठी जागणें, हा प्रत्येकाचा धर्मच आहे. जो नियम घराला लागू आहे, तोच राष्ट्राला व तोच देशाला लागू आहे. जसें घर हें एका कुटुंबाचें राहण्याचें स्थान असतें, त्याचप्रमाणे राष्ट्र हें सर्व जनतेचें राहण्याचें घरच आहे. यासाठी जो नियम घराच्या रक्षणासाठी सांगितला, तोच राष्ट्राच्या रक्षणासाठी समजावा; अर्थात् आपण आपल्या राष्ट्रांत जागत राहिलें पाहिजे व दुष्ट शत्रूपासून आपण आपल्या राष्ट्राचें संरक्षण केलें पाहिजे.

## कोजागरी पूर्णिमा.

हिंदुधर्मामध्ये कोजागरीचें व्रत जें घातलें आहे, तें केवळ नारळाचें पाणी किंवा दूध पिण्यासाठीच किंवा कांही तास रात्री जागण्यासाठीच नव्हे; ‘ आत्मरक्षणासाठी नेहमी जागत रहावें ’ अशी सूचना तें व्रत देत आहे. जागणें, जागून पहारा करणें किंवा आत्मरक्षणासाठी दक्ष असणें, यांचा आशय एकच आहे. कोजागरी पूर्णिमेच्या उत्सवाचा जर कोणी ‘त्या रात्रींच जागणें’ एवढाच अर्थ करील, तर त्यास त्या उत्सवांतील मर्म समजलें नाही, असें ठरेल. ‘ जो जागतो, त्यास लक्ष्मी वर देते ’ हा उत्सवांतील मुख्य आशय आहे. मनुष्याच्या पुढे वारंवार उत्तम संधि येत असतात, दक्षतेने त्या संधींपासून जो मनुष्य आपला फायदा करून घेईल, त्याला लक्ष्मी प्रसन्न होते.

कोजागरी उत्सव हा ‘ जागृतीचा संदेश ’ हिंदवासीयांस देत आहे. याप्रमाणे आपल्या धर्मामध्ये जागें राहून आपलें रक्षण करण्याविषयीचा विशेष उपदेश केलेला आहे, तो पाहून ‘ आत्मरक्षण ’ करणें, हें आपल्या धर्मांतील विशेष महत्त्वाचें तत्त्व आहे, हें जाणून प्रत्येकाने तें आपल्या आचरणांत आणून आपली ऐहिक व पारमार्थिक उन्नति करून घ्यावी.



# अर्धनग्न फकिराचा विजय !

" ज्या बड्या लाटसाहेबांच्या राजवाड्याच्या पायऱ्यांवर बूट-पाटलोण घातल्याशिवाय कोणीही पाय ठेवूं शकत नाही, त्या पायऱ्यांवर हिंदुस्थानांतील अर्धनग्न फकीर खादीचा पंचा नेसून व धाबळी पांघरून उघड्या पायांनी जवळ जवळ अर्धनग्न स्थितींत चढतो व त्या बड्या लाटसाहेबांच्या खुर्चीजवळ आपली खुर्ची ठेवून बरोबरीच्या नात्याने बसतो; बरोबरीच्या नात्याने तहाच्या शर्तींची वाटाघाट करतो; लाटसाहेबांचा व या अर्धनग्न फकिराचा समेट होतो व शेवटीं या दोघांचा एकत्र फोटोही घेतला जातो. " हें सर्व घडलेलें वृत्त ऐकून विलायतेच्या साहेबांचीं डोकीं भणभणून गेलीं व ते वेड्याप्रमाणे हवें तें बरळूं लागले !!

काय असेल तें असो; या अर्धनग्न फकिराचें सामर्थ्य फार मोठें आहे, यांत शंका नाही. ज्याला बिनमुदतीने इंग्रज सरकारने कैदेंत टाकलें, त्याला बिनशर्त सोडावें लागलें, त्याला अगदी बरोबरीच्या नात्याने वागवावें लागलें व त्याने घातलेल्या अटींचा सामोपचाराने विचार करावा लागला. हा फरक

ज्या शक्तीने झाला, त्या आत्मिक बलाकडे कानाडोळा करून आता चालावयाचें नाही.

एकीकडे भयंकर विनाशक तोफा, विमानें व विघातक जहाजें, सैन्यें व संहाराचीं अनंत साधनें जय्यत तयार आहेत; तर दुसरा पक्ष सर्वस्वीं निःशस्त्र, शस्त्र धरणार नाही अशी प्रतिज्ञा करणारा, अहिंसावृत्ति धारण करणारा, स्वतः मरण्यास तयार असून शत्रूस मारावयाचें नाही असें म्हणणारा, शत्रूने पाहिजे तर आपणांस मारावें, पण आपण शत्रूच्या केसांना सुद्धा धक्का लावणार नाही अशा मताचा, पाशवी बलाकडे पूर्ण दुर्लक्ष्य करून केवळ सत्य, अहिंसा व आत्मिक बल यांचाच आश्रय करणारा! काय हा विलक्षण संग्राम! एक पक्ष म्हणतो की मी जगाचा संहार करीन, तर दुसरा पक्ष म्हणतो की मी शत्रूच्या केसालासुद्धा धक्का लावणार नाही! पण शेवटीं विजय होतो निःशस्त्र पक्षाचा! सशस्त्र पक्षाला नमावें लागतें! अहिंसेच्या सैनिकांपुढे हिंसेच्या सैनिकांचें कांही चालत नाही!!!

आर्यांच्या प्राचीन इतिहासांत आत्मिक बलापुढे पाशवी बलाला नमावें लागलें, असे अनेक प्रसंग आहेत. अगदी वैदिक कालीं अत्रि ऋषीने त्या वेळच्या असुर राजांच्या विरुद्ध प्रचंड चळवळ चालविली होती.

या अत्रि ऋषीच्या चळवळीने त्या वेळीं असुरांचें परचक्र दूर झालें व ऋषींच्या राष्ट्राला पुनः पूर्ण स्वराज्य प्राप्त झालें. अहिंसा व सत्य यांच्या आश्रयाने निःशस्त्र लोकांनी सशस्त्र लोकांवर विजय मिळविल्याचा हा मनोरंजक इतिहास वेदांमध्ये आहे व तो फार मननपूर्वक पाहण्यासारखा आहे. या चळवळीचें ब्रीद-वाक्य हें होतें—

अहिंसा-सत्य-अस्तेय-ब्रह्मचर्य-अपरिग्रह
शौच-संतोष-तप-स्वाध्याय-ईश्वरप्रणिधान ॥

अहिंसा, सत्य, चोरी न करणें, ब्रह्मचर्य, अपरिग्रहवृत्ति अवलंबणें, पवित्रता, संतोषवृत्ति, शीत–उष्ण–सुखदुःख सहन करणें, ज्ञान प्राप्त करणें, ईश्वरभक्ति करणें. " हे नियम जरी पतंजलीने आपल्या योगदर्शनामध्ये लिहिले असले, तरी ते वैदिक ऋषींच्या चळवळींत पूर्णपणाने होते व ते लाभप्रद झाल्यामुळेच त्यांना व्यवहार–योगामध्ये स्थान मिळालें. याप्रमाणे निःशस्त्र चळवळीचा हा पहिला विजय अत्रि ऋषीच्या वेळीं झाला.

त्यानंतर प्रल्हादानेही अहिंसा व सत्य यांच्या आश्रयाने आपली चळवळ चालविली. त्याने जवळ जवळ सत्याग्रहच सुरू केला होता. हिरण्यकशिपू या राक्षसराजाने आपल्या राज्यांत दैवी संस्कृतीचें नांव सुद्धा कोणी घेऊ नये. फक्त आसुरी संस्कृतीचाच सर्वांनी अभ्यास करावा. दैवी संस्कृतीचा लोकमान्य वीर भगवान् नारायण विष्णु याची कोणी पूजा करूं नये, त्याचें नांवही कोणी घेऊं नये, त्याच्या पराक्रमाचा इतिहास शाळांमध्ये शिकवला जाऊं नये; फक्त आसुरी संस्कृति असुर शिक्षकांकडूनच शिकविली जावी, असुरांचा जयजयकार सर्वत्र केला जावा, देवांचें अस्तित्वही पुढील पिढीच्या अंतःकरणांत राहूं नये व असुरांचा दबदबा पुढील पिढीच्या अंतःकरणांत स्थिर व्हावा, अशासाठी हिरण्यकशिपूने आपल्या राज्यांत सर्वत्र व्यवस्था केली होती.

जेव्हा कोणी परकीय राजा दुसऱ्या देशावर स्वामित्व करतो, तेव्हा जित देशाची संस्कृति नामशेष करावी व आपल्या संस्कृतीचा जयजयकार वाढवावा, यासाठी त्यास खटपट करावीच लागते. हिरण्यकशिपू हा विदेशी राजा असल्यामुळे त्यालाही त्याच कुटिल राजनीतीचा अवलंब करावा लागला, यांत कांहीच आश्चर्य नाही. हिरण्यकशिपूच्या राज्यांत सर्व जातीची प्रजा होती. निरनिराळ्या संस्कृतींच्या प्रजाजनांस आपापल्या धार्मिक उपासना करण्यास प्रतिबंध होऊं लागला. राक्षसाची भक्ति करणारांस उत्तेजन दिलें जात होतें व देवांची भक्ति करणारांचा छळ होत होता. हा धार्मिक जुलूम त्या

काळच्या लोकांस असह्य झाला !

जित लोकांची संस्कृति दाबून टाकली जात होती; तथापि त्यांचें अन्तः-करण मृत झालें नव्हतें. त्यामुळे ते आंतून प्रयत्न करीतच होते. शेवटीं त्यांच्यापैकी कांही लोकांनी प्रत्यक्ष युवराज प्रल्हादासच गाठलें व त्यास दैवी संस्कृतीचा परिचय करून दिला. त्याला दैवी संस्कृति रुचली व तोच स्वतः नारायणाची भक्ति करूं लागला व आसुरी संस्कृतीचा तिटकारा करूं लागला.

दैवी संस्कृतीने हिरण्यकशिपूच्या घरांतच प्रवेश केल्यामुळे व या वेळच्या सत्याग्रहाच्या चळवळीचें नेतृत्व प्रल्हादाकडेच आल्यामुळे व प्रल्हादाचे अनुयायी तरुण पिढींत पुष्कळच झाले असल्यामुळे जसा सत्याग्रहाच्या चळवळीला, तसाच दडपशाहीला या वेळीं ऊत आला. या सत्याग्रहाच्या चळवळींत ज्यांनी भाग घेतला, त्यांचा कडेलोट केला, त्यांना सुळावर चढवलें, फाशीं दिलें, समुद्रांत बुडविलें, जाळलें, पोळलें व जें काय सशस्त्र साम्राज्यवाद्यांस करतां आलें, तें सर्व त्यांनी केलें; पण शेवटीं निःशस्त्र प्रल्हादाच्या लोकपक्षाचा विजय झाला व सशस्त्र साम्राज्यवादी हिरण्यकशिपूच्या नोकरशाहीचा पूर्ण पराभव झाला.

सत्याग्रही चळवळीचा हा दुसरा विजय होय. या वेळींही निःशस्त्र लोकांच्या सत्याग्रहाचें बल व्यक्त झालें. हे दोनही राजे परदेशी होते. आता स्वदेशी राजाविरुद्ध निःशस्त्र प्रतिकाराची चळवळ केल्याचाही इतिहास आपल्याकडे आहे. विश्वामित्र हा राजा घमेंडखोर, अरेराव व आपल्या वैभवाच्या वाढीसाठी सत्यासत्याची पर्वा न बाळगणारा होता. वसिष्ठाच्या आश्रमांतील गाय जबरदस्तीने नेण्यासाठी त्याने आश्रमावर चाल केली. वसिष्ठ ऋषीने शस्त्र उगारलें नाही किंवा त्याचें मनाने अहितही चिंतिलें नाही; पण शेवटीं वसिष्ठाच्या अहिंसावृत्तीचा विजय झाला व साम्राटाच्या हिंसावृत्तीस लज्जित व्हावें लागलें. या वेळीं लज्जित होऊन विश्वामित्राने म्हटलें होतें—

धिग्बलं क्षत्रबलं ब्रह्मतेजो बलं बलम् ।

" पाशवी क्षात्र बल हें व्यर्थ आहे, आध्यामिक ब्राह्म बल हेंच खरें बल आहे. " या वेळींही निःशस्त्र चळवळ करणाऱ्याचा विजय झाला. याचा परिणाम शेवटीं असा झाला की, विश्वामित्राला राज्यत्याग करून अहिंसावादी ब्राह्मण्याचा स्वीकार करावा असें वाटलें व त्याप्रमाणे त्याने केलें. यापेक्षा अहिंसेचा व सत्याचा अधिक जय तो काय होणार ?

मुसलमानी बादशहांच्या वेळींही अशीं सत्याग्रहाचीं कांही उदाहरणें घडलीं होतीं. पैठणचे मुसलमान अधिकारी आपल्या अधिकाराच्या गुर्मीत एकनाथस्वामींच्या अंगावर थुंकले ! स्वामींनी ' कल्याण होवो ! ' असें म्हणून पुनः स्नान केलें. असा प्रकार वीस-एकवीस वेळ झाला. पुढे स्वामींच्या शांत स्वभावामुळे अधिकारी शरमले व उपरति होऊन ते स्वामींचे शिष्य बनले. या वेळींही अहिंसा, सत्य व शांति यांचाच जय झाला व क्रौर्य, असत्य व अशांति यांचा पराजय झाला !

याप्रमाणे वैदिक कालापासून गेल्या शतकापर्यंत अहिंसामय शांतिमय सत्याग्रहाचा विजय होत आला आहे व या आत्मिक बलापुढे मोठमोठ्या पाशवी शक्तीच्या सम्राटांस मान वाकवावी लागली आहे.

या अर्धनग्न फकिराने जो हा सत्याग्रहाचा मार्ग काढला आहे, हा आर्य-राष्ट्रांत कांही नवीन नाही. याचा यापूर्वी अनेक वेळां आर्यराष्ट्राने अनुभव घेतला होता व सध्याही त्याचें प्रत्यंतर येत आहे. हा ' अहिंसामय-सत्याग्रह-योग ' जरी फार प्राचीन ऋषिकालापासून आर्यधर्मामध्ये असला, तरी तो मध्यंतरीं लोपला होता व सर्व आर्यराष्ट्र हिंसेने, पाशवी बलाने, घातपाताने व कत्तलीने आपला तरणोपाय होणार, असें मानावयास लागलें होतें ! त्या प्राचीन अहिंसा-योगाचाच या अर्धनग्न फकिराने पुनः उपदेश केला आहे कीं

काय, असें जर याला विचारलें तर त्याच्याकडून उत्तर असेंच येईल—

> एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।
> स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥
> स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः॥ (भ०गी०अ०४)

" हा परंपरेने चालत आलेला ( निःशस्त्र–प्रतिकाराचा ) योग पूर्वी सर्व ऋषिलोकांना माहीत होता, पण कालांतराने लोक विसरले, म्हणून हा पुरातन योग मी आता पुनः सांगितला आहे. "

या अर्धनग्न फकिराने अहिंसामय प्रतिकाराची ही जी चळवळ सध्या चालवली आहे, ती ऋषिकालापासून चालत आलेली आहे. ती ब्राह्मणी धर्मांत पूर्वी होती. जोंपर्यंत या धर्मांत ब्राह्मणी धर्माचें वर्चस्व होतें, तोंपर्यंत सत्याग्रहावर लोकांचा विश्वास होता; पण जेव्हा ब्राह्मणी विचारसरणी लुप्त झाली व क्षात्र विचारसरणी बळावली, तेव्हापासून सत्याग्रहावरील लोकांचा विश्वास उडाला व हिंसेवरील विश्वास बळावला. सत्याग्रहावर पुनः लोकांचा विश्वास बसवण्याचा प्रयत्न या अर्धनग्न फकिराने केला व त्यास अश्रुतपूर्व यशही आलें ! या फकिराच्या हाकेबरोबर लाखों माणसें शांतियुद्धाच्या क्षेत्रांत उतरलीं, सत्तर हजारांपेक्षा अधिक आनंदाने तुरुंगांत गेलीं, हजारो जखमी झालीं व शेकडो मृत्युमुखांत पडलीं. या फकिराच्या हाकेबरोबर लाखो लोक प्राणांची आहुति देण्यास तयार होतात, ही शक्ति याच्या हाकेंत आहे.

ज्या स्त्रिया लाजेने घराबाहेर पडणार नाहीत, त्या स्त्रिया युद्धभूमींत येतात, कसलेल्या सोल्जरांबरोबर झोंबी खेळतात, लाठीचा मार व इतर हालअपेष्टा सहन करतात; पण सत्याग्रहाचा मार्ग सोडीत नाहीत; हा चमत्कार या अर्धनग्न फकिराने घडवून आणला ! लहान मुलांच्या वानरसेना

तयार झाल्या व त्याही विलक्षण कामगिरी करूं शकल्या. याचें कारण या अर्धनग्न फकिराचा हा शांतिमंत्रच होय.

या अर्धनग्न फकिराने या अहिंसा-सत्ययुक्त ब्रह्मास्त्राचा उपयोग प्रथम आफ्रिकेंत केला. त्या वेळीं हा 'फकीर' ही नव्हता व 'अर्धनग्न' ही नव्हता. इतर सभ्य छानछोक लोकांप्रमाणे सर्व शरीर कपड्यांनी गुंडाळीत असे; पण पुढे या ब्रह्मास्त्राचा प्रयोग आपल्या मायभूमींत करून पहावा, असें याच्या मनांत आलें व मायभूमीस याचे पवित्र पाय लागले; तथापि १९२२ सालापर्यंत सत्याग्रहावर लोकांचा विश्वास बसलेला असला, तरी अहिंसेवर लोकांचा विश्वास बसावा तितका बसला नव्हता. अहिंसा व सत्य यांशिवाय हें ब्रह्मास्त्र वापरतां येत नाही, उलट अहिंसा व सत्य हें पथ्य न पाळलें, तर हें ब्रह्मास्त्र प्रयोग करणारावरच उलटतें. याचा अनुभव १९२१-२२ सालापर्यंत या देशांत पुष्कळदा आला. पुष्कळ लोक अहिंसा व सत्य पाळणें अशक्य आहे, असें म्हणून याची थट्टा करीत. पण या कालांत आपल्या राष्ट्राची अशी कांही विलक्षण तयारी झाली की, अहिंसा तंतोतंत पाळणारीं व सत्याच्या धारेवर चालणारीं लाखो माणसें आज तयार झालीं आहेत; इतकेंच नव्हे तर पुष्कळच लोकांचा अहिंसा व सत्य या पथ्यावर विश्वास बसत चालला आहे व प्रत्यहीं सत्याग्रही वीरांची संख्या विलक्षण रीतीने वाढत आहे. या कालांत या फकिराने हिंदी लोकांचीं मनें जशीं आकर्षून घेतलीं तशीं फक्त भगवान् श्रीकृष्णाने पांच हजार वर्षांपूर्वी आकर्षून घेतलीं होतीं !

भारतवर्ष ही अध्यात्म-शक्तीची भूमि आहे. अनादि कालापासून या भूमीमध्ये अध्यात्मज्ञानवैभवाने सुभूषित झालेलीं अशीं हजारो नररत्नें होऊन गेलीं. या देशांतून हजारो उपदेशक गेले व त्यांनी बाहेरच्या जगांत अध्यात्मज्ञानाचा विजयी झेंडा रोवला; त्याचे अवशेष आजही दिसण्यासारखे आहेत.

इतर देशांतील वीरांनी हिंसा करून जगभर राक्षसी विजय मिळविले, तसें आपल्या देशांतील वीरांनी केलें नाही. आपल्या देशांतील धर्मवीरांनी जगभर धर्माचा दिग्विजय केला, अहिंसेचा महामंत्र जगास दिला व सत्याचा संदेश सर्वत्र पसरविला. हाच आपला मार्ग आजही आर्यराष्ट्राने आंखावा, म्हणून या अर्धनग्न फकिराचा सारखा प्रयत्न चालू आहे व त्यास आता यशही येऊं लागलें आहे.

हिंसेच्या मार्गांत केव्हा तरी पराजयाचा संभव असूं शकतो; पण या सत्याग्रही युद्धांत सत्याग्रही पक्षाचा कधी पराभवच होत नाही, नेहमी विजयच होत असतो. म्हणूनच यास ' ब्रह्मास्त्र ' असें म्हणतात. सत्य हें परमेश्वराचेंच स्वरूप असल्यामुळे जो सत्याग्रही बनतो, तो परमेश्वराचा अनुयायी होत असल्यामुळे त्याचा नेहमी विजयच होणार, यांत काय शंका आहे ?

अलेक्झांडरने जग जिंकलें खरें, पण पंजाबच्या दण्डी स्वामीपुढे आपली तरवार त्यासही खाली ठेवावी लागली. या भरतभूमीमध्ये हा जो चमत्कार वारंवार घडून येतो, त्याचें कारण ही भूमि जगाला नवी संस्कृति देण्यासाठीच निर्माण झाली आहे हें होय. आज आपण पारतंत्र्यांत असतांही आमच्यापैकी या एका अर्धनग्न फकिराने जगास " अहिंसेच्या मार्गाने जाऊन सत्याच्या आश्रयाने आपली गांजणूक दूर करून घेतां येईल " हा संदेश दिला आहे व तो बऱ्याच देशांतील लोकांस पटलाही आहे. आज अशा स्थितींत आपल्या देशाने हा ' नव-युग-धर्म ' जगास दिला आहे. जगांतील हजारों शूरवीर जी शांति स्थापूं शकत नाहीत, ती शांति या फकिराला स्थापतां येते, हें अद्भुत दृश्य आज आपण पाहत आहों, हें आपलें केवढें भाग्य आहे बरें ?

जर या फकिराच्या सांगण्याप्रमाणे जगांतील राष्ट्रें वागूं लागतील, तर सैन्यवृद्धीवर व मारक शस्त्रास्त्रांवर खर्च होणारे अब्जावधि रुपये गरिबांचें सुख वाढवण्याच्या कामीं खर्च करतां येतील. विलायतेंतील अधिकारमदाने

अन्ध झालेले साहेब अर्धनग्न फकिराबद्दल वाटेल ते उपहासाचे उद्गार काढीत. पण याच्या या ब्रह्मास्त्रापुढे त्यांचीं हिंसक शस्त्रास्त्रें फिकीं पडलीं, यांत कांही शंका नाही; इतकेंच नव्हे तर या ब्रह्मास्त्राची अद्‍भुत शक्ति सर्व राष्ट्रांतील विचारी लोकांस पटली आहे, ही गोष्ट आज प्रत्यक्ष दिसत आहे. अर्थात् कोणत्याही प्रचंड वीरास जेवढा जगाचा भाग कधीही जिंकतां आला नाही, तेवढ्या जगाच्या भागावर या अर्धनग्न फकिराने विजय मिळविला आहे व तो विजय हिंदराष्ट्राच्या आंतील विजयापेक्षा फारच अधिक मोलाचा आहे.

१९२२ सालापर्यंत या फकिराची मानमान्यता हिंदुस्थानांत होतीच, पण १९३० सालीं त्याने जशीं आबालवृद्धांचीं अन्तःकरणें आपल्या या सत्य-मंत्राने भारून टाकलीं आहेत, तशी स्थिति पूर्वी नव्हती. भगवान् गौतम बुद्धाने अहिंसायुक्त सत्याचा मार्ग अडीच हजार वर्षांपूर्वी उद्‍घोषित केला; पण त्या वेळीं त्याला यामुळे त्रास भोगावा लागला नाही. नंतर पांचशे वर्षांनी पैगंबर येशू ख्रिस्ताने तोच मार्ग उपदेशिला. तेव्हा त्याला स्वतःला हाल सोसावे लागले व शेवटीं प्राणांसही मुकावें लागलें. त्यानंतर दोन हजार वर्षांनी या अर्धनग्न फकिराने तोच मार्ग उपदेशिला, यामुळे याला व याच्या लाखो अनुयायांस भयंकर छळ सोसावा लागला आहे. यावरून जगामध्ये उत्तरोत्तर छळाचा स्वभाव कसा वाढत आहे, हें दिसून येईल. पण आनंदाची गोष्ट ही की, या छळाच्या वाढीबरोबरच सत्यासाठी छळ सोसून आपली आहुति देणाऱ्या हुतात्म्यांची संख्याही वाढत आहे !! म्हणजे या अडीच हजार वर्षांत आसुरी भावना जशी वाढली, त्याचप्रमाणे दैवी भावनाही अधिक प्रकट झाली आहे. असें नसतें तर एका फकिराच्या हाकेबरोबर लाखों माणसें बंदुकीच्या गोळ्यांसमोर उभीं राहिलीं, तीं कधीही राहिलीं नसतीं.

या फकिराच्या सांगण्याप्रमाणे हिंदुस्थानांतील लोक चालतील तर एक वर्षांतच काय, पण एक महिन्यांतसुद्धा त्यांस पूर्ण स्वराज्य प्राप्त होईल, यांत

शंका धरण्याचें कांही कारण नाही. एका वर्षांत स्वराज्य मिळेल, याचा उपहास येथे एकदा झाला हें खरें, पण शेवटीं ते उपहास करणारेच उपहासास्पद ठरले !

सार्वभौम सरकारने या फकिरास कारागृहांत कोंडलें, पण याच्या विचारांस कोंडून टाकण्याचें सामर्थ्य सरकाराकडे नव्हतें. फकिराचें शरीर कोंडलें गेलें, पण त्याचे विचार अधिक पसरूं लागले ! याचे अनुयायी तुरुंगांत कोंडले, स्त्रियांवर लाठ्या चालवल्या, मुलांना तुडविलें, म्हातान्यांना चोपलें, गोळया घातल्या, संगिनी दाखवल्या, सर्व कांही केलें; "दंगे दिलायेंगे" या मोहक मंत्राचे प्रयोग सुरू केले. त्यास जरी कांही लोक भाळले, तरी फकीर व त्याचे अनुयायी भाळले नाहीत.

पुष्कळ लोक सध्याचा काल हा पतित अवस्थेचा काल– कलियुगाचा काल –आहे, असें मानतात; पण विचार करून पाहिलें असतां या फकिरानें असामान्य इच्छाशक्तीने या युगास 'सत्ययुग' (सत्याग्रहाचें युग) करून सोडलें व सत्याचाच शेवटीं जय होतो, हें सिद्ध करून दाखवलें.

सध्याचा वेळ हा सत्ययुगाचा प्रारंभ आहे. मोठें कलियुग चालत असतां त्याच्या आंत पोटयुगें चालू असतात, त्यांपैकी आपल्या देशांत सध्या या सत्ययुगाला प्रारंभ झालेला आहे; हें आमच्या भाग्याचें युग आहे. यासाठी या युगाच्या नवीन प्रस्थापित झालेल्या या धर्माप्रमाणे जे वागतील, ते इहपर-लोकीं वंदनीय होतील, यांत संशय नाही. परमेश्वराने आम्हांस या युगांत जन्मास घातलें, हे त्याचे आम्हांवर फार उपकार आहेत. या फकिराने चालवलेल्या "साधूंचें परित्राण, दुष्कर्म्यांची सुधारणा व सत्यधर्माची स्थापना" या त्रिविध कार्यांमध्ये जे आपणांस वाहून घेतील, तेच धन्य होत. गावोगावीं या नवयुगधर्माची दीक्षा घेतलेले लोक होवोत व असाच या अर्धनग्न फकिराचा विजय होवो, असें मी मनापासून इच्छितों.



# हिन्दूंतील जन्मसिद्ध जातिभेद

प्रश्न– हिंदु समाजांतील जन्मसिद्ध 'जातिभेद' अनिष्ट आहे, असें सामान्यतः प्रतिपादन करण्यांत येतें; तें खरें कीं नाही?

उत्तर– हिंदु धर्मांत व हिंदु समाजांत 'जातिव्यवस्था' किंवा 'वर्ण-व्यवस्था' आहे. 'जातिभेद' अशी संस्था हिंदु धर्मामध्ये नाही. जातिभेद हा शब्द हिंदूंच्या शत्रूंनी रचला व धर्मग्रंथांचें रहस्य न जाणणाऱ्या हिंदु लेखकांनी तो विचार न करतां स्वीकारला आहे. प्रत्येक जातीच्या प्राण्यांत पोटजाती आहेतच. घोड्यांत अरबी, भीमथडी, ऑस्ट्रेलियन असे पोटभेद आहेत. कुत्र्यामांजरांतहि ते तसेच आहेत. तसेच ते माणसांतहि जन्मतःच आहेत. या जन्मतः असलेल्या भेदांची 'व्यवस्था' हिंदु धर्मानें लावली आहे.

जाति जन्मतः असतातच व शेकडो कारणांनी त्या नवीनहि बनतात. त्या अनिष्ट असोत किंवा इष्टानिष्ट असोत;

त्या टाळणें शक्य नाही. ज्या रीतीने त्यांची अनिष्टता सध्या प्रतिपादन करण्यांत येत आहे, ती अनिष्टता मात्र जातिव्यवस्थेंत नाही. हिंदूंचे शत्रु जातिव्यवस्थेला जातिभेदाचें स्वरूप देऊन व ते भेद वाढवून त्यांची अनिष्टता भासवीत आहेत; पण जातिव्यवस्था या स्वरूपांत ' भेद ' नाही व अनिष्टता तर नाहीच नाही.

**प्रश्न– हिंदूंतील जातिभेद नष्ट करणें इष्ट असलें, तरी तें कितपत शक्य आहे ?**

उत्तर– हिंदूंतीलच काय, पण कोणत्याही ठिकाणचा जातिभेद नष्ट होणें केव्हाहि शक्य नाही. जगच विविधतेने बनलें आहे; तें सर्व जातिभेदाच्या पायावरच उभें आहे. सर्व शास्त्रें जातिभेद मानत आहेत. हा भेद उपकारक कसा करावा, एवढेंच पाहणें माणसाच्या हातांत आहे.

**प्रश्न– जातिभेद नष्ट होणें, हें केवळ काळाच्या ओघावरच अवलंबून असावें, कीं त्यासाठीं खास प्रयत्न करण्यांत यावेत ?**

उत्तर– काळाच्या ओघानेही जातिभेद नष्ट होणार नाही व प्रयत्न करूनही नष्ट होणार नाहीं. एक भेद मोडला, तर दुसरा उद्भवेल इतकेंच. यापेक्षा जास्ती कांही घडणें शक्य नाही. सर्वत्र जुने भेद नष्ट होऊन नवीन निर्माण होत आहेत, हें पहात असूनही भेद घालवण्याचा यत्न करणें, हे वेडेपणाचें आहे. भेदांची व्यवस्था करावी, एवढेंच काय तें घडणें शक्य आहे. भेदच समूळ नष्ट करणें कल्पान्तींही शक्य नाही.

**प्रश्न– जन्मसिद्ध जातिभेद नष्ट होण्यास पुष्कळच कालावधि लागेल असें मानलें, तरी जातिमूलक उच्चनीचत्वाची**

भावना नाहीशी होणें शक्य आहे काय ? व तें शक्य असेल, तर त्यासाठी कोणते उपाय करावेत ?

उत्तर– जातिमूलक उच्चनीच भावनाही नष्ट होणार नाही. परिस्थिती-प्रमाणे जी जात राज्यशासन व धन इत्यादिकांनी संपन्न होते, ती उच्च होते व इतर जाति हीन राहतात. म्हणून जातिमूलक उच्चनीच भाव कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत नेहमी राहणार; म्हणजे एका जातीचा उच्चपणा जाऊन तेथे दुसऱ्या जातीचा येईल, एवढेंच होणें शक्य आहे; पण तत्त्वतः जातिमूलक उच्चनीच भावना राहणारच. नवीन जाती बनतील व त्यांतील एखादी जात वर येईल व दुसरी खाली जाईल. असें झालें तरी जातिभेद मोडला, असें होणार नाही.

प्रश्न– सरकारी कायद्याशिवाय केवळ लोकमताच्या जोरावर जातिभेद नष्ट होणें शक्य आहे काय ?

उत्तर– सरकारी कायद्याने समता स्थापन होणार नाही. जेथे सरकारच आपल्या जातीच्या बरोबर हिंदी जात आहे, असें मानण्यास तयार नाही, तेथे त्या सरकारने कायदे केले, तर त्यांनी सर्वांचे समान अधिकार होतील, असें कोणास मानतां आलें, तर त्याने तसें खुशाल मानावें; पण तें खरें असें मात्र ठरणार नाही.

प्रश्न– सरकारी कायद्याचा उपाय योजणें आपणांस इष्ट वाटतें कीं अनिष्ट वाटतें ? व तसें वाटण्याचीं कारणें कोणतीं ? इष्ट वाटत असल्यास कायदेशीर उपायांची मर्यादा कोणती ?

उत्तर– हिंदी सरकार हिंदी लोकांच्या उन्नतीसाठी हवा तो यत्न करावयास तयार होईल, त्या वेळींच सरकारी कायद्याने हिंदी

लोकांचा लाभ होईल. तोंपर्यंत जर हिंदी लोकांतील भेदांमुळे परकीय सरकारचा लाभ होणें संभवनीय असेल, तर त्यांच्या कायद्यां-मुळे हिंदी भेद कमी होतील असें मानणें ज्यांस शक्य असेल, त्यांनीच त्याचा विचार करावा. जी हिंदी लोकांची स्थिति, तीच परकीय सरकारच्या कायद्यांमुळे हिंदु लोकांची होईल.

प्रश्न– इतर बहुतेक सुधारलेल्या देशांप्रमाणे पतीची जात तीच पत्नीची व तिच्या मुलांची समजण्यांत यावी, अशा तत्त्वावर भिन्नजातीय वधूवरांचे विवाह कायदेशीर ठरल्यास जाति-भेदाची अनिष्टता, निदान तीव्रता तरी दूर होईल काय? असे विवाह अनुलोम, तसेच प्रतिलोमही असावे काय ?

उत्तर– या प्रश्नाचा विचार करतेवेळीं जर्मनीमध्ये वंशशुद्धीचे जे प्रयत्न चालू आहेत, त्यांचाही विचार व्हावा. वंश शुद्ध नसेल, तर कुत्र्या–घोड्यांचीही किंमत कमी होते; मग माणसांची किंमत कमी होईल, हें कांही सिद्ध करण्याची गरज नाही.

प्रश्न– अस्पृश्यता व जातिभेद यांचा परस्परांशीं सम्बन्ध कितपत आहे? जातिभेद कायम ठेवून अस्पृश्यतेचें निर्मूलन करणें कितपत शक्य आहे ?

उत्तर– अस्पृश्यता व जातिव्यवस्था यांचा कांही सम्बन्ध नाही. जातिभेदाशींहि अस्पृश्यतेचा सम्बन्ध नाहीं. जातिभेदाच्या ठिकाणीं जातिव्यवस्था ठेवून अस्पृश्यता नष्ट करतां येईल. अस्पृश्यतेचा विचार करतांना आफ्रिका व अमेरिका येथे हिंदी लोक हे अस्पृश्यच आहेत ते कां, याचा विचार करावा, म्हणजे पायाशुद्ध विचार होईल.

जातिभेद हिन्दु धर्मांत नाही. हिंदु धर्मांत जातिव्यवस्था व

वर्णव्यवस्था आहे. निसर्गतः असलेल्या भेदांची व्यवस्था लावण्याची खटपट आस्थेने झाली पाहिजे. कांही जाति जरी निष्कारण उद्भवल्या आहेत असें दिसलें, तरी ती कांही मुख्य बाब नव्हे. सर्व हिंदूंतील जाति मोडल्या, तरी हिंदु-मुसलमानांची व ख्रिस्त्यांची एकी कशी करावी, हा प्रश्न राहणारच. जर या तीन धर्मीयांची एकी, परस्परांच्या व्यक्तित्वाचा नाश न करतां होणें शक्य असेल, तर त्याच तत्त्वाने अनेक जातींची एकी होईलच. जाति या मोडून मोडणार नाहीत. अनेक जातींचीं माणसें एका मोठ्या श्रेष्ठ कार्यांत गोवलीं गेलीं, म्हणजे त्यांची परस्पर उच्चनीच भावना लयास जाते. सत्याग्रहांत सामील झालेले परस्परांत उच्चनीच भाव मानीत नव्हते; म्हणून जाति मोडण्याचा यत्न न करतां, प्रचंड राष्ट्रकार्य करण्याची तीव्र भावना हिंदी किंवा हिंदु लोकांत उत्पन्न करावी व प्रत्यक्ष त्या कार्यांत त्यांना गोवून टाकावें; म्हणजे इष्ट मनोवृत्ति झालेली दिसेल. जाति मोडण्याच्या प्रयत्नांमुळे भेदांचें संगोपन मात्र अधिक होईल.



# कुटुंब-संस्थेचें पावित्र्य

कांही लेखक सध्या असें प्रतिपादन करूं लागलेले दिसत आहेत की, " आता काय, कुटुंब-संस्था मोडून गेली आहे. यापुढे कुटुंब-संस्थेचा टिकाव लागणें शक्य नाही. कुटुंबसंस्थाच नसल्याने कुटुंबामुळे येणारी जबाबदारी आता पाळण्याचें कारण नाही. कुटुंब संस्थाच मोडली आहे, त्यामुळे वंशशुद्धताही आपोआपच नामशेष झाली आहे, म्हणून वंशाच्या आधारावर उभारलेली नीति ही आता पाहण्याचें कारण नाही. "

अशा प्रकारचें लिखाण सध्या बऱ्याच लेखकांकडून लिहिलें जात आहे. तेव्हा खरोखरच कुटुंबसंस्था मोडली कीं आहे, हें पाहणें अगत्याचें झालें आहे. जर ती खरोखरच मोडली असेल, तर तिचे गोडवे गाण्यांत कांहीच अर्थ नाही. ती मोडली असली तर ती मोडली आहे, असेंच धरून चाललें पाहिजे व पुढे काय करावें, याचा विचार करावयास लागलें पाहिजे; कारण मेलेल्या संस्थेचीं प्रेतें उकरून त्यांची चर्चा करून कोणासच कांही लाभ होणार नाही, हें म्हणणें आम्हांलाहि कबूल आहे. पण जो प्रतिपक्षाचा मुख्य मुद्दा आहे तो तरी, जसा

प्रतिपक्षी म्हणत आहे तसाच खरोखर आहे कीं काय, हें आधी पाहिलें पाहिजे; म्हणजे कुटुंब–संस्था खरोखरच नामशेष झाली आहे कीं काय, हें आधी पाहिलें पाहिजे. नुसतें कांही लेखकांनी गलबला केला किंवा गोंधळ माजविला, म्हणून तेवढ्यावरून पूर्ण शोध न करतां सर्वांनी तसेंच मानलें, तर तें माणुसकीस शोभणार नाही. म्हणून कुटुंब–संस्था आज आहे कीं नाही, तें प्रथमतः पाहूं.

## कुटुंब व कुटुंब–संस्था.

कुटुंब संस्था आहे कीं काय, तें पहावयाचें असतांना प्रथमतः ' कुटुंब ' म्हणजे काय तें पाहिलें पाहिजे. कुटुंब शब्दाचा मूळचा अर्थ स्त्री–संबंधामुळे किंवा रक्ताच्या संबंधामुळे होणारा परिवार (A relation by descent or marriage ) विवाहामुळे जो वंशसंबंध होतो, त्याला कुटुंब असें म्हणतात. म्हणजे कुटुंब होण्याला विवाह झाला पाहिजे, विवाहानंतर स्त्रीपुरुष एके ठिकाणीं राहून त्यांचा संबंध घडला पाहिजे व संतति होण्याची संभावना किंवा शक्यता असली पाहिजे; कारण विवाह हाच मुळी वंशरक्षणासाठी असतो. वंशरक्षणाची शक्यताच नसेल, तर विवाहांत कांहीच अर्थ राहणार नाही; मग कोणाला मूल होवो किंवा न होवो. मूल होण्याची संभावना असली म्हणजे झालें. यावरून पाहतां स्त्री व पुरुष हे विवाहसंबंधाने एकत्र होऊन एके ठिकाणीं राहतात व ज्या ठिकाणीं पूर्वीची पिढी व पुढली पिढी यांचा रक्ताचा संबंध केन्द्रित झालेला असतो, त्याला ' कुटुंब ' असें म्हणतात. हीच व्याख्या आपण व्यवहारामध्ये कुटुंब या शब्दाचा प्रयोग करीत असतांना मनांत ठेवीत असतों. आता या व्याख्येप्रमाणे आज पृथ्वीच्या पाठीवर कुटुंबें आहेत कीं नाहीत ?

एक बायको, एक तिचा पति, यांचीं कोणी तरी वडील माणसें व यांचीं मुलें मिळून कुटुंब होत असतें. हा रक्ताचा संबंध असल्यामुळे मुलांच्या व वृद्ध वडील माणसांच्या पालनपोषण व संवर्धनाचा भार तरुणांवर असतो व तो

तसा असणें अगदी स्वाभाविकही आहे. आता या दृष्टीने आपण जगामध्ये पाहूं लागलों तर अगदी रानटी स्थितीमध्ये असलेल्या जातींपासून तों अगदी सुधारलेल्या देशांतील सुधारणेच्या शिखरावर पोचलेल्या जातींपर्यंत सर्वच जातींचे लोक कुटुंबें करूनच रहात आहेत, ही गोष्ट आपणांस दिसेल. मग कुटुंबसंस्था मोडली, असा कोलाहल करण्यास कारण काय आहे बरें ?

## काडीमोडीची चाल.

आशियांतील लोकांची गोष्ट सोडूनच द्या, आफ्रिकेचें नांवहि घेऊं नका; युरोप व अमेरिकेमध्ये स्त्री–पुरुष एका छपराखाली विवाहसंबंधाने संबंधित होऊन रहात आहेत कीं नाहीत ? कोणी म्हणतील, 'तेथील विवाह–संबंध क्षणभंगुर आहे; हवी तेव्हा काडी मोडतां येते.' पण काडी मोडावी लागते, याच बळकट पुराव्यावरून तेथे विवाहसंस्था व कुटुंबसंस्था कायम व स्थायी स्वरूपाची आहे, असें सिद्ध होतें. जर कुटुंब नसेल तर काडी मोडण्याची गरज काय ? काडी मोडण्याने विवाह कितीहि क्षणभंगुर झालेला असो, पण तो विवाह हा काडी मोडली नाही तर मोडला जात नाही, ही गोष्ट सर्वांस माहीत आहे व सर्वांस संमतहि आहे. अशा रीतीने विवाह हा अभेद्य ( काडी मोडेपर्यंत तरी अभेद्य ) आहे, असें जोंपर्यंत सर्व देशांत मानण्यांत येत आहे, तोंपर्यंत कुटुंबसंस्था मोडली व बुडाली असें म्हणण्यांत काय अर्थ आहे, तें ज्याचें त्याने पहावें. तात्पर्य हें की, विवाहसंस्था व कुटुंबसंस्था ही सर्व देशांत आजमितीस आहे व ती लवकर नाहीशी होईल, अशीं चिन्हें दिसत नाहीत.

सर्व पृथ्वीवरच्या देशांमध्ये कुटुंब–संस्था मोडली, असें वाटण्याजोगी जर कोठे स्थिति आली असेल, तर ती रशियामध्ये होय; पण तेथे आज कुटुंबसंस्था मोडली असें म्हणतां येत नाही. कुटुंब मोडण्याला लागणारी सर्व परिस्थिति अनुकूल असतांहि रशियांत सुद्धा कुटुंबें अजून हयात आहेत, हें

पाहिलें म्हणजे कुटुंब-संस्था किती चिवट आहे, तें समजेल व ती इतकी हाडां-मांसांत भिनलेली असल्यामुळे खरोखर मोडण्याची स्थिति निर्माण झाल्यावर-सुद्धा कित्येक शतकें टिकून राहील. पण अजून तशी परिस्थिति कोणत्याही देशांत निर्माण झालेली नाही, ही गोष्ट या नवलेखकांनी लक्ष्यांत घ्यावी.

जेथे युरोप-अमेरिकेंतसुद्धा कुटुंबें आजमितीपर्यंत आहेत व तीं नाहीशीं होतील असें दिसत नाही, तेथे त्या मानाने मागे असलेल्या हिंदुस्थानांत ' कुटुंबसंस्था मोडली ' असें म्हणणें शुद्ध आंधळेपण आहे व असें म्हणणारांची स्वतःची विवेकशक्ति नाहीशी झाली, असेंच म्हणावें लागेल. आज जे ' कुटुंब-संस्था मोडली' असें म्हणून स्वैराचाराला उत्तेजन देण्यासाठी लिखाण लिहीत आहेत, ते युरोपांतील हीन विचारांचे गुलाम बनले आहेत, असेंच वाटतें!

येथे कोणी असें विचारतील की, 'कुटुंबसंस्था मोडली तर काय होईल?' हें वाचकांस नक्की कळणें अगत्याचें आहे, म्हणून कुटुंबसंस्था मोडल्यानंतर काय होईल ते पाहूं-

## कुटुंब-संस्था मोडली तर—

१. कोणालाहि खासगी मालमत्ता असणार नाही; कोणालाहि घरदार, वाडी, शेत, स्थावरजंगम मिळकत कांही एक नसेल.

२. नवरा व बायको पशूप्रमाणेच विषयसंबंधापुरतेच एके ठिकाणीं येतील व कार्य संपतांच आपापल्या वाटेने जातील; प्रेमसंबंधाने एका छपरा-खाली राहणार नाहीत.

३. स्त्रियांची प्रसूति झाल्यावर मुलें आईबापांकडून पाळलीं जाणार नाहीत. त्या देशांत सरकार असलें तर तें मुलांचें पालन, पोषण, संवर्धन व विद्याभ्यास यांची व्यवस्था करील.

४. मुलांस आपल्या आईबापांचा पत्ता असलाच पाहिजे, असें म्हणतां येणार नाही. सर्व मुलें हीं सर्व राष्ट्राचीं लेकरें होतील.

५. नवरा बायकोला पोसणार नाही; बायको नवऱ्याजवळ राहणार नाही; मुलें आईबापांकडे राहणार नाहीत; आजचा प्रेमसंबंध नाहीसा होईल. ज्याप्रमाणे गाई, बैल व वासरें असतात, तशी स्थिति मनुष्यांची होईल.

६. वंश, वंशाभिमान व वंशशुद्धि या कल्पना नुसत्या ग्रंथान्तरींच राहतील.

यांपैकी आज कांहीहि झालें आहे असें दिसत नाही. मग कुटुंबसंस्था मोडली असा टाहो हे नवलेखक कां बरें फोडीत आहेत ? युरोपमध्ये शहरांत राहणारे कांही उच्छृंखल लोक आपल्या वृद्ध मातापितरांस वृद्धपणीं पोसत नाहीत व कांही मुलें अनाथालयांत पाळलीं जातात, एवढ्यावरूनच सर्व जगांतील कुटुंबसंस्था मोडली, असें म्हणावयाचें कीं काय ? जगामध्ये एकंदर दोनशे कोटि लोकसंख्या आहे, त्यांपैकी हजारपांचशेच काय ते असे उच्छृंखल निघतील. म्हणून तेवढ्यावरून बाकीच्या लोकांचीं कुटुंबेंहि उध्वस्त झालीं असें समजावयाचें कीं काय ? यावरून विचार केला म्हणजे असें स्पष्ट दिसतें की, कुटुंब-संस्था मोडण्याची कल्पनाही अजून जनतेपुढे आलेली नाही. असें असतां आपल्या देशांतील हे नवलेखक कुटुंबसंस्था मोडली, असें बिनदिक्कत लिहीत आहेत !!

## अन्तराचा प्रश्न.

मुलगा शाळेंत गेला, मुलगी बागेंत फुलें आणावयास गेली, नवरा कचेरींत गेला व गृहिणी तेवढी घरांत असली की, लगेच कुटुंबसंस्था मोडली, असें समजण्याइतकी ही संस्था लेचीपेची नाही व हिंदु कुटुंबसंस्था तर अशा अढळ पायावर रचली आहे की, ती असल्या वादळांनी कांही केलें तरी हलणार नाही. सध्याच्या तरुण लेखकांचा असा समज झाल्यासारखा दिसत आहे कीं, मुलें पदवीधर होऊन अन्य गावांत नोकरीसाठी जातात, त्यामुळे कुटुंब म्हणून एकत्र राहण्याची चाल मोडली आहे; पण हा भ्रम आहे; कारण सध्या अंतराचें महत्व नाहीसें झालेलें आहे. पूर्वी साताऱ्याहून काशीला जाऊन

येणें सहा महिन्यांचें व फार जिकिरीचें काम होतें, पण सध्या आगगाडीने चार दिवसांचें व विमानाने एका दिवसाचें तें काम झालें आहे व तारेने तर एक मिनिटांतच इतक्या अंतरावरून बोलतां येतें; म्हणून पूर्वी एका घरांत असणें व सध्या काशीपासून रामेश्वरापर्यंत कोठेहि असणें एकच आहे. पूर्वी वसुधैव कुटुंबक होणें हें आलंकारिक भाषेने शक्य होतें. तेंच आज वस्तु-स्थितीने शक्य झालें आहे. म्हणून आईबाप एका गावीं असले व चार मुलें कामकाजासाठी चार दिशांना असलीं तरी तीं तारेच्या व आगगाडीच्या दळण-वळणामुळे जवळ जवळ घरीं असल्यासारखींच आहेत. पूर्वी २५।३० मैलां-वरचें गाव जितकें दूर वाटत होतें, तितकीच दूर आज हजारो मैलावरची काशी वाटत आहे; यामुळे आप्तसंबंधी दूर राहूं शकतात व सोयरिकीहि दूर-वरच्या होऊं शकतात. यासाठी मुलगा परगावीं नोकरीसाठी गेला म्हणजे तेवढ्याने कुटुंब-संस्था मोडली, असें होऊं शकत नाही.

खरोखर पाहिलें तर कुटुंबसंस्था ही कांही माणसें एका घरांत राहण्या-वर मुळीच अवलंबून नाही. मुंबईतील चाळीमध्ये एकाच घरांत शेकडो किंवा हजारो माणसें असतात; पण एकाचा दुसऱ्याशीं कांही संबंध नसतो. कुटुंब-संस्था ही वस्तुत: मनाच्या विशिष्ट स्थितीमध्ये असते. ज्यांना मनाने ऐकोपा वाटतो व जे रक्ताच्या नात्याने बांधलेले असतात, त्यांचें कुटुंब होऊं शकतें, मग ते कितीहि दूर दूर रहणारे असोत; म्हणून दूर अंतर किंवा जवळचें अंतर याला कुटुंब-संस्थेच्या अस्तित्वामध्ये कांहीसुद्धा महत्त्व नाही. यासाठी तरुण लोक दूरदूर नोकरीच्या निमित्ताने जातात,एवढ्याने कुटुंब-संस्था मोडली, असें म्हणतां येणार नाही.

सध्याच्या तरुणांना प्राथमिक, माध्यमिक व सर्व प्रकारचें उच्च शिक्षण कोणाच्या खर्चाने मिळतें ? शाळेंतील व कॉलेजांतील खर्च कोण करतें ? याचा विचार तरुणांनी करावा, म्हणजे कुटुंबसंस्था जिवंत आहे कीं मोडली गेली

आहे, याचा खुलासा त्यांचा त्यांनाच आपोआप होईल. जीं मुलें शाळा व कॉलेज-मध्ये किंवा युरोप-अमेरिकेंत आपल्या घरच्या खर्चाने शिकून तयार होतात, त्यांना शिक्षणाचा खर्च घराकडून मिळाला असल्यामुळे त्यांच्या अनुभवाने त्यांस हें कळून चुकलें असलें पाहिजे की, आपली कुटुंब-संस्था अजून तुटलेली नाही. जर आईबापांना किंवा बंधूंना आणि संबंधीयांना आपला संबंध या तरुणाशीं आहे असें वाटत नसतें, तर तीं त्यासाठी हा खर्च कसा करतील ?

पैसा घेतला म्हणजे जबाबदारी आली, ती कांही केलें तरी टाळतां येणार-च नाही. निदान तरुण लोकांनी तरी, त्यांच्यावर राष्ट्राच्या भविष्य काळां-तील सर्व जबाबदाऱ्या पडणार असल्याने, असल्या बेजबाबदार विचारांस आपल्या अंतःकरणांत थारा देतां नये; कारण कोणताहि बेजबाबदार मनुष्य आपल्या राष्ट्राच्या हितासाठी आवश्यक असलेलें महत्कार्य करण्यास समर्थ होऊं शकत नाही.

## आजचा महाराष्ट्र.

आपल्या हिंदुस्थान देशांत व विशेषेंकरून आपल्या महाराष्ट्रांत आज-च्या स्थितींत कुटुंबसंस्था आहे कीं ती मोडली आहे, एवढाच आमच्यापुढे विचाराचा प्रश्न आहे. त्याचें उत्तर असेंच आहे की, सध्या आपल्या हिंदु-स्थानामध्ये व महाराष्ट्रामध्ये कुटुंबसंस्था आहे व ती भविष्यकाळीं कित्येक शतकें तरी मोडेल, हें संभवनीयही नाही; याचें कारण असें की, येथे अजून आईबापच मुलांना व मुलींना पोसत आहेत. मुलांच्या विद्याभ्यासाचा सर्व भार त्यांच्या वाडवडिलांवरच पडत आहे; कॉलेजचा अवाढव्य खर्च वाडवडील हाडांचीं काडें करून व आपला जीव गहाण टाकून करीत आहेत; पुढील पिढीचें हित व्हावें म्हणून आपल्या जिवाची पर्वा न करतां मुलांच्या हितासाठी आत्म-सर्वस्व अर्पण करीत आहेत. मुलांचीं लग्नें-कार्यें वडिलांनी मिळविलेल्या पैशाने होत आहेत. मुलांच्या, सुनांच्या व त्यांच्या अर्भकांच्या आजारीपणाच्या,

अशक्तपणाच्या आणि सुनांच्या व मुलींच्या बाळंतपणाच्या खर्चाचा भार वडिलांवरच पडत आहे.

मुलगा नोकरीसाठी हवा तितका दूर असो, आपली बायको किंवा आपला बाळ आजारी होतांच, त्याला हक्काने आपल्या घरीं–बापाच्या घरीं –आणून टाकतो व नोकरीवर रुजू होतो. याच्या खस्ता म्हाताऱ्यांनी खाव्या व बायको बरी झाली की, ती नोकरीच्या गावीं पोचवावी. नोकरीच्या किंवा विद्याभ्यासाच्या गावीं मुलगा आजारी झाला, तर म्हातारीं ' आईबापें ' धावत त्याच्या शुश्रूषेला जातात, तेथे होईल ती शुश्रूषा करतात व गरज संपली म्हणजे परत आपल्या मूळच्या पर्णकुटिकेमध्ये येऊन पुढल्या पिढीचें हित चिंतीत असतात. थोडेसें वाईट स्वप्न पडलें किंवा डोळा उडूं लागला, म्हणजे पुढील पिढीचें कांही अशुभ तर नाही ना झालें ? असें म्हणून म्हातारीने डोळ्यांत अश्रु आणून ' आमच्या बाळयाकडून कधी बरें पत्र आलें होतें ? ' असा सूचक प्रश्न करावा. हीं सगळीं चिन्हें कुटुंब–संस्था मोडली, असें समजण्याचीं आहेत काय ? जेथे कुटुंबसंस्था मोडली असेल, तेथे असें वर्तन होणें शक्य आहे काय? कुटुंब–संस्थेपासून शक्य तितके लाभ करून घ्यावयाचे, पण कुटुंब–संस्थेसाठी कांहीसुद्धा करावयाचें नाही, अशी वृत्ति जर उत्पन्न होऊं लागली तर ती कांही माणुसकी वाढवणारी आहे, असें म्हणतां येणार नाही व मनुष्य माणुसकी असेपर्यंतच मनुष्य म्हणवून घेण्यास योग्य असतो; माणुसकीशिवाय तो एक निव्वळ पशूच आहे, यांत कांही संशय नाही.

## देवाण–घेवाण.

हें जग देवाण–घेवाणीवर चाललेलें आहे. कुटुंबीयांकडून जें मुलांमुलींचें पोषणसंगोपन वगैरें केलें जातें, तें काही तीं मुलें मोठीं झाल्यावर ' आम्हांला कुटुंबीयांच्या हिताहिताशीं कांही कर्तव्य नाही ' असें मुलांनी म्हटलेलें ऐकून घेण्यासाठी नाही. जर वाडवडिलांकडून तरुणांना फायदा झालेला असेल, तर

त्याच्या मोबदल्यांत त्यांनी वाडवडिलांच्या मतांना योग्य तो मान दिलाच पाहिजे. याचा अर्थ असा नव्हे की, तरुणांनी सर्वस्वीं आपल्याला विकून घ्यावें. पण शक्य तें करून घरचीं मतें व आपलीं मतें यांच्या तडजोडीने मधला मार्ग काढण्याइतका समंजसपणा नवीन तरुणांनी दाखवला म्हणजे सर्व कांही सुरळीतपणाने चालणें शक्य आहे.

पूर्वीच्या लोकांची गोष्ट सोडून दिली, तरी जे कुटुंबीयांचा पाश तोडूं इच्छीत असतात व आपल्या मनास येईल तसें वागण्याची इच्छा धरतात ते कांही आजन्म ब्रह्मचारी राहणारे नसतात, हें त्यांनी विसरतां नये. त्यांना इष्ट स्त्रीबरोबर रहावयाचें असतें, म्हणजे त्यांना कुटुंब-संस्थेंतच प्रविष्ट व्हावयाचें असतें. मग आज जे तुम्ही आपल्या वडिलांशीं वर्तन ठेवीत आहां, तेंच उद्या तुमच्या मुलाने तुमच्याशीं ठेवलें तर कसें वाटेल, याचा आजच चांगला विचार केलात तर चांगलें; म्हणजे यामुळे तरी आपणच लावलेल्या विषवृक्षाचीं फळें तुम्हांस पुढे चाखण्याचा प्रसंग येणार नाही. जे आज वडिलांचें कुटुंब तुटलें असें म्हणत असतात, तेच स्वतः आपलें लग्न करून नवीन कुटुंबसंस्थेंत आपला पाय अडकवीत असतात ! मग कुटुंब-संस्था तुटली, असें व्यर्थ म्हणण्यापासून लाभ कोणता ?

कुटुंब-संस्था ही सर्व प्रकारची मानवी जबाबदारी कशी पालन करावी, तें शिकण्याची शाळा आहे. जेव्हा ही पवित्र कुटुंब-संस्था तुटेल, त्या वेळीं मनुष्यसमाज म्हणून कांही कल्पनाच या पृथ्वीतलावर राहणार नाही. पण मनुष्याच्या इतिहासांत असा एखादा समय येईल, असें आज कांही म्हणवत नाही; कारण मनुष्यप्राणी हा स्वभावतःच सामाजिक प्राणी आहे. कुटुंब-संस्था नसेल, तर मनुष्याचें पोर जगणेंच शक्य नाही. मनुष्याचें बालक इतकें पराधीन असतें की, त्याचा १०-१५ वर्षें चांगला सांभाळ केल्याशिवाय तें जगणारच नाही. म्हणून जे लोक कुटुंबसंस्थेच्या नाशाचा विचार प्रसृत करीत

आहेत, ते मानवी समाजाच्या मुळावरच घाला घालीत आहेत, ही गोष्ट दृष्टिआड करतां नये. कुटुंबसंस्था तुटणें म्हणजे मानवी संस्कृति समूळ नष्ट होणें होय.

## वंश-शुद्धि.

स्वैर आचार हा केव्हाच हितपरिणामी होत नसतो. जित राष्ट्राने तर आपली वंशशुद्धि फारच जपून ठेवली पाहिजे. आज जर्मनीमध्ये आपल्या वंशाची पवित्रता ठेवण्यासाठी केवढा अट्टाहास चालला आहे, तें आमच्या देशांतील तरुणांनी पहावें. जर्मनींत सर्व संकर-जातीयांची हकालपट्टी केली जात आहे. तेथें परजातीयांना थारा मिळणें शक्य नाही.

हिंदी लोक किंवा हिन्दूलोक अन्धविश्वासी,रूढिप्रिय वगैरे सर्व दोषांनी दोषी झालेले आहेत, हें दुर्जन-तोष-न्यायाने एक वेळ मानलें तरी जर्मन लोक कांही हिंदू नाहीत. विसाव्या शतकांत सुधारणेच्या शिखरावर पोचलेले, आधुनिक शास्त्रांच्या प्रगतीमध्ये ज्यांचा हात कोणी धरूं शकत नाही, सर्व कलाकुशलते-मध्ये उच्च प्रगतीने संपन्न असलेले असे हे जर्मन आहेत व ते हिंदूंप्रमाणेच संकरज प्रजा सदोष आहे, असें कां ठरवीत आहेत ? हिंदूप्रमाणेच स्त्रियांना घरांत राहून केवळ सुप्रजा निर्माण करण्याचें कार्य करावयास कां बरें लावीत आहेत ? यांत कांही अंध विश्वास असेल, असें यांच्याने म्हणवणार नाही. मग जर्मन लोक सुधारणेच्या अग्रभागीं जाऊन मूढ बनले कीं काय ? जर असें मानावयाचें असेल, तोच न्याय हिंदूंना कां लावला जात नाही ?

जर्मनी संकरज प्रजेला जो त्याज्य ठरवीत आहे, तो कांही उगीच नाही. संकरजांमधील मुख्य दोष हा असतो की, पवित्र कुटुंब-संस्थेचा त्याला अभिमान नसतो, कुटुंबाच्या यशाची त्याला किंमत नसते; म्हणून पवित्र कुटुंब-संस्थेच्या उत्तम बंधनांनी आपणांस बांधून घेणें, हेंच वंशशुद्धि राखण्याचें एकमात्र साधन आहे, हें कोणीहि विसरतां नये.

कोणाला वंश-शुद्धीचें तत्त्व पटलेलें असो किंवा नसो, आज तें जर्मन लोकांना पक्केपणी पटलेलें आहे, यांत शंका नाही. याहीपेक्षा जर्मनीमध्ये दुसरीहि एक दृष्टि या विवाहाच्या बाबतींत उत्पन्न झाली आहे; ती ही की, विवाहामध्ये परदेशी राजकारण घुसलेलें असतें,हें अनुभवल्यामुळे स्वजातीयांशींच विवाह करण्याचें तत्त्व जर्मनांना आता पक्केपणानें पटलें. पूर्वी झारशाहीच्या वेळीं जपानी बायका रशियन सरदारांना नवरे करीत व आनंदानें राहिल्यासारखें दाखवीत. पण पुढे जेव्हा सर्व बातम्या रशियांतून जपानांत पोचवणाऱ्या या विसंस्कृतीच्या विदेशी रमण्याच आहेत, असें आढळून आलें, तेव्हा विदेशी स्त्रियांशीं विवाह करणें, हें राष्ट्रीय महापाप आहे, ही गोष्ट त्यांस पटली. जर्मनीमध्येहि हा विदेशी, विजातीय व विसंस्कृतीय विवाह गत-महायुद्धापूर्वी होत होता व मान्य होता; पण गेल्या महायुद्धांतील जर्मन राजकारण यामुळे बरेंचसें बिघडलें, असें जेव्हा नक्की कळून चुकलें, तेव्हा आता डोळे उघडल्यानंतर विजातीय विवाह हें राष्ट्रीय महापाप आहे, असें आता जर्मन लोक मानूं लागले आहेत.

आपल्या ऋषींनी हें तत्त्व हजारो वर्षांपूर्वी ओळखलें होतें. जित लोकांनी तरी, पुनः वर उठून राष्ट्रीय स्वातंत्र्य मिळवावयाचें असेल तर विदेशी विसंस्कृतीय रमणींशीं संबंध ठेवतां नये; कारण जेव्हा स्वातंत्र्य-युद्ध होईल, त्या वेळीं या विदेशी रमणी आपल्या वळणार गेल्याशिवाय राहणार नाहीत. म्हणून जित लोकांनी सावध रहावें, हें चांगलें. कुटुंबाचा अभिमान बाळगून वंश शुद्ध ठेवण्यामध्ये हें असें राष्ट्रीय उन्नतीचें तत्त्व आहे. याप्रमाणे विवाहाला नुसतें प्रेम हें गमक नसून, त्याशीं राष्ट्रहिताचाही प्रश्न संबंधित झालेला आहे; म्हणून मर्यादा आलीच, ती टाळतां येत नाही.

**कुटुंबसंस्था राखावयाची असेल तर कुटुंबाचा आधार स्त्री आहे, ही गोष्ट विसरून चालावयाचें नाही. स्त्रीच्या संरक्षणानेंच कुटुंब-संस्था राहील.**

म्हणूनच स्त्रीविषयक नीति अबाधित ठेवण्याची अत्यंत आवश्यकता आहे. वेश्यांना प्रतिबंधक उपायांचा अवलंब न करतांहि संतति होत नाही व जी होते ती हीन-बुद्धीची होते. वारयोषिता म्हणजे दररोज लग्न करून दररोज घटस्फोट करणारी जात, असें म्हटलें तरी हरकत नाही. वारंवार घटस्फोट करणें याचा हा परिणाम आहे. द्रव्यादि साधनें विपुल मिळत असतांहि विश्वांगनांच्या संततीने आजपर्यंत आपलें नांव या जगांत धवल यशाने मंडित केलेलें नाही. कुलीन स्त्रियांवर अनेक बंधनें असतांही कुलीन कुटुंबांतूनच तेजस्वी नररत्नें कां निघावीं व दररोज घटस्फोट करणाऱ्या निष्प्रतिबंधाचारी विश्वयोषितांमधून थोर पुरुष आजपर्यंत कां निघूं शकला नाही, याचा विचार केला म्हणजे कुटुंब-संस्थेचें पावित्र्य कां रक्षण केलें पाहिजे, हें लक्षांत येईल.

मनुष्याचें ध्येय केवळ विहार करणें एवढेंच नाही व जर मनुष्य लैंगिक व्यवहार निष्प्रतिबंधपणाने करील, तर त्याचा नाश झाल्याशिवाय राहणार नाही. शरीरशास्त्राप्रमाणे ज्या मर्यादा पाळणें इष्ट आहेत, त्या मर्यादा त्याने पालन केल्याच पाहिजेत.

पुढील पिढी शुभ संस्कारांनी युक्त करणें हें ध्येय मनुष्याचें आहे. आजपर्यंत सर्व थोर लोकांनी याच एका उद्देशाने काम केलें आहे. पवित्र कुटुंब-संस्था एवढ्याच कारणासाठी सुरक्षित ठेवली पाहिजे.

